# VICHITRAPURI.

AN INTERESTING NOVEL.

COMPOSED, REVISED AND ENLARGED,

BY

KESHAV LAKSHMAN JORVEKAR,

PENSIONER MASTER, AT PRESENT RESIDING AT WARDHA, C. P.

THIRD EDITION

PUBLISHED BY

BHAU GOVIND SAPKAR,

IN THE "*DNYAN CHAKSHU*" PRESS.

POONA.

*Registered under Act XXV of 1867.*

1890.

*Price Rupees Two.*

# विचित्रपुरी.

( एक मनोरंजक कल्पित गोष्ट. )

हें पुस्तक,

केशव लक्ष्मण जोरवेकर,

पेन्शनर मास्तर, हल्लीं वस्ती वर्धा, मध्यप्रदेश,

यांणीं रचून पुनः तपासून व सुधारून वाढविलें.

पुणें. पेठ बुधवार येथें.

भाऊ गोविंद सापकर

यांणीं आपल्या

" ज्ञानचक्षु " छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.



आवृत्ति तिसरी.

सन १८९० इसवी.

किंमत दोन रुपये.

# प्रस्तावना.

आलीकडे मराठी भाषेची पुष्कळ सुधारणा होऊन मनोरंजक पुस्तकें व नाटकें झालीं आहेत. तेणेंकरून आमच्या लोकांत पुस्तकें वाचण्याची गोडी उत्तम प्रकारची उत्पन्न होऊन सदाचरणाची प्रवृत्तिही बरीच होत चालली आहे. आजपर्यंत झालेल्या पुस्तकांपासून आमच्या लोकांस चित्तवेधक कथानकांची आणि शब्दगौरवांची विपुल प्राप्ति झाली आहे यांत संशय नाहीं; परंतु कल्याणकारक सदाचरणाची प्राप्ति जशी व्हावी तशी झाली नाहीं असें मला वाटतें. शब्दलालित्यान्वित कल्पित कादंबऱ्या, व मनोहर स्त्रीपुरुषांचीं चरित्रें हीं जरी अज्ञान जनांस सन्मार्गाचें दिग्दर्शन करणारीं असतात, तथापि तीं विद्वज्जनांस अथवा परिपक्क अंतःकरणांस आनंद देण्यास कधींही कारणीभूत होत नाहींत. इसापनीतींतील पशुपक्ष्यांच्या गोष्टी अज्ञजनांस संतोषकारक असतात; परंतु विद्वज्जनांस त्यांच्या तात्पर्यावरूनच आनंद होतो. त्याप्रमाणें या विचित्रपुरींतील कथानकावरून तात्पर्यरूपानें विचारीजनांस अति सखोल अशा परोक्ष ज्ञानाची प्राप्ति करून द्यावी, असा प्रयत्न या तिसऱ्या आवृत्तींत केला आहे. श्रीमद्भागवतामध्यें पुरंजनाख्यान आहे हें सर्व प्रौढ जनांस विदित आहेच; त्यामध्यें एक मनोरंजक कल्पित गोष्ट प्रथम सांगून तिचें तात्पर्य या मानवी देहावर आणिलें आहे. त्या समतेचें प्राकृत गद्यांत एखादें कथानक असावें असें समजून या विचित्रपुरीस हल्लीं एक नवीन भाग जोडिला आहे. या भागामध्यें सर्व कथानकाचा अनुभव प्रत्येक मनुष्यानें आपल्या देहामध्यें पहावा, अशी योजना करून मनुष्यमात्रास विचारशक्ति प्राप्त व्हावी असा प्रयत्न केला आहे. त्या विचारशक्तीची पुढें हळुहळू वृद्धि होऊन मुर्दानवांस अतर्क्य अशा सच्चिदानंद ईश्वररूपाची प्राप्ति मनुष्यास होऊन त्यास शाश्वतपदाचा लाभ व्हावा असा उद्देश आहे.

यांत चमत्कार इतकाच आहे कीं, प्रथमावृत्तींतील सर्व कथान-

क प्राय: कायम ठेवून त्याचाच भावार्थ अनुभवपर दुसऱ्या आवृत्तींत दाखविला आहे.

या तिसऱ्या आवृत्तींत दुसऱ्या आवृत्तींतील लांबट मजकूर कमी करून मनोरंजक एक आणखी नवीन भाग घातला आहे.

या ग्रंथाच्या योगानें आबालवृद्धांस आनंद व्हावा व सांप्रत आमच्या लोकांस गायनकलेची व चित्रकलेची अधिक रुचि उत्पन्न होत चालली आहे असें रा.रा. नारायण केशवराव कावळे यांणीं सुचविल्यावरून त्यांच्या साहाय्यानें कथानकांत समयविशेषीं संगीताच्या चालीवरील रागरागिणींत कित्येक पदें घातलीं आहेत, व उत्तम देखाव्यांसह सुंदर चित्रें घातलीं आहेत.

परमार्थविषय फार कठिण व तद्बोधार्थ केलेले जे प्राकृत ज्ञानेश्वरी व विवेकसिंधु वगैरे ग्रंथ ते अज्ञ वाचकांस रुचिकर लागत नाहीत. याकरितां या कथानकरूपानें त्यांस मननशक्ति प्राप्त होऊन अति श्रमकारक जें वेदान्तशास्त्र त्याचा अभ्यास करण्याची गोडी आमच्या लोकांस लागल्यास आपल्या जन्माचें सार्थक्य आहे, असें ग्रंथकर्ता समजतो.

केशव लक्ष्मण तोरवेकर.

ग्रंथकर्ता.

# अनुक्रमणिका.

## पुस्तक पहिलें.



## पुस्तक दुसरें.



## पुस्तक तिसरें.

# विचित्रपुरी

## पुस्तक पहिलें.

-- --:०:०:-- --

## भाग १.

पद ( मंगलाचरण ).

( भज भज भवजलधिमाजि मनुजा० ) या चालीवर.

॥ नमन मदयहृदय शांत गिरिजा मनाला ॥ ध्रु० ॥
॥ गजवदना सुमति देइ ॥ अहंकार भज परहिं घेइ ॥
॥ चरणांबुज सुखददावि ॥ विमला कृपाला ॥ नमन० ॥ १ ॥
॥ गजमुख हें नाम गोड ॥ मजशिं देइ हेचि जोड ॥
॥ पुरतिल मम सकल कोड ॥ नमितां पदाला ॥ नमन० ॥ २ ॥
॥ अनाथ हा दीन तारि ॥ दुस्तर भवजलधि वारि ॥
॥ विषयमोह सकल सारि ॥ शमवीं मनाला ॥ नमन० ॥ ३ ॥

---

श्लोक ( शार्दूलविक्रीडित ).

राग पिलू.

॥ वंदी मी जगदीश्वरा सुयश दे ग्रंथीं मला या महा ॥
॥ केला लोकहिता प्रयत्न वरवा देवा जनां प्रेम हा ॥
॥ अज्ञानें रचितों रुची बुधजनां लाधोचि ऐशी हरी ॥
॥ जैसा अस्फुट बालशब्द पितरा संतोषवी अंतरीं ॥

---

श्लोक.

॥ शास्त्रें बहू गहन जीं सुरसाळ हो तीं ॥
॥ अभ्यासिल्यावर मती अतिलीन होती ॥
॥ लागावया नय जनां सुचती विचार ॥
॥ ऐसे विदेशिं निघती बुधधीर चार ॥

# चार मुशाफर.

शरदृतु प्राप्त झाली ह्मणजे आकाश अगदीं निरभ्र होऊन त्यास नीलवर्ण येतो. पर्जन्यकाळ अगदीं नाहींसा होत असतां ह्मणून नद्या, तलाव, विहिरी, इत्यादिकांचें पाणी स्फटिकाप्रमाणें स्वच्छ होऊन जातें. चिखलानें त्यास आलेले रस्ते सुकून ते गमनयोग्य होतात, व त्यांचे दोहोंबाजूंस हिरवें गवत वाढून तें गालीचे पसरल्याप्रमाणें भासूं लागतें. पर्जन्यकाळांतील विपुल जल सेवन करून संपूर्ण वृक्ष व लता, अति टवटवीत दिसतात. त्यांवरील पुष्पें विकसित होऊन फळें त्यास येऊं लागतात; व त्यांचा सुवास मत्तगजाच्या मदाप्रमाणें वायूबरोबर त्यांत मिश्र होऊन सर्व प्राणिमात्रांस मोह उत्पन्न करितो. जोंधळ्याचीं व बाजरीचीं कणसें, तुरीच्या व चवळीच्या शेंगा विकास आल्यामुळें वाटसरू लोक त्यांवर भ्रमरांप्रमाणें उड्या घालूं लागतात. पशुपक्ष्यांस भक्ष्यसमृद्धि मिळूं लागते. यामुळें ते मदोन्मत्त होत्साते दीर्घस्वर काढून मोठ्या आनंदानें उड्या मारितात. सायंप्रातःसमयास मंदसुगंध शीतल वायु वाहून त्वगिंद्रियास अनुपम सुख देतो. प्रभातकाळीं सूर्योदयापूर्वी मार्गक्रमण करणाऱ्या मुशाफरांस तेणेंकरून अति आल्हाद प्राप्त होतो. पक्ष्यांचा मनोरंजक किलकिलाट चालून कर्णेंद्रियास अतिशय सुख होतें. सूर्योदयापूर्वी व सूर्यास्तानंतर संधिप्रकाश पडून पृथ्वी अत्यंत शोभायमान दिसते. जिकडे तिकडे शेतें वाढून तिचे पृष्ठभागास चित्रविचित्र रंग दिले आहेत असा भास होतो; व त्यांत मधून मधून स्वच्छ जलाशय चमकतात. ते जसे काय तावदानें लाविलीं आहेत असे दिसतात. पृथ्वी दिवसास कल्पवृक्षाचा पिवळा पीतांबर नेसते व रात्रीं ल्हत्तापहारक चांदण्याचे योगानें ती श्वेतवस्त्र परिधान करिते असें मनास वाटतें. प्राणी, वनस्पति वगैरे सर्व पदार्थ या ऋतूंत रमणीय दिसतात, व ते पृथ्वीचे अंगावर अलंकाराप्रमाणें शोभा देतात.

अशा या अतिसुखकारक शरदृतूंत एके दिवशीं सायंकाळचा समय प्राप्त झाला आहे; सूर्यास्ताची वेळ अगदीं नजीक येऊन ठेपल्यामुळें ज-

लाशयांवर सूर्याचे तिरकस किरण पडून आरशाप्रमाणें त्यांचीं प्रतिबिंबें उठलीं आहेत; गगनचुंबित पर्वतांचीं शिखरें सुवर्णकळसाप्रमाणें दिसत आहेत; मंदवायूची झुळूक चालून ती वृक्षांस हिंदोळ्यांत घातल्याप्रमाणें डोलवीत आहे; घरोट्यांत जाण्याची वेळ नजीक आली असें समजून पक्षी आपले विहार पूर्ण करण्याचे तयारीस मोठ्या जलदीनें लागले आहेत; आणि जंगलांत चरणारीं गुरें व मेंढरें यांचे कळप डोंगरावरून उतरून गांवाकडे जाऊं लागले आहेत; अशा अत्युत्तम समयीं चार अति सुस्वरूप मदनासारखे मुसाफर बरोबरीनें घोडे चालवीत विचित्रपुरी नामक एका प्रख्यात शहराचे टप्प्यांत आले.

तें शहर दुरून त्यांस फारच सुशोभित दिसूं लागलें. त्यांतील दाट लागलेली झाडी कुंजवनाप्रमाणें दिसली. त्या झाडींतून देवालयांचीं व उंच उंच वाड्यांचीं शिखरें झळकून डोकावीत आहेत असें भासलें. त्या शहराचे तिन्ही बाजूंस एका विस्तीर्ण नदीचा वेढा पडला होता त्यामुळें जशी काय नागीण पसरली आहे असें वाटूं लागलें. त्या शहराचे पलीकडील पर्वतांचीं तुंग शिखरें आकाशास भेदून गेलेलीं दिसलीं. व सभोंवतालीं सर्व क्षितिज गोलाकार भासलें. याप्रमाणें ती सर्व शोभा व अस्तास जाणाऱ्या सूर्याचें विशाल बिंब पाहून त्यांचीं मनें फार सुप्रसन्न झालीं.

त्या चौघांनी पायांत किनखाबी पायजमे घालून पायमोजे घातले होते. व त्यांवर बूट चढविले होते. अंगांत रेशमी सदरे व त्यांवर वासकुटें घालून त्यांवर जरतारी अंगरखे घातले होते. डोक्यांस भरजरी मंदील फेटे बांधून कमरेस जरतारी शेले बांधिले होते. गळ्यांत मोत्यांच्या कंठ्या व हातांत पोंच्या घातल्या होत्या. ढाल, तरवार व पिस्तूल वगैरे सरंजाम कमरेस लटकाविलेला होता, व हातांत माशाचे चाबूक घेतले होते. त्यांच्या घोड्यांची कांति लिंबाप्रमाणें होती. त्यांवर इंग्रजी पक्के जीन व सरंजाम घातला होता. ते चवघेही सुमारें वीस वर्षांचे वयांत होते. ते अंगानेंच गौरवर्ण व चंद्रसूर्याप्रमाणें तेजःपुंज होते; आणि तितक्यांत त्या समयाची अलौकिक शोभा अवलोकन केल्यामुळें आनंदवृत्ति होऊन ते केवळ चार दिक्पाळांसारखे शोभूं लागले.

विचित्रपुरी हें फार पुरातन व विस्तीर्ण शहर असे. यांत मोठमोठीं नामांकित देवालयें व मनोरे प्राचीनकाळचे बांधलेले असत. मोठमोठाले वाडे अतिशय खर्च करून तयार केलेले असत. त्यांमध्यें पुरातन शिल्पकारांचे दगडावरील व लांकडावरील खोदींव कामाचे मासले पाहण्यासारखे असत. वस्ती अतिशय दाट घराशीं घर ठेलून लागलें होतें. त्यांतील मुख्य रस्त्यांची दिशा ईशान्यनैर्ऋत्य असे, व त्यांवरून आडवे तिडवे जाणारे शेंकडों लहान रस्ते व गल्लया असत, त्यामुळें नवीन मनुष्यास दिशाभूल होऊन, ते समजण्यास मोठी मुष्किल पडे. सर्व मुलखांतील माल तेथें विकावयास येत असे, त्यामुळें व्यापार मोठा चालून तेथील रहिवासी सुखी असत. निरनिराळ्या व्यापारी लोकांचीं दुकानें निरनिराळ्या रस्त्यांत असत, त्यामुळें ज्या रस्त्यांत जावें तेथें निराळे प्रकारची शोभा पाहण्यांत येई. नानाप्रकारचे माल, जरीचीं व कलाबतूचीं वस्त्रें, कांचेचें सामान, चांदीचीं भांडीं, जवाहीर, सुगंधी अत्तरांच्या कुप्या, वगैरे जिन्नस त्या त्या रस्त्यांत अशा व्यवस्थेनें मांडलेले असत कीं, परकीय मनुष्य त्या मार्गानें चालला असतां त्याला असा भास होत असे कीं, मी एखादें नामांकित प्रदर्शनच पाहतों आहें. याप्रमाणें तेथील व्यापाराचा व दुकानदारीचा थाट असे. ब्राह्मणआळींत गेलें ह्मणजे जिकडेतिकडे वेदघोष, अग्निहोत्रें, अनुष्ठानें, व ब्राह्मणभोजनें चाललीं आहेत असें दृष्टीस पडे. प्रत्येक देवालयांतून पुराणें चालत, व तेथें संध्याकाळचे वेळेस स्त्रिया व पुरुष यांचा थाट जमला आहे असें दृष्टोत्पत्तीस येई. रात्रौ कुणबी, लिंगाईत, परदेशी, गुजराथी, वगैरे लोकांचीं पुराणें रस्त्यांतून चालत. कोठें कोठें नाच, तमाशे, चित्रकथीचे खेळ, जादूचे खेळ, जुवे, अशा प्रकारच्या करमणुकी करून लोक वेळ घालवितात असें पाहण्यांत येत असे. एडक्यांच्या व हेल्यांच्या टकरा, कोंबड्यांच्या लढाया, अस्वल व माकडांचे नाच, गारोड्यांचे खेळ आणि गोपाळांच्या व कोल्हाट्यांच्या उड्या नेहमीं पाहण्यांत येत. नेहमीं कोठें तरी हल्यकल्य होऊन वाद्यांचा गजर निरंतर होई, व चार वाजल्यापासून संध्याकाळपर्यंत देवालयांतील चवघडे वाजून एकच गोंगाट होऊन जात असे. पेन्शनदार, इनामदार, सिरामदार, मोडून खाणारे,

भिक्षुक, गुलहौशी, आणि उडाणटप्पू वगैरे निरुद्योगी लोक मुख्यत्वेंकरून मध्याकाळचे वेळेस मोठ्या झ्याकीनें इकडून तिकडे फिरत, व जर कांहीं रम्यांत फट् आलें कीं, त्या जागीं पाहण्यास मोठ्या लगबगीनें धांवून येत. लहान लहान गल्ल्यांमधून, कुणबी, माळी, तेली, तांबोळी, यांचीं मुलें आणि ब्राह्मणांचीं उनाड मुलें एकत्र जमून आट्यापाट्या, विटीदांडू, वगैरे खेळ निरंतर खेळत असत. अशा त्या अपूर्व शहरांत ते चौघे मुशाफर अरण्यशोभा पाहून सानंदाश्चर्येंकरून युक्त होत्साते प्रवेश करिते आले.

या शहरांत चित्रपाल नामें राजा राज्य करीत होता. त्याचे जवळ कुबेराप्रमाणें संपत्ति असे. त्याचें राज्य मोठें विस्तीर्ण असून तें इंग्लिश लोकांचे राज्यापासून अगदीं स्वतंत्र होतें. विचित्रपुरी हें चित्रपालाच्या राज्याचें राजधानीशहर असून त्या शहराचे मध्यभागीं त्याचा राजवाडा होता. राजवाड्याचे मागचे बाजूस एक मोठा सुंदर बगीचा असे. त्या बगीचामध्यें नारळी, पोफळी, केळी, डाळिंबी, वगैरे सर्व प्रकारचीं झाडें असून, जाई, जुई, मोतिया, शेवती इत्यादि फुलझाडेंही मोठ्या मेहनतीनें लाविलीं होतीं. त्या राजास पुत्रसंतान नव्हतें, परंतु एक अतिउत्तम कन्या मात्र होती. तिला नुकतेंच चवदावें वर्ष लागलें होतें, म्हणून तिचे सर्व अवयव त्या समयास रेखले असून ती अप्रतिम शोभायमान दिसे. तिच्या स्वरूपाची कीर्ति सर्व पृथ्वीभर पसरून तिजला ती एक वेळ दृष्टीस तरी पडावी अशा उद्देशानें कैक राजेरजवाडे विचित्रपुरीचे आसपास तंबू ठोकून वर्षोगणती खर्च खात पडले होते. तिचें नांव पद्मनयना असें होतें. तिचें मुख चंद्रासारखें गोल असे. तिचे नेत्र कमळाप्रमाणें असत, भाल विशाल, व नाक चांफेकळीप्रमाणें सरळ असे. तांबड्या रत्नाप्रमाणें तिचे ओंठ शोभत, व हिरकण्यांप्रमाणें दंतपंक्ति दिसत. दोहों गालांवरील गुलाबी छटा तिच्या कनकासारख्या गौरवर्णावर फारच शोभायमान् दिसे. तिची मान सरळ असे, व छाती मदनानें अगदीं तुडुंबली होती. तिचे गोंडस हात रक्तोत्पलासारखे शोभत; व कंबर सिंहास लाजिवणारी असे. तिचे पाय कर्दळीस्तंभासारखे सरळ असत, व पावलें लहान असून बोटें सरळ असत. अशी ती बांध्यानें रेखली असून सा-

हसिक हास्यवदना होती. ती ऐन तारुण्याचे भरास आली होती. सर्वत्र ती त्या चित्रपाल राजाचे गृहांत विजलीसारखी चमके. तिच्या विवाहाचा समय प्राप्त झाला आहे असें तिचे बापास वाटून त्यानें तीस योग्य पति मिळावा ह्मणून पुष्कळ श्रम केले, परंतु व्यर्थ. मोठमोठे राजे आपणास तिनें वरावें ह्मणून मोठ्या थाटानें स्वारीनिशीं तिचे महालावरून जात; व तिची प्रीति प्राप्त करून घेण्यास हजारों उपाय करीत.

आमचे चार राजकीय मुशाफर जेव्हां विचित्रपुरी शहरांत येऊन पोहोंचले तेव्हां तेथील सर्व लोकांस असें वाटलें कीं, हे इंद्रचंद्रादि दिक्पाळच स्वरूपें पालटून दमयंतीचे स्वयंवराप्रमाणें पद्मनयनेची प्राप्ति करून घेण्यास आले आहेत. परंतु त्यांचे मनांत तसें नव्हतें. ते फक्त परोपकारबुद्धीनें गरीब लोकांचीं संकटें निवारण करण्यास आपलें शहर सोडून निघाले होते. त्या चौघांमध्यें पुष्पशील ह्मणून एक राजपुत्र असे. तो त्या सर्वांत फारच शोभायमान दिसे. त्याचे ओंठावर नुकतीच मिसुरं फुटून चालली होती. व भिवया रुंद असत. शरीर पुष्ट असून बांधा उंच असे. चेहरा मनोहर असून सदां हास्यमुख असे. त्याचे हनुवटीवरील ठेव त्याच्या तेजःपुंज मुखावर अत्यंत शोभिवंत दिसत असे. अशा त्या आजानुबाहु मदनमूर्तीस पाहून सर्व लोक चकित झाले. तो आपले तिघां सोबत्यांबरोबर त्या विचित्रपुरी शहरांतून चालला असतां सर्व नागरिक लोक त्याचे तोंडाकडे टकमका पाहूं लागले. त्यांत ज्यांनीं पद्मनयनेस पाहिलें होतें ते आपले मनांत ह्मणत, "आहाहा! काय दिव्य शरीर हें!! पद्मनयनेकरितां विश्वकर्म्यानें हाच जोडा तयार केला असावा!!"

ते चवघेही चौशाहाणपूर शहरचे राहणारे होते. त्यांनीं कलकत्याचे युनिव्हर्सिटींत अभ्यास करून ते सर्वही एम्. ए. च्या परीक्षेंत पसार झाले होते. पुष्पशीलाचा बाप भरतसिंग हा चौशाहाणपूरचा राजा असे. त्याचेंही राज्य मोठें विस्तीर्ण असून अगदीं स्वतंत्र असे. त्या राज्याचे एका बाजूस इंग्लिश लोकांचें राज्य लागलेलें असे; बाकीच्या तीन बाजूंपैकीं एका बाजूस चित्रपाल राजाचें राज्य, व एका बाजूस आणखी एका हिंदु राजाचें राज्य; आणि चवथे बाजूस हिमालय

पर्यंत असे. हिंदुलोकांचे राज्यांत ऐषआराम ज्यास्ती व विद्या कमी यामुळें फार अंदाधुंदी चालते; आणि इंग्लिश लोकांचे मुलखांत विद्यावृद्धि असल्या कारणानें राज्य फार सुरळीत चलतें. हें जाणून भरतसिंग राजानें पुष्पशीलास इंग्रजी शिकलेल्या एका विद्वानाकडून प्रथम घरीं अभ्यास करवून नंतर त्यास कलकत्याचे युनिव्हर्सिटींत पाठविलें होतें. भरतसिंग राजानें आचरण पाहून त्याच्या राज्यांतील दुसरे लोकांनींही आपलीं मुलें पुष्पशीलाबरोबर इंग्रजी शिकावयास पाठविलीं होतीं. त्यांमध्यें एक मुलगा त्याचे प्रधानाचा धैर्यशील ह्मणून होता. तो फारच बुद्धिमान व धैर्यवान असे. एक मुलगा भरतसिंगाचे दरबारचे शास्त्र्याचा मनोहरपंडित नामें होता; व एक चौशाहाणपुरांतील एका गर्भश्रीमंत सावकाराचा मुलगा असे. त्याचें नांव श्यामसुंदर होतें. ते चौघेही वर लिहिल्याप्रमाणें एम्. ए. च्या परीक्षेंत पास आले होते.

याप्रमाणें त्या चौघांनीं कलकत्त्यास अभ्यास केल्यावर आपआपले उद्योगास लागण्यापूर्वीं निरनिराळे देशांची रीतभात पहावी, व आपले मुलखांत काय न्यूनता आहे हें नीटकरून समजावें आणि एकंदर जगताचे कल्याणास आपण कारण व्हावें, वगैरे उद्देश मनांत आणून त्यांनीं देशाटनास आरंभ केला होता. ते निरनिराळे देश व शहरें पाहत व नानाप्रकारच्या लोकसमजुतींचा अनुभव घेत विचित्रपुरीस आले होते. मनोहरपंडित व श्यामसुंदर यांचीं श्वशुरगृहें याच शहरांत होतीं; व यांचीं कुटुंबेंही दिवाळसणाकरितां माहेरीं आलेलीं होतीं. विचित्रपुरींत येण्याचे अगोदर त्यांणीं आपल्या आगमनाचें वर्तमान कळवून सर्व स्वारीचा पुढें पाठविला होता; याकरितां त्यांचे सासरे सर्व तयारी करून त्यांस सामोरे आले होते. सर्वांच्या भेटी झाल्यावर मोठ्या थाटानें ते सर्व राजवाड्यावरून चालले. तेसमयीं पद्मनयना आपल्या महालाचे खिडकींत उभी राहून चिकाच्या पडद्यांतून रस्त्याकडे पाहत होती. तिला त्या वेळीं जसा तारांगणांत चंद्र अति तेजःपुंज दिसतो तसा पुष्पशील त्या समाजांत दिसला. त्याचें तें मदनास लाजविणारें स्वरूप पाहून ती अगदीं मनांत मदनबाणेंकरून वेधिली गेली. तिणें तत्काळ हा पुरुष कोण, कोठील, व येथें कशास

आला आहे याचा शोध करण्यास त्यांनी मागितलें; आणि आपण त्याची आकृति अगदीं अदृश्य होईतोंपर्यंत पाहत उभे राहिली.

जशी **पद्मनयने**च्या स्वरूपाची व गुणांची कीर्ति होती, तशीच **पुष्पशीला**च्या स्वरूपाची व गुणांचीही कीर्ति सर्वत्र होती. **पद्मनय-नेस** योग्य वर मिळावा अशाविषयीं पुष्कळ खटपटी होऊन अखेरीस **पुष्पशीला**सच द्यावी असा **चित्रपाल** राजानें निश्चय केला होता; व याबाबद **भरतसिंग** राजाकडे पत्रव्यवहार होऊन व उभयतां वधूवरां-च्या तसबिरी एकमेकांनीं काढून नेऊन विवाहाविषयीं पक्का ठराव के-ला होता. **पद्मनयने**नें **पुष्पशीला**ची तसबीर पाहिली होती; व त्या-मुळेंच **पुष्पशीला**स पाहतांबरोबर तिला विलक्षण आश्चर्य वाटून अशा साध्या पोषाखानें हा राजपुत्र येथें येणें अशक्य असा संशयही तीस आला. परंतु तीस मनापासून वाटलें कीं, ईश्वर करो आणि हाच **पुष्प-शील** असो; आणि यदाकदाचित हा **पुष्पशील** नाहीं असें ठरलें, त-थापि बापाचा विचार मनास न आणितां मी याच पुरुषास वरण्याचा हट्ट धरीन. याच्यासारखा सुस्वरूप व माझ्या स्वरूपाला लायक दुसरा पुरुष या जगांत असेल असें मला वाटत नाहीं. यानें आपलें स्वरूप येथें प्रकट करून माझे अंतःकरणास चटका लाविला आहे. आतां मला या व्य-तिरिक्त दुसरे वर तुच्छ वाटतात, व हा प्राप्त झाल्यावांचून माझें मन स्थिर होणार नाहीं.

**पुष्पशीला**च्या मनांतही राजवाड्यावरून जातां जातां **पद्मनयना** आपल्या दृष्टीस पडावी असें होतें; व त्याकरितां तो चकोरदृष्टीनें राजवाड्याकडे पाहत जाऊं लागला. त्यामुळें **पद्मनयने**स त्याचें लाव-ण्यस्वरूप स्पष्ट दिसून आलें; परंतु **पुष्पशीला**स त्या कनकलतिकेचें मुखरूप बिलकुल दिसलें नाहीं. असो. **मनोहरपंडित** व **श्यामसुंदर** यांच्या सासऱ्यांनीं त्यां सर्वांस एक उत्तम महाल तयार केला होता तेथें नेलें. त्या वाड्यांतील दिवाणखान्यांत सर्वत्र गालीच्यांची बैठक टाकून तीवर गाद्या मारलेल्या अनेक खुर्च्या व मध्यभागीं एक उत्तम कपड्यानें आच्छादिलेलें वर्तुलाकृति टेबल मांडिलें होतें. पांच सहा नरम बिछायत केलेलीं कोचें मांडिलीं होतीं; व दोन तीन छप्परपलंग निरनिराळ्या रंगांच्या मच्छरदाण्या टाकलेले निरनिराळ्या खोल्यांतून

मांडिले होते. सर्व भिंतींस उत्तम रंग देऊन त्यांवर मोठमोठाले आरसे व तसबिरी लाविल्या होत्या. वरच्या बाजूस सुंदर छत दिलेलें असून हंड्या व झुंबरें टांगलीं होतीं. वर्तुलाकृति टेबलावर अगदीं नजीक येऊन, तेथें सारा एक चंद्रप्रकाश दीप लाविला होता, व टेबलावर कांचेच्या प्याल्यांत नानातऱ्हेच्या सुवासिक व सुंदर पुष्पांचीं झाडें बनवून, ते मांडिले होते. यांशिवाय गुलाब, मदनबाण, मोगरा, इत्यादि पुष्पें व त्यांच्या कळ्यांचे गजरे एका चांदीच्या ताटांत घालून ठेविले होते; व नानातऱ्हेच्या अत्तरांच्या कुप्या, आणि पिकलेल्या पानांच्या विड्यांनीं भरलेलीं ताटें ठेविलीं होतीं.

अशा त्या सुंदर महालांत श्रीमंत श्वशुरांनीं गर्भश्रीमंत व विद्वान् अशा त्या तरुण मुशाफरांस उतरण्यास जागा दिली. संध्याकाळीं मनोहरपंडिताच्या सासऱ्यांचे घरीं मेजवानीचा थाट आला. तेथें गुलाल, पिंवडी, सफेता व जंगल इत्यादि द्रव्यांच्या उंची रंगांनीं सुशोभित अशा चतुर लोकांकडून रांगोळ्या घातल्या होत्या. एका सोन्याचे व चांदीच्या फुल्या मारलेले पाट मांडिले होते. प्रत्येक पानापाशीं एक एक स्वच्छ खोबरेल तेलानें जळणारी समई मांडिली होती. सर्वांस मोठमोठालीं चांदीचीं ताटें व पांचपांच वाट्या मांडिल्या होत्या. प्रत्येक ताटापाशीं एक एक पितळेच्या घरांत सुवासिक उदबत्ती लाविली होती; व प्रत्येक पाटावर एक एक मोतियाचा गजरा ठेविला होता. याप्रमाणें तयारी आल्यावर गांवांतील जे संभावित लोक त्यांच्या पंक्तीस बसण्याकरितां बोलाविले होते ते सर्व आल्यावर हे चार विद्वान् जरीकांठी पीतांबर नेसून व शालजोड्या पांघरून आले. हे येतांच सर्व उठून उभे राहिले. व हे आपल्या जातीअन्वयें नेमलेल्या जागीं बसल्यावर सर्व लोक जागजागीं बसले. हे येतांच वाढणाऱ्या तरुण मुलींची धांदल उडून गेली. त्या एकमेकींशीं मोठ्यानें भाषण न करितां अगदीं हळू बोलूं लागल्या; व आंतील स्वयंपाक करणाऱ्या आचाऱ्यास व वृद्ध स्त्रियांस लवकर लवकर आमचेकडे अन्न टाका अशी जलदी करूं लागल्या. वाढणें झाल्यावर सर्व मंडळी मोठ्या आनंदानें भोजन करूं लागली. भोजनास नानाप्रकारच्या खिरी व कोशिंबिरी होत्या. दहा बारा भाज्या व पंचामृतें वाट्यांतून होतीं. यांशिवाय जि-

खिचडी, खिचर, श्रीखंड व मांडे अशी पक्वान्नें होतीं; व लोणकढें तूप आणि अस्सल मुबारिक आंबेमोहराचा भात होता. या रीतीनें मो-ठ्या आदरानें आणि प्रीतीनें भोजन आटोपल्यावर पानसुपारी, अत्तर, गुलाब सेवन करून ते राजकीय मुशाफर आपल्या बिन्हाडीं येऊन गच्चीवर खुर्च्या टाकून आनंदाचीं भाषणें करूं लागले:

पुष्प०—धैर्यशीला, आज या जांवयाच्या संगतीनें आपली खूप चैन होत आहे!

धैर्य०—खरेंच; नाहीं तर आपणांस येथें कोण विचारीत होता!

मनो०—वाहवा! ठीक; महाराज आपण राजे, उपराजे येथें आलां म्हणून असा थाट उडाला. नुसते आम्हीच आलों असतों तर आमचा सन्मान तितक्यापुरताच झाला असता.

धैर्य०—बरें असो. पण आपण आज या शहरांत आलों हें या जांवयांच्या फार पथ्यावर पडलें.

पुष्प०—धैर्यशीला, तें विचारूं नको. त्यांस वाटत असेल कीं, आम्ही आज विचित्रपुरींत आलों नाहीं; तर इंद्रपुरींत आलों आहों.

श्याम०—पुष्पशीला! खरेंच सांगतों, हे विचार, तुझ्याच मनचे आहेत; कारण विचित्रपुरीस येण्याची जलदी कोण करीत होता याचा विचार कर.

धैर्य.—(किंचित् हांसून) काय! येथें येण्याची जलदी मी क-रीत होतों!

मनो०—यांत काय संशय! रस्त्यांत असतां विचित्रपुरीस जा-ण्याची जलदी आपण केली एवढेंच नव्हे तर, घराहून निघण्याचीही घाई आपणच केली.

धैर्य०—आणि खरेंच; प्रथमतः चित्रपालाच्या राज्यांत फिरून नंतर दुसरीकडे जाऊं असा अभिप्रायही यांनेच दिला, याचें कारण काय असेल तें असो.

पुष्प०—(मोठ्यानें हांसून) अरे काय चमत्कार हा! तुम्ही स-र्वच मजवर उलटलां, आतां काय करावें!

धैर्य०—श्यामसुंदरा, याचें कारण काय असावें रे!

**श्याम**०—मी सांगतों. त्या दिवशीं **भरतसिंग** महाराजांकडे इंग्लिश कारागिरानें यंत्रानें काढलेली एक तसबीर आली होती; आणि त्या दिवसापासून **पुष्पशीलाचें** मन अगदीं चंचळ आल्याप्रमाणें दिसतें.

**धैर्य**०—हं हं; आतां मी समजलों. ती तसबीर **पद्मनयनेची** असावी. आणि या शहरांत त्वरित येण्याची ओढ करण्याचें कारण तिचें स्वरूप दृष्टीस पडावें हेंच असेल.

**मनो**०—**पुष्पशीला** शाबास! आतां आपण या शहरांतून लौकर कशास निघालों?

**पुष्प**०—मीं तुह्मास खरें सांगण्यास लाजत नाहीं. पहा मित्रहो, **श्यामसुंदर** ह्मणतो तें कांहीं अंशीं खरें आहे. त्या चारुगात्रेची तस्बीर मीं पाहिल्या दिवसापासून मला अगदीं चैन पडत नाहीं. मी पुष्कळ तऱ्हेनें मन स्थिर करण्यास यत्न करितों परंतु काय करूं? कांहीं इलाज चालत नाहीं. त्या हरिणाक्षीनें माझें मन मोहून टाकिलें आहे.

**धैर्य**०—अरे, तूं असा अधीर कां होतोस? थोडकेच दिवसांनीं तिच्याशीं तुझा विवाह होऊन तूं अनुपम सुख भोगूं लागशील.

**पुष्प**०—**धैर्यशीला**, तूं ह्मणतोस तें सर्व खरें, परंतु माझ्या मनाची स्थिति कशी झाली आहे हें सांगतां येत नाहीं.

**धैर्य**०—तें असो. परंतु मला हें शहर पाहून विलक्षण चमत्कार वाटतो. असें शहर आपण आजपर्यंत पाहिलें नव्हतें.

**श्याम**०—यांत सुधारणुकीचें चिन्ह कांहींच दिसत नाहीं. मला तर हें शुद्ध वक्राचें शहर दिसतें.

**मनो**०—येथील लोकांचे पेहराव काय चमत्कारिक, व भाषा तरी किती विलक्षण आहे पहा. मला तर येथील लोकांचें बोलणें ऐकून हांसूंच येतें.

याप्रमाणें त्यांचीं भाषणें होत आहेत तों नऊ वाजले; इतक्यांत **श्यामसुंदराच्या** मध्यस्थीनें एक उत्तम गवई, गायन करण्यास आणिला. त्याच्याबरोबर दोन मुलें होतीं त्यांनीं फारच मजा केली. त्यांत खालीं लिहिलेली चीज ऐकून तर सर्वांनीं एकदांच वाहवा केली:—

## ठुंबरी.

( सं० सौभद्रांतील " आली ज्याची उपवर दुहिता " या चा० )

वागिं गुलाबी कळि जशि फुलते ॥ मधुकर घालिति
झडप तियेतें ॥ ध्रु० ॥ तरुणी रमणी पाहुनि तेवीं
कामी पुरुषा प्रेमांच येतें ॥ बागिं० ॥ १ ॥ अलि-
कुल व्याकुल फारचि होती ॥ मोहक कलिका पाहु-
नि नव ते ॥ बागिं० ॥ २ ॥

गायन आल्यानंतर श्यामसुंदर व मनोहरपंडित हे आपल्या श्वशुर-गृहीं निद्रा करण्यास गेले; व पुष्पशील आणि धैर्यशील हे त्यांच महालांत निजले.



# भाग २.

## औत्सुक्य.

दुसरे दिवशीं ते चार विद्वान् शहरांतील मुख्य मुख्य रस्ते पाहून आले. नंतर पुष्पशीलाचा खाजगी नौकर मोहनलाल यानें संधि पाहून त्यास खुणेनें एकांतांत नेलें. तेथें पुष्पशील खुर्चीवर बसला असतां मोहनलाल पुढें उभा राहून हात जोडून ह्मणतो:—

मो०—(हांसून). महाराज, आज्ञा होईल तर एक वर्तमान सांगतों.

पुष्प०—( मोठ्या उत्कंठेनें ) मोहना, काय आहे? सांग, सांग लवकर पाहूं!

मो०—महाराज, कालरात्रीं आपण मेजवानीस गेलां होतां त्या वेळेस येथील राजकन्येची दासी येऊन तिणें मजपाशीं आपलेविषयीं पुष्कळ पुसतपास केली.

पुष्प०—(मोठ्या उत्सुकतेनें हांसून). खरें काय? मोहना, खरें सांग.

मो०—महाराज, मी आपल्याशीं कधीं खोटें बोलेन काय? माझी मगदूर आहे असें करण्यास!

पुष्प०—( आनंदानें उठतो ). अहाहा! मोहना, तुला माझ्या गळ्याची शपथ आहे; मनमोहिनीची दासी तुजजवळ काय काय बोलली तें अगदीं अक्षरशः सांग.

मो०—महाराज, ती ह्मणाली कीं, संध्याकाळच्या वेळेस या वाड्यांत जे चार पुरुष—

पुष्प०—( मध्येंच रागावून ). बस् बस्. मोहना, तुजसारखा मूर्ख मीं आजपर्यंत पाहिला नाहीं. अरे, ती दासी कशी होती; तिचा पेहराव कसा होता; ती येथें कशी आली; तिची मुद्रा त्या वेळेस कशी दिसली; हें सांगितल्याशिवाय एकदम ती काय बोलली हें कसें सांगतोस? तुझ्या अंगीं तारतम्यज्ञान फार कमी दिसतें.

मोह०—महाराज, आपल्या मनाचा ओढा तिचें भाषण त्वरित ऐकावें असा दिसला ह्मणून तशी चूक झाली, माफी असावी सरकार. त्या वेळेस सूर्याचा प्रकाश नाहीसा होऊन अर्धचंद्रबिंबाचा प्रकाश

नुकताच आकाशांत संचार करूं लागला होता. दिक्सुंदरी लाल वस्त्र परिधान करून हास्यमुखानें पृथ्वीकडे पहात असें दिसत होतें. आपला पति सूर्य एकीकडे गेला असें समजून तारांगना संशयात्मक व सलज्ज होत्सात्या डोकावून पहात होत्या. अशा वेळीं त्या राजकन्येची दासी एका घोड्याच्या गाडींत बसून आली; आणि गाडी लांब उभी करून पुढें एक मनुष्य तिणें पाठविला. तो येऊन हळूच ह्मणाला, ' पुष्पशील महाराज येथें आले आहेत काय ? ' त्यावर जेव्हां मी होय ह्मटलें, तेव्हां तो ह्मणाला, ' त्यांच्या नौकरास बाईसाहेब बोलावितात. हें त्याचें भाषण एकतांच मी तत्क्षणीं कोणच्या बाईसाहेब आहेत तें पहावयास गाडीपाशीं गेलों.

पुष्प०—संभाळ मोहना; आतां तर एक वर्णही गाळूं नकोस. मला त्या हरिणाक्षीच्या मनांतील सर्व भावार्थ ओढून काढणें आहे.

मो०—मी गाडीजवळ जाऊन पाहिलें तों ती दासी तरी किती सुंदर होती ह्मणून सांगूं ! ! ! तिचा वर्ण कनकीसारखा गोरा होता व हातपाय अगदीं रेखलें होते. तिच्या अंगावर पुष्कळ दागिने होते; व ती लाल तपसीला नेसली होती. तिची गाडी एन्यासारखी चकचकीत होती; व तींत अति नरम गाद्या मारल्या होत्या.

पुष्प०—आणि मोहन्या, तूं असल्या राजकीय दासीपुढें पुष्पशीलाचा चाकर ह्मणून असा दीनवाणा जाऊन उभा राहिलास ना?

मो०—छिः महाराज; इतका मी वेडा आहें काय? त्या वेळेस माझ्या अंगांत आपला जरतारी चोबदारी अंगरखा होता; व डोक्यास लफफ्यानें पिळदार शिपाइगिरी पागोटें एके कानावर घातलेलें होतें. याशिवाय आपणास ओझें होतें ह्मणून मला दिलेला साठ तोळ्यांचा सोन्याचा गोफ माझ्या गळ्यांत होता; व हे सुपारी एवढाल्या मोत्यांचे चौकडे तर माझ्या कानांत सदोदित आहेतच.

पुष्प०—तुझ्या तरी मिशाविशांचाही थाट ठीक आहे. बरें पुढें काय झालें?

मो०—मला पहातांच तिणें आपल्या हातांतील सुवर्णाचें कंकण लगबगीनें काढून मजपुढें केलें; आणि ह्मणाली, ' नाईक साहेब, हें घेऊन, मी विचारतें तो मजकूर खरा निवेदन करा. '—

पुष्प०—( मोठ्या आवेशानें ) आणि मूर्खा, तूं तें कंकण घेतलें काय? अरे मी तुला तशीं शंभर कंकणें दिलीं असतीं.

मो०—महाराज, पुरतें ऐकिल्याखेरीज मला दोषी ठरविल्यास नाइलाज आहे. तिणें मला दाखविलें, पण मी तें न घेतां तीस ह्मणालों: "बाईसाहेब, मला हें कशाला देतां? मी रात्रंदिवस सोन्यामोत्यांत लोळत आहें. आपणास काय विचारणें तें बिनधोक विचारा; मी निष्कपटपणें आपणास सर्व निवेदन करितों."

पुष्प०—शाबास, मोहना शाबास! ल्हूप कडी ठेवून दिली. ही घे तुला एक सोन्याची कंठी. बरें मग?—

मो०—नंतर तिणें माझा हात आपल्या हातीं घेऊन आपल्या गळ्यावर ठेविला, आणि ह्मणाली, 'नाईक साहेब, तुह्मास या गळ्याची आण आहे; खरें सांगा. चौंशाहाणपुरचे पुष्पशील महाराज येथें आले आहेत काय?' असें तिचें भाषण ऐकून मी ह्मणालों, 'होय ते आतांच येऊन मजलसीस गेले आहेत. परंतु आपणास त्यांचा शोध करण्याचें इतकें जरूरीचें काय काम? तें जर मला कृपा करून सांगाल तर मी आपला फार आभारी होईन.'

पुष्प०—वाः! चांगलें आपण केलें. त्यावर ती काय बोलली?

मो०—ती ह्मणाली, 'मग ते, पुष्कळ मंडळीसहवर्तमान मोठ्या झोकानें राजवाड्यावरून गेले; त्या वेळेस आमच्या पद्मनयनाबाईसाहेबांनीं त्यांस चिकाच्या पडद्यांतून पाहिलें. त्यांनीं त्यांची तसबीर अगोदर पाहिली होती त्यावरून त्यांस त्यांच्या लावण्यस्वरूपाची ओळख पटली आहे. परंतु पुष्पशील महाराज येथें अकस्मात कसे आले, असा संशय आल्यावरून त्यांणीं मला पक्का शोध काढण्यास सांगितलें.' इतकें ती बोलल्यावर आपण येथें कशाकरितां आलां व येथें अजमास किती दिवस मुक्काम होईल, वगैरे तिणें प्रश्न केले, व त्यांचीं उत्तरें मीं यथास्थित दिलीं.

पुष्प०—मोहना, ती भेटीविषयीं कांहीं बोलली कायरे?

मोह०—त्याविषयींही किंचित् बोलली; परंतु तें वर्तमान आपल्या कानावर जाऊं नये ह्मणून तिणें मला माझ्या बापाची शपथ घातली आहे.

**पुष्प०**—**मोहन्या**, तुझा बाप मला तरी बहत्तर आहे. मी तुझ्या बापाहून तुझें अधिक प्रतिपालन करीन; परंतु ती भेटीविषयीं काय बोलली, तें सगळें सांग.

**मोह०**—महाराज, अवेरीस ती हांसून इतकेंच अगदीं हळूच ह्म. णाली कीं, **पुष्पशील** महाराज आमच्या राजवाड्यांत भेटीस येऊ शकतील काय? ही गोष्ट बाईसाहेबांनीं मला विचारण्यास सांगित ली नाहीं, परंतु मी आपली उगीच चौकशी करून ठेवितें.

**पुष्प०**—(मोठ्या हर्षानें) **मोहना**, या प्रश्नाचा जबाब कसा दि ला पाहिजे कीं अगदीं फक्कड!

**मोह०**—महाराज, माफी असावी; मी ह्मणालों, महाराज येथें कांहीं जरूरीच्या कामाकरितां आले असून येथें मुक्काम फारच थोडे आहेत; तितक्यांत मित्रमहानंदांत व विद्यामृतसेवनांत महाराज रात्रंदिवस अगदीं निमग्न असतात, तस्मात् त्यांस भेटीस येण्यास फुरसत होणें कठिण.

**पुष्प०**—मोहना, हें उत्तर बाह्यात्कारें दाखविण्यास गोड, परंतु अंतःकरणापासून नाहीं.

इतकें बोलून चाकर निघून गेल्यावर **पुष्पशील** बिछान्यावर पडून मनाशीं ह्मणतोः—"अरे, काय चमत्कार हा! ज्या **पद्मनयनेच्या** स्वरूपास सारें जग भुलून गेलें आहे, ती मजकरितां इतकी उत्सुक झाली आहे काय? तिचा यत्किंचित् कल दिसला तर मी डोक्यानें चालत जावें अशी तिची योग्यता असून ती अत्यंत प्रीतीनें गुप्तरूप महालांत भेटीस बोलवीत असता माझा चाकर मला बनणार नाहीं असें सांगतो. किती मूर्खपणा हा! यावरून ती आपल्या मनांत समजेल कीं, माझ्या अंगांत प्रीतिलक्षण कमी आहे. छिःछिः, मोहन्यानें असा जबाब दिला हें अगदीं गैर केलें. प्रिये, माझ्या मानसांत इतकी कठोरता नाहीं बरें. जर तूं माझें अंतःकरण शोधिशील तर तुला आढळेल कीं, माझ्या हृदयांत तसबीर पाहिल्या दिवसापासून तुजशिवाय दुसरें कांहीं खेळत नाहीं. माझें तन मन तल्लीन होऊन तुझें चंद्रानन त्वरित दृष्टीस पडावें अशी इच्छा करीत आहे. तुझें स्वरूपामृत नयनद्वारें प्राशन करण्याची, आणि तुझें वचनामृत

कीर्ति आबालवृद्धांच्या तोंडीं आहे तें तुझें लावण्यस्वरूप मला ल वकरच दिसणार काय? किती दैव थोर हें!! चाकरास हाक मारितो ) मोहना, अरे मोहन्या, इकडे ये.

**मोह०**—जी सरकार.

**पुष्प०**—अरे, आज संध्याकाळच्या वेळेस तूं शानदार पोषाख कर; आणि मोठा मोत्यांची कंठी वगैरे दागिने घालून माझ्या जरद्या घोड्यावर बसून राजवाड्याकडे महल करण्यास जा; आणि युक्ति प्रयुक्ति करून तुला जी दासी भेटली होती तिची गांठ घे. पण संभाळहो, काम फार नाजूक आहे.

**मोह०**—सरकार, आपण त्याविषयीं बिलकुल भिऊं नका. तिची भेट घेऊन तिजवर अशी छाप ठेवितों कीं, ती सत्रा खेपा पायां पडेल.

**पुष्प०**—( हांसून ) हें पहा, आपणास जरूर नाहीं असें दाखवून त्यांच्याचकडून तिची एकांतीं भेट घेण्याचा घांट घालायचा आहे. समजलास ना? संभाळ.

**मोह०**—जी सरकार, आपण बिनफिकीर रहा. काम अगदीं फक्कड करितों.

**पुष्प०**—याबद्दल काय मजकूर होईल तो मला रात्रीं एकांतीं कळीव बरें का?

**मोह०**—आज्ञा सरकार.

असें चाकरास सांगितल्यानंतर पुष्पशील आपल्या मित्रमंडळींत आला. नंतर भोजन वगैरे झाल्यानंतर ते सर्व बग्गींत बसून नदीतीरानें हवा खाण्यास गेले व शहरांतही बरेच फिरले. रात्रीचें भोजन आटोपल्यानंतर कांहीं गायन व गप्पा वगैरे होऊन सर्व मंडळी आपआपल्या ठिकाणीं निद्रा करावयास गेली. तों बारा वाजण्याचा सुमार झाला. पुष्पशील आपल्या पलंगावर गेला असें पाहून संकेताप्रमाणें मोहनलाल त्याच्या जवळ गेला. तो जवळ येतांच पुष्पशील उठला आणि त्याचा हात धरून त्यास एका बाजूस नेऊन काय मजकूर झाला तो विचारूं लागला:—

**पुष्प०**—**मोहना**, कां रे मग राजवाड्याकडे गेला होतास?

**मोह०**—होय, सरकार. काम फत्ते करून आलों आहें.

पुष्प० —( मोठ्या हर्षानें ) कसें काय आलें सांग पाहूं.

मोह० — सरकार, मी राजवाड्यावरून ऐटीनें चाललों असतां तीच दासी अनायासें खिडकींत उभी होती. तिला मी खुणावतांबरोबर ती त्वरित मजकडे आली; आणि तिनें माझ्या घोड्याचा लगाम हातीं धरून मागील दरवाजानें घोडा आंत नेला. नंतर तिनें मला एका चवतऱ्यावर बसवून आपण वर महालांत गेली. आणि सुमारें पंधरा मिनटांनीं परत मजकडे आली; तेसमयीं तिचा माझा बराच संवाद झाला. अखेरीस तिनें मला शपथ घालून गुप्तीनें असें सुचविलें कीं, जर महाराजांची आमच्या बाईसाहेबांच्या महालांत भेटीस येण्याची इच्छा असेल तर त्याबद्दल मी बाईसाहेबांची संमति खातरीनें मिळवीन. त्यावर मीं तीस असा जबाब दिला कीं, जर तुझ्या बाईसाहेब तुझ्या स्वाधीन आहेत, तर माझे महाराजही माझ्या स्वाधीन आहेत. याकरितां तूं बाईसाहेबांस विचार आणि जर त्यांची मर्जी असेल तर जेव्हां ह्मणाल तेव्हां मी महाराजांस आणीन अशी माझीही खातरी आहे. त्यावर ती ह्मणाली: "बरें तर आजच्याच रात्रीं दहा वाजतां आणा बरें, मग तुमची तारीफ आह्मी समजूं." मी ह्मणालों, "बरें आहे, याचा चमत्कार पहा."

याप्रमाणें बोलणें झाल्यानंतर रात्रीं पहारा करणाराची ओळख वगैरे करून घेऊन मी निघून आलों.

पुष्प०—मोहना, तर मग आतांच निघालें पाहिजे काय?

मोह०—होय, जरा उशीर झाला आहे; परंतु हरकत नाहीं.

पुष्प०—तिच्याशीं तूं दहा वाजतां येण्याचा करार केला होता ना! पण हल्लीं बारा वाजले आहेत, मग कसें?

मोह०—कांहीं हरकत नाहीं, आपण आतां जास्त उशीर करूंनका.

नंतर पुष्पशीलानें राजकीय चालीप्रमाणें पायांत किनखाबी पायजमा व पायमोजे घातले, व त्यावर कलाबतूनें मढविलेले बहुमोल बूट चढविले. अंगांत रेशमी सदरा घालून त्यावर कलाबतूचा कशीदा काढलेलें बासकुट घातलें; आणि त्यावर अमोल किमतीचा हिरकण्या जडविलेला भरगच्ची अंगरखा घातला. डोक्यास भरजरी मंदील बांधून

त्यावर तान्या मारखा चमकणारा हिरेजडित शिरपेंच बांधला. गळ्यांत अति तेजःपुंज रत्नजडित कंठी घातली. व बोटांत मूल्यवान हिऱ्यांच्या अंगठ्या घातल्या. बंडीच्या कप्प्यांत सोन्याचें घड्याळ व त्याची सुवर्णाची सांखळी रत्नजडित किल्ल्यांसह गुंड्यांस अडकविली. एके हातांत सोन्याच्या तारेनें गुंफलेली छडी घेतली, व दुसऱ्या हातांत मोतीयांचा गजरा घेतला. मोहनलालाकडून शिपायीगिरी पोषाख करविला, व त्याच्या कंबरेस ढाल तरवार व दारू गोळ्यांसह पिस्तूल अडकविला.

याप्रमाणें पोषाख करून ते दोघे गुप्तरूपें राजवाड्याकडे चालले. त्या वेळेस जिकडे तिकडे अगदीं शांत झालें आहे; चंद्रास्त होऊन काळोख अतिशय पडला आहे; राजवाड्याचे सर्व दरवाजे बंद असून तेथें मंत्र्यांस पहारे आहेत; आणि सर्व राजवाड्यासभोंवतीं दोन पुरुष उंचीचा चिरेबंदी परकोट आहे असें दिसलें. कोटाच्या भिंतीवर पन्नास हातांच्या अंतरानें एक एक संत्री तोडा पेटविलेली बंदूक खांद्यावर घेऊन पहारा करीत आहे व "हुशार" असा शब्द करून दुसऱ्यास इशारा करीत आहेत. त्या शिपायांची काळी आकृति नक्षत्रप्रकाशानें छाये सारखी दिसली. व बंदुकांचे गज काजव्यासारखे चमकत आहेत, असें भासलें.

अशा त्या राजवाड्यापाशीं येतांच पुष्पशील दूर उभा राहिला व मोहनानें मागील दरवाजाजवळ जाऊन ओळख करून घेतलेल्या शिपायास, महाराज आले, असा इशारा केला. त्याणें तत्क्षणीं दरवाजाची दिंडी उघडून व इतर संत्री वगैरे लोकांस गुपचिप करून पुष्पशीलास व मोहनास आंत जाऊं दिलें, व आपण त्यांच्या बरोबर जाऊन त्यानें पद्मनयनेचा महाल दाखविला. त्या महालाखालीं उभा राहून पहातो, तों त्याच्या कित्येक मोठमोठ्या तावदानी खिडक्यांवरून बहुमोल मशरूचे पडदे सोडले आहेत; व शेवटास मोठमोठाले कलाबतूचे गोंडे लाविलेल्या त्यांच्या रेशमी दोऱ्या, लांब लांब लोंबत आहेत असें दिसलें. त्या वाड्याच्या जोत्याचे दगड व भिंतींवरील घोटीव काम नक्षत्रप्रकाशानें अभ्रकासारखें चमकूं लागलें, व त्याजवळ जाऊन उघड्या खिडक्यांतून आंत डोकावून पहातो तों तो महाल केवळ

सुम०—( उठून आणि बाण हातांत घेऊन ). बाईसाहेब, बाहेरून कोणीं तरी बाण मारून हंडी फोडिली आहे असें वाटतें.

पद्म०—माझ्या महालांत बाण मारून हंडी फोडण्यास कोणाचीही छाती होणार नाहीं; तस्मात् कांहीं तरी विशेष चमत्कार आहे; युक्तीनें शोध कर.

सुम०—( खिडकीशीं येऊन ). कोणीं बाण मारिला?

मोह०—सुमध्यमा बाईसाहेब, काय आहे हो!

सुम०—( आश्चर्यानें ) कोण आहे तें?

मोह०—बाईसाहेब, अजून ओळख पटत नाहीं काय?

सुम०—( मोठ्या आनंदानें ) कोण? मोहनलालजी, आपण आलां काय?

मोह०—बाईसाहेब, जरा खालीं येऊन जा.

इतकें मोहनलाल बोलतांच सुमध्यमेनें मोठ्यानें उडून टाळी वाजविली, आणि पद्मनयनेजवळ जाऊन हळूच ह्मणाली, "बाईसाहेब, पुष्पशील महाराजांचा चाकर खालीं आला आहे."

हें भाषण ऐकतांच पद्मनयना लगबगीनें छप्परपलंगावरून उठून खिडकींतून पाहूं लागली. सुमध्यमा खालीं आल्यावरः—

सुमध्यमा०—मोहनलालजी, बोलल्याप्रमाणें काम केलें काय?

मोह०—बाईसाहेब, यांत काय संशय? महाराज आले आहेत.

पद्म०—आणि सुम०—( एकदांच ). अहो, कुठें!

मोह०—ते दरवाजापाशीं उभे आहेत.

पद्म०—अगे सुमध्यमे, धांव लवकर, त्यांस घेऊन ये.

असें पद्मनयना बोलतांच सुमध्यमा व मोहनलाल हीं दोघें दरवाज्याकडे धांवत चाललीं, व पद्मनयना दुसऱ्या दासींस उठवून मोठ्या लगबगीनें पुष्पशीलाच्या भेटीची तयारी करूं लागली.

---

# भाग ३.

## अत्यानंद.

---

पुष्पशील महाराज इतक्यांत येतील असें समजून मोठ्या घाईनें दासींनीं इकडे तिकडे अव्यवस्थित पडलेलें सामान पुनः व्यवस्थेनें ठेविलें. बिछायतीवर केरकचरा पडला होता तो झाडून टाकिला; व पलंगावर नवे पलंगपोस घातले. छप्परपलंगावरील मच्छरदाण्या वर गुंडाकून ठेविल्या, व तबकांत नवे विडे करून ठेविले. पद्मनयनेनें आरशापाशीं जाऊन, झोंपेंत विस्कटलेले केश साफ केले; व कपाळावरील पिंपळपानी कुंकू पसरलें होतें तें नीट केलें. अंगावरील वस्त्रालंकार सांवरले व निजावयाचे वेळेस काढून ठेविलेले अलंकार धारण केले. मुखमार्जन करून तोंडांत विडा घेतला, आणि मोठ्या मर्यादशील झोंकानें जिन्यापाशीं जाऊन उभी राहिली.

इकडे सुमध्यमा पुष्पशीलास महालांत नेण्याकरितां आली. ती दृष्टीस पडतांच पुष्पशीलाचा आनंद त्रैलोक्यांत मावेनासा झाला; आणि अति आनंदानें, पद्मनयना प्रथम केव्हां दृष्टीस पडते ह्मणून उतावीळ होत्साता दासीमागें चालला. तो जिन्याचे दाराशीं येतांच त्यास एकदम सहस्त्रचंद्र प्रकाशमान झाल्यासारखें वाटलें. ते समयीं हें काय ह्मणून चकित होत्साता वेड्यासारखा तटस्थ उभा राहिला. इतक्यांत ती राजबाला, झुन् झुन् झुन् अशीं पायांतील नूपुरें वाजवीत दडदड जिना उतरून खालीं आली; आणि परम आदरानें पुष्पशीलासमोर उभी राहिली. ते वेळेस पुष्पशीलास देहस्मृतीची विस्मृति होऊन तो कांहीं वेळ अति विलक्षण विकृतियुक्त चित्तवृत्तीच्या अप्रतिम सुखांत मोहित झाला. नंतर किंचित् शुद्धीवर येऊन मनांत ह्मणतोः “ अरे, मी त्या अतिरूपवती राजतनयेस भेटण्याकरितां येथें आलों असून ती न दिसतां चंद्रबिंब मजपुढें कसचें दिसत आहे ? ” ( पुष्कळ विचार करून). “अहाहा! अरे काय मला भूल पडली? ! हीं तीच त्रैलोक्यसुंदरी पद्मनयना मजपुढें उभी राहिली आहे ! ! ! प्रिये, खरेंच तुज-


पुष्प
पद्म
दासी

रिती: आणि पापणीस पापणी लाविली असतांही तितकाच वेळ डोळे शोभामृतपानास मुकतील. ह्मणून ते न मिटतां आधाशासारखें अतित्वरेनें एकसकांच्या लावण्यसुधेची लूट करून तीं नेत्रमंदिरांत सांठवूं लागले. त्या प्रसंगीं त्या कुरंगनयनेच्या सदंगाचा सुगंध-अरविंद मुकुंदाप्रमाणें मंदमंद येऊन पुष्पशीलभृंग मदन-सुरंगानें रंगल्या जाऊन असा रंग आला ! त्याच्या अंतःकरणांत अंतरंग अनंगाचे अत्यंत सुतरंग उत्पन्न होऊन तो सुगंधमोहित भुजंगवत् कांहीं वेळ गुंग होत्साता डोलूं लागला ! नंतर मनांत ह्मणतोः " विश्वकर्म्या, तूं धन्य आहेस ! अरे, काय रम्य हा देह निर्माण केला त्वां ! ! साक्षात् रती इच्या रूपाची बरोबरी करणार नाहीं ! ! ! अरे, काय विलक्षण साज हें ! कटाक्ष हरिणीसारखे डोळे ! ! गालावरील सुरखीची शोभा तरी किती अलौकिक आहे ! गाल काय भरदार दिसत आहेत ! असें वाटतें की, एकदम उडून या मुखकमलांतील मधुर रस भ्रमरासारखा पान करावा ! अरे, डोळ्यांची शोभा तर माझ्या हृदयावर जणों शस्त्रप्रहारच करीत आहे ! व अंतर्यामास कळ येऊन त्याच्या ठिकऱ्या अंतर फोडून बाहेर येऊं लागल्या आहेत ! ( इतक्यांत पुष्पशीलानें लतीकडे विशेष नजर लाविली; असें पाहून किंचित् स्मित वदन करून पद्मनयनेनें पदर सरसावून धरला. ) पुष्पशील मनांत ह्मणतोः प्रिये, इतकी दूर आतां कां होतेस ? या बुभुक्षित नेत्रांस अंगारवृत्ति धारण करून आकंठ भोजन घाल ! पुनः सर्व शरीर न्याहाळून ह्मणतोः " अरे, या मनमोहिनीच्या मनोहर मुखचंद्रानें मम मनमहोदधीस महाभरती आणिली आहे; ही सुकुमार आणि सुंदर राजकुमारी अतिनिर्भर भरांत आलेली मदनमंजरी होय. इच्या रुचिर शरीरीं आणि विशेषेकरून उरीं कुसुमशरानें गुप्त तरवार मारून खरोखर अति बेजार केली आहे; आतां इच्या मधुर मकरंदयुक्त सुंदर मुखपंकजाचें चुंबन घेऊन चंदनभुजंगवत् निकटदृढालिंगन द्यावें; व येणेंकरूनच इच्या मुखचंद्राची कौमुदी अधिकतर तेजानें प्रकाशमान होऊन, माझ्या मनःपयोनिधीस पराकाष्ठेचा महापूर येऊन त्याच लहरींमध्यें मी विहार करीन. आनंदानें गाऊं लागलाः—

## लावणी.

(" धन द्रव्याला नाहीं निवंता सुखी जन ह्मणतात " या चालीवर.)

॥ प्राणसखीचें काय शरिर हें अनुपम या भुवनीं ॥
॥ मन्मथपुतळी शशिवदना हे सुंदर पंकजनयनी ॥ ध्रु० ॥

॥ दिव्यभाळ हें मृगनयनें हीं कुसुमशराचे भाले ॥
॥ मन्मनहरिणा टोंचित हृदयीं चित्त दुभंगचि झालें ॥
॥ सरळ नासिका रम्य अधर हे कर्ण परिस्कृत ठेले ॥
॥ कुचयुग्माच्या शोभेनें तर नेत्र चकोरचि केले ॥
॥ नवयौवनयुत सुरयुवती ही गमते नृपसदनीं ॥ मन्म० ॥ १ ॥

॥ रक्तोत्पलसम कर गमती मज पद रंभा दिसती ॥
॥ रुण झुण रुण झुण नूपुररव हे मन माझें हरती ॥
॥ दिव्य सदंगा काम भुजंगा रतिरंगा आणिती ॥
॥ मन्मनभृंगा चंचल करुनी बहु दंगा करिती ॥
॥ तृप्त मनोरथ कव्हां होइल येउन ही शयनीं ॥ मन्म० ॥ २ ॥

॥ प्रिय सखिच्या या मुखचंद्राचें दर्शन अजि होतें ॥
॥ आनंदाचें येत निर्भर मनः पयोनिधि भरतें ॥
॥ मनमयुराला घनदर्शन हें मोदद बहु गमतें ॥
॥ चित्तचातका वृष्टि सघन ही दृष्टि सुधाप्रिय देते ॥
॥ प्रियसखि माझी सुखद अहाहा! राजित दिव्य सुवसनीं ॥ म० ३

याप्रमाणेंच पुष्पशीलाच्या प्रत्येक अवयवाकडे पाहून पद्मनयनेच्या हृदयामध्येंही प्रेमपूर येऊन त्याच्या लहरी सर्व शरीरांत हेलकावे देऊं लागल्या. अशा स्तब्ध स्थितींत कांहीं वेळ गेल्यावर पुष्पशील पद्मनयनेस ह्मणतोः—

पुष्प०—प्रिये, मी बाण मारून हंडी फोडिल्यामुळें तुला राग आला असेल नाहीं?

पद्म०—प्राणप्रिया, अहो, असें काय ह्मणतां? या सर्व शरीराचा नाश केल्यास सुद्धां राग येणें नाहीं, मग हंडी फोडिल्यानें कसा येईल?

पुष्प०—पण, प्रिये, तुझी निद्रा भंग केल्याचें मला फार वाईट वाटतें.

पद्म०—प्राणनाथ, निद्रारूप अज्ञानांत हीं पतित नेत्रें बुडून गे-

लीं असतां यांस मदनस्वरूप दाखविण्यास पात्र केल्याचें सुख न मानितां आपणास वाईट वाटतें, हें काय? आतां आपण एवढ्या रात्रीं ह्या अनाथावर दर्शनामृतवृष्टि करण्यास आलां, येणेंकरून मात्र आपणांस पुष्कळ श्रम झाले असतील.

पुष्प०—प्रिये, चंद्रदर्शनास्तव सागरास जो प्रेमपूर येतो, तेणेंकरून जें त्याचें ऊर्ध्व गमन होतें त्याचे त्यास श्रम होतात काय? पण चित्तचालके काय सांगूं? तुझी ईषदुत्सुकता ऐकण्यांत आल्यापासून या नेत्रमृगांनीं दर्शनामृताकरितां टाहो मांडिला होता!

पद्म०—(प्रेमानें हंसून). प्राणप्रिया, आपण बोलण्याची तर पराकाष्ठाच केली! आतां आपणापुढें गृहकुरंगातील अबला काय बोलूं शकेल?

पुष्प०—बरें, प्राणवल्लभे, आतां येतों, आज्ञा दे.

पद्म०—अहाहा! गुणनिधाना, आतां वियोगजन्यदुःख या दासीस दाखवूं नका!

पुष्प०—चारुगात्रे, हें काय तूं भलतेंच बोलतेस? प्रिये, मजवरोबर चार स्नेही आहेत; व माझा बाहेर निघण्याचा हेतु वेगळा आहे. आतां थोडकेच दिवसांनीं आपला विवाह झाल्यावर चिरकाल एकत्र राहाणें आहेच.

पद्म०—प्राणप्रिया, आपला अशा मध्या रात्रीनिशीं बाहेर निघण्याचा हेतु काय? व अशा पहांटच्या समयींच मजवर कृपादृष्टि फिरविण्याचें मनांत आलें हें कसें? तें मला कृपा करून सांगावें.

असें पद्मनयना बोलल्यावर पुष्पशीलानें आपलें सर्व वर्तमान तीस निवेदन केलें. आणि नंतर पद्मनयनेनें पुष्पशीलास विडा दिला; व पुष्पांचा हार गळ्यांत घातला. हातांत मोतियाचे गजरे घातले, व डोकीस तुरा खोंविला. परम प्रीतीनें उत्तम अत्तर त्याच्या अंगास लाविलें. व गुलाबपाण्याच्या पिचकाऱ्या उडविल्या. पुष्पशीलानें थट्टेनें तिच्या हातची पिचकारी घेऊन तिच्या तोंडावर उडविली व ती नको नको ह्मणत असतां बळेंच तिच्या तोंडास व अंगास अत्तर लाविलें. गुलाब व मोगरा या फुलांचे दोन चार हार घेऊन तिच्या गळ्यांत घातले; आणि एक विडा तिच्या तोंडांत घातला.

याप्रमाणें रंग उडाल्यावर पुष्पशील जाऊं लागला; ते समयीं **पद्मनयना** ह्मणाली:—

**पद्म०**—प्राणवल्लभा, उद्यां अरुणोदय होतांक्षणींच आपले दाराशीं स्वारीनिशीं प्रयाण येईल, त्याबरोबर आपण आपल्या स्नेह्यांसमवेत इकडे उतरण्यास या बरें. आपण प्रथमच इकडे उतरण्यास आलां नाहीं ही मोठी चूक केली.

**पुष्प०**—प्राणसखे, मी तर केवळ चातकाप्रमाणें तुझ्या बोलावण्याची वाट पहात बसेन. परंतु तुजकडून लवकर सत्कारपूर्वक तुझ्या बापाच्या संमतीनें नेण्यास मात्र कोणी आलें पाहिजे.

**पद्म०**—त्याविषयीं काळजी करूं नका; आणि त्याबरोबर मी एक गुप्त पत्रही पाठवीन.

असें त्या प्रियकरांचें परस्पर भाषण झाल्यावर त्यांनीं एकमेकांचे हात धरून मोठ्या प्रेमानें एकमेकांकडे पाहिलें. नंतर पुष्पशील तेथून निघाला. त्याची अगदीं छायाही दिसेनाशी होईपर्यंत पद्मनयना त्याकडे एकसारखी पहात होती. नंतर पलंगावर पडून अति आनंदांत निमग्न होऊन पुष्पशीलाविषयीं कल्पना करूं लागली. पुष्पशील रस्त्यानें चालला असतां नाचत नाचत गाणें गातो:—

**पद, राग झिंझोटी—ताल त्रिताल.**

( ' वयानें देह भाग. सुदानें झांकला,' या चालीवर. )

**॥ प्रियसखिच्या प्रेमभावें मन माझें मोहिलें ॥**
**॥ नयनशरें मार केला तनमन हें वधिलें ॥ ध्रु० ॥**
**॥ आनंदें देह माझा निर्भर हा जाहला ॥**
**॥ प्रेमाचा पूर आला मम हृदयीं सांठला ॥ १ ॥**

**पुष्पशील** घरीं आल्यावर कपडे उतरून बिछान्यावर पडून मनांत ह्मणतो:—" अहाहा! काय लावण्य स्वरूप **पद्मनयनेचें**! खरीच पद्मनयना! भाषण तरी किती गोड आणि आर्जवाचें! मी कीर्ति ऐकत होतों त्यापेक्षां शतपट ती चांगली आहे! तिच्या बापानें अगर दुसरे कोणी आतां किती जरी मोडे घातले तथापि ती मजव्यतिरिक्त दुसरा पति करणार नाहीं. पहा. दैवाची गति विचित्र आहे!

मी या शहरांत महजगत्या आलों असून केवढा लाभ झाला हा ! ! पद्मनयनेस लिहितां वाचतां येतें असें तिच्या भाषणावरून दिसतें, ही एक मोठीच गोष्ट आहे. कारण, अशिक्षित स्त्रिया अज्ञानी असतात व त्यांचे मनांत ईश्वराची भीति नसते. सुशिक्षित, सुस्वरूप आणि सुशील, अशी स्त्री मिळणें किती आनंदाची गोष्ट आहे ! ! ! माझे स्नेह्यांस हें वर्तमान समजल्यावर फार आनंद होईल. त्यांच्या स्त्रिया अज्ञान आहेत व त्या दुर्गुणत दासवतील; परंतु मी विद्वान स्त्री मिळाल्यावांचून लग्न करणार नाहीं. वगैरे जें त्यांच्याशीं बोलत होतों त्याची पूर्णता पद्मनयना मिळाल्यानें होईल. " ( इतक्यांत आठवण आल्यासारखें होऊन ह्मणतो. ) "अरे, माझी नियमाची स्पेन्सरच्या एसेज ' मधली पांच पानें वाचावयाचीं राहिलीं तीं वाचून टाकूं द्या." ( असें ह्मणून चंद्रप्रकाश दीप तयार करून त्याचे खालीं बूक वाचूं लागतो, आणि वाचतां वाचतां पद्मनयनेची कल्पना मनांत येऊन बूक मिटून पुनः मनाशीं बोलतो ). " सर्वांपेक्षां मला तिच्या गालांतील हंसण्याची मोठी मजा वाटली ! आणि किती सरळ बोलणें ! ! अहाहा ! अशा सर्वगुणसंपन्न स्त्रिया जगतांत सांपडणें कठिण ! ती आतां मजशिवाय दुसरे कोणालाही वरणार नाहीं ! ( टाळी वाजवितो ) असो. बरें, परंतु मला इतका पद्मनयनेचा नाद लागला हें कसें ? मी क्षणोंक्षणीं अविचारानें विषयाचें भजन करीत आहें हें काय ? आतां त्यास ईश्वराच्या अगाध कर्तृत्वशक्तीच्या विचारास लावितों. ईश्वरानें डोळ्यांस चकाकी रहावी ह्मणून सर्व प्राण्यांच्या डोळ्यांत पाणी उत्पन्न केलें आहे. व तें निघून नाकांत जाण्यास नळ्या केल्या आहेत. ह्यामुळें तें नाकांत येतें. व प्राण्याच्या श्वासोच्छ्वासाच्या योगानें जो वायु आंत बाहेर जातो त्याच्या योगें करून तें आटून जातें. अहाहा ! काय चमत्कार हा ! माझ्या पद्मनयनेच्या डोळ्यांतील तकाकीदार पाणी जाण्यासही तशाच नळ्या असतील नाहीं बरें ? तिच्या डोक्यांतील मेंदु काय चमत्कारिक असेल ! कपाळ विस्तीर्ण असून किती वर आलेलें आहे ! यावरून तिची सदसद्विचारशक्ति, आणि बुद्धिकौशल्य विलक्षण असेल ! तिच्या कानावरील भाग सपाट दिसून वर गोल दिसला, यावरून तिचे अंगांत क्रोध कमी असून ती

अत्यंत परोपकारी असावी. अहाहा! तिच्या स्नायूंची आकृति काय चमत्कारिक असेल!! अगोदरच स्त्रियांचे स्नायु पुरुषांपेक्षां अत्यंत मृदु असतात; तशांत त्या चारुगात्रेचे किती छानदार असतील बरें? ते मध्यें जाड असून शंकाकृतीनें निमुळे होत गेले असतील. असो. आतां प्रातःकाळ होऊन त्या हरिणाक्षीचें दर्शन केव्हां होईल? अरेरे! माझे शास्त्रीय विचारही विषयचिंतनांत गडप होऊन गेले!! छिः छिः, मला हा निदिध्यास लागला हा फार वाईट आहे. आतां पद्मनयनेवरून मन निघून दुसरीकडे लागण्याची आशा राहिली नाहीं!



# भाग ४.

## दिंडी.

॥ युवति यौवनकालांत करी माया ॥
॥ सौख्य असतांही दुःख बघे वाया ॥
॥ दरोड्यातें जे चोर घालितांनी ॥
॥ दया नसते त्या लेश न्यायनीति ॥

तिसरे दिवशीं त्या चार विद्वानांनीं गांवांत फिरून बाकी राहिलेले रस्ते पाहिले. रात्रीं पूर्ववत मेजवानी होऊन **मनोहरपंडित** व **श्यामसुंदर** हे आपापल्या अंतःपुरांत निद्रा करावयास गेले. त्या वेळेस सुमारें साडे अकरा वाजण्याचा समय आला होता. चांदणें मावळत चाललें होतें व जिकडे तिकडे सामसूम झालें होतें. तुरळक कोठें दिवे शहरांत चमकत होते. व मनुष्याचा शब्द किंचित् ऐकूं येत होता. श्रीमंत लोकांच्या घरांतील, व सरकारी कचेऱ्यांतील घड्याळें वाजत त्यांचे आवाज स्पष्ट ऐकूं येत; व मधून मधून कुत्र्यांचें भुंकणें आणि ओरडणें ऐकूं येई. अशा समयास पुष्पशील निजावयास जाण्याच्या तयारीनें उठला; आणि खिडकीपाशीं सहज जाऊन रस्त्यांत पाहूं लागला. त्याच्या वाड्यासमोरील रस्त्याची दिशा पूर्वपश्चिम असल्यामुळें त्यामध्यें चंद्राचें मावळतें चांदणें स्वच्छ पडलें होतें; व वाऱ्याची थंड झुळुक एकसारखी वाहत होती. त्या रस्त्याकडे पुष्पशील पहात आहे इतक्यांत, समोरच्या एक दोन घरांपलीकडील एका घराचा दरवाजा उघडून एक स्त्री आणि पुरुष भांडत बाहेर पडली. त्या वेळेस पुष्पशीलानें धैर्यशीलास हांक मारली, व ते दोघे खिडकींतून तो तंटा पाहूं लागले. त्या मनुष्यानें पगडबंदाकडून बांधलेलें नारळीपदरी पागोटें एका कानावर घातलें होतें; व अंगांत जाळीदार सदरा अडकविला होता. धोतरजोडा रेशीमकांठी नेसून व त्याचा डावे पायावरील सोगा गुडघ्यास घट्ट भिडलेला असून उजव्या पायावरील सोगा घोट्यापर्यंत लोंबत होता. धोतराच्या निऱ्या कटेदार असून वर खोंवलेल्या पदरास पुष्कळ पीळ घातलेला होता. जोडा शिरोळ्याचा लाल, हिरवें रेशीम भरलेला, असून त्या-

मध्यें अर्धा पाय मावण्याजोगा होता; आणि खांद्यावर रुईफुली कांठी उपर्णे घेतलें होतें. दोन्ही भिवयांमध्यें तीट लाविली होती, व कानांत अत्तराचे बोळे घातले होते. गळ्याभोंवतीं अरगजा फांसला होता, व डाव्या हातांत मोतियाच्या कळ्यांचा गजरा घेतला होता. तोंडामध्यें तंबाखूचा बार भरला होता व उजव्या हातांत एक नकशीदार रंगीत कांठी होती. ती स्त्री गोरी असून बांध्यानें मोटी होती. तिचें वय सुमारें सोळा वर्षांचें होतें. तिचें नाक जरा बसकें होतें, व तोंडावर देवीचे वण होते. हात पाय जाड असून कंबर रुंद होती, आणि गळा घोगरा होता. ती असदावादी रुईफुली कांटाची काळी चंद्रकळा नेसली होती; व तिणें अंगांत तांबडी जरीकांठी चोळी तंग घातली होती. तिणें कपाळीं पिंपळपानी कुंकूं लाविलें होतें. वेणींत ताजा गजरा घातला होता. तिच्या हातांत पाटल्या, व गोठ होते; कानांत बुगड्या व काप होते; डोकीस फूल व मूद होती; नाकांत तुऱ्याची नथ होती व पायांत चांदीच्या कुलपी सांखळ्या होत्या.

अशीं तीं दोघें भांडत व ओढाताण करीत पुष्पशील व धैर्यशील उतरले होते तेथपर्यंत आलीं. ती स्त्री त्या मनुष्यास ह्मणे "माझे रुपये दिल्याशिवाय तूं चाललास कोठें?" आणि तो पुरुष तीस वारंवार बोलें कीं, "मी दिलें आहे तें बस्स आहे." असें बोलतां बोलतां तो मनुष्य आतां आपले हातून सुटून जातो असें जेव्हां त्या स्त्रीस वाटलें, तेव्हां तिणें त्यास पक्कें धरून मोठ्यानें "मावशी, लवकर ये, हा मेला चालला;" अशी आरोळी मारली. तिचा शब्द ऐकतांच त्याच वाड्यांतून एक ह्मातारी आणि एक पुरुष असे धांवून आले. तें पाहून तो भयभीत होऊन त्या स्त्रीचे हातून निसटून जावें ह्मणून मस्ती करूं लागला. परंतु ती सोडीनासें पाहून त्यानें रागाचे त्वेषानें तिला एक जोरानें गचांडी देऊन पुष्पशीलाच्या वाड्याचे पायरीवर आपटलें, आणि आपण पळून गेला.

ती स्त्री त्या मनुष्याचे गचांडीसरशी तोंडावर पडून पायरीचे धोंड्याचा कांठ तिचे ओंठास जोरानें लागला; आणि तेणेंकरून ओंठ चिरला जाऊन तिचे दांतही डुखावले. रक्ताचा मोठा लोट चालून तिची छाती व लुगडें सर्व रक्तानें भिजून गेलें. ते समयीं ती ह्मातारी

त्या जखमेंत भरण्याकरितां तपकीर अगर चुना वगैरे पदार्थ आणण्यास धांवाधांव करूं लागली. इतक्यांत ती ओंठ फुटलेली स्त्री हळूच ह्मणाली, "मावशे, तूं कांहीं एक आणूं नको. कारण, जर तूं तसें करशील तर पुढें मला छपविण्यास मोठी पंचाईत पडेल. आणि मी अशीच घरीं गेलें तर हें विघ्न मी एका युक्तीनें आपल्या नवऱ्यावर बाळवून कोणास किंचित् संशयही येऊं देणार नाहीं. " असें तिचें भाषण ऐकून कोणी कांहीं बोललें नाहीं. नंतर ती ओंठ फुटलेली स्त्री आपले घराकडे निघून गेली; आणि ती ह्मातारी व पुरुष पुनः जेथून निघाले त्या घरांत गेले.

याप्रमाणें चमत्कार पाहून पुष्पशीलास व धैर्यशीलास अतिशय आश्चर्य वाटलें. ते याविषयीं कांहीं बोलत आहेत, व पुनः किंचित् सामसूम झालेंसें वाटत आहे. इतक्यांत सुमारें वीस पंचवीस चोर हातांत टेंभे घेऊन "दीन दीन" असा शब्द करीत येत आहेत असें दिसलें. त्यांनीं आपणास कोणी ओळखूं नये ह्मणून तोंडास काळे व हिरवे रंग दिले होते. पोषाखही बदलून कोणी काळे, पांढरे, असे पायजमे घातले होते, अंगांत कोणीं बंड्या घातल्या होत्या, व कोणी उघडेच होते. कित्येकांनीं डोक्यास पागोटीं घातलीं होतीं, व कित्येकांनीं केश मोकळे सोडले होते. कोणी कपाळीं मळवट भरले होते, व कोणीं लोकांस भय उत्पन्न करण्याकरितां वेडेवांकडे पट्टे मारिले होते. त्या प्रत्येकाजवळ ढाल तरवार होती; व त्याशिवाय नदीवरील टोळ गोट्यांनीं त्यांच्या ओंट्या भरल्या होत्या. प्रत्येकाजवळ एक एक गोफणगुंडी होती; व रस्त्यांत दूर किंचित् मनुष्याची चाहूल आली कीं, लागलेंच ' गुंग ' असा आवाज करीत गोफणीनें दगड फेंकून मारीत. असे ते चोर अकस्मात् पाहून पुष्पशीलास व धैर्यशीलास किंचित् भय वाटलें. त्यांचे मनांत आलें कीं, हे कोठें तरी दरोडा घालण्यास चालले आहेत. तेसमयीं पुष्पशील ह्मणतो, " धैर्यशीला, हीं राज्यव्यवस्थेचीं लक्षणें पाहिलीं काय? हे दरोडखोर पहा कसे राजरोस चालले आहेत, जसें काय यांस कोणी आपणांस शासन करील असें भयच नाहीं. यांचे मागें सरकारी शिपाई वगैरे कोणी तरी आहे काय? वहावारे बंदोबस्त!" धैर्यशील ह्मणाला, "पुष्पशी-

ला, मला वाटतें आपले बरोबरचे कांहीं लोक घेऊन आपण या समयास बाहेर पडावें; व कोणी लोक या दुष्टांचा नाश करण्यास प्रवृत्त झाले तर आपण त्यांस यथाशक्ति मदत द्यावी, हें योग्य आहे." पुष्पशील बोलला, "हो हो, फार चांगली कल्पना काढलीस, चल हा मी तयार आहें."

असें बोलणें झाल्यावर त्यांनीं अंगांत चिलखतें चढविलीं. कंबरेस पिस्तुलें व दारूगोळा वगैरे सरंजाम बांधला, आणि सर्व प्रकारें लढाऊ पोषाख करून हातांत ढालतरवारी घेतल्या. याप्रमाणें तयारी करून बरोबर दोन तीन धैर्यवान् शिपाई घेऊन ते मोठ्या आवेशानें त्या दरोडखोरांमागें चालूं लागले.

धैर्यशील व पुष्पशील हे अलीकडे एम्. ए. पास झालेल्या विद्वानांप्रमाणें अशक्त नव्हते. ते अत्यंत धैर्यवान् व शक्तिमान् असून संकल्पमयी युक्ति सुचणें. जीवावर उदार होऊन एखादे कामीं उडी घालणें, दीनांची करुणा येणें. दुष्टांस शिक्षा करणें, जगसुधारणा करण्यास मनापासून झटणें. दुसऱ्याचें दुःख पाहून कळवळा येणें, आपणास मोठा न समजणें. आणि दुसऱ्याचे उपयोगीं पडण्यास रात्रंदिवस यत्न करणें. वगैरे अमोल गुण त्यांच्या अंगांत अतिशय जागृत होते. त्याप्रमाणेंच पट्टा खेळणें. तरवार फरजणें. निशाणावर बिनचूक गोळी मारणें. लढाईंत धैर्यानें शिरणें. घोड्यावर बसणें. जोरी फिरवणें, कुस्त्या मारणें. आणि अंगाशीं अंग भिडवून युद्ध करणें. वगैरे क्षात्रियोपयोगी गुणांतही ते अगदीं निपुण होते. हे प्रकार त्यांच्या बापांनीं त्यांस लहानपणापासूनच शिकविले होते. आधींच त्यांचीं हाडें मोठीं होतीं. व नशांत तालीमबाजी आणि खुराक त्यांस लहानपणापासून चालविले होते. यामुळें ते या वयांत अगदीं निकोप जबरदस्त केळीच्या कोंबाप्रमाणें शोभत असत. साधारण दहापांच माणसें तर कोठें पिंमारसरीं फेंकून देऊं असें त्यांस वाटे.

याप्रमाणें ते दोघे पुरुषपुंगव बाहेर पडतांच त्यांचे बाहु फुरफुरूं लागले;सर्वांगांत आवेश येऊन नेत्र आरक्त झाले;आणि त्या चोरट्यांचा नाश केव्हां करून टाकूं म्हणून अत्यंत उतावीळ झाले.धैर्यशील तर क्रोधानें संतप्त होऊन सर्वांचे पुढें उड्या मारीत जाऊं लागला; व

चोरांचे मागें गोफणीचे दगड वगैरे येत त्या कशांसही तो भिईना. ते-समयां पुष्पशील ह्मणाला, " धैर्यशीला, असा उतावळा होऊं नको. युक्तीनें काम केलें पाहिजे. आपण एकाएकीं त्यांचे अंगावर उडी घालणें हा वेडेपणा होय. प्रथम आपण हे लोक काय करणार आहेत याचा पुरता शोध करूं. नंतर सर्व गांवांत फिरून सरकारी लोकांस आणि दुसरे लोकांस हा मजकूर कळवून त्यांस यांजवर पाठवूं आणि जर कोणीच यांचा मोड करण्यास न धजेल तर आपण जिवावर उदार झालोंच आहों. "

असें पुष्पशील बोलल्यावर धैर्यशील शांत होऊन ते हळू हळू चोरांमागें पुष्कळ अंतर टेवून चालले. दरोडखोर थोरल्या रस्त्यानें नाहीं जाऊन शहरा बाहेर गेले; आणि आडवळणास नदीच्या कांठीं एक देवीचें देवालय होतें त्यांत शिरले.

ती देवी अति भयंकर होती तीजवळ ते गेले, आणि तीस नमस्कार करून ह्मणाले, " जय काली माते, जर आह्मांस आज तुझ्या कृपेनें मोनागांचे वाड्या दरोडा सांपडल्या, तर आह्मी तुला राजकन्या बळी देऊं. "

पुष्पशील व धैर्यशील हे बाहेर उभे राहून आंत काय चाललें तें पहात होते; त्यांस आंतील प्रकार पाहून विलक्षण चमत्कार वाटला. तेसमयीं पुष्पशील ह्मणाला, " काय मूर्ख लोक हे आहेत ! पातक करण्यास देवीचें साहाय्य मागतात.किती अज्ञानपणा हा ! ! धैर्यशीला, पहातोस काय, आड पिस्तुल; आतां आपण यांची गठडी करून टाकूं. असें बोलून पिस्तुल उचलूं लागतो. इतक्यांत धैर्यशील ह्मणतो, "पुष्पशीला, थांब, अंमळ थांब; देवीस फक्त नवस केल्यानें त्यांनीं दरवडा घातला असें होत नाहीं. एवढ्या राजधानीमध्यें यांस निर्विघ्नपणें दरोडा सांपडणें कठिण आहे. आणि यदाकदाचित् नगरजन अगर सरकारी अंमलदार शुद्ध पाषाण ठरून यांचें कार्य साधलें, तथापि आपण यांची कत्तल एका क्षणांत करून सर्व लूट ज्यांची त्यांस देऊं. परंतु तूर्त काय होतें तें पाहूं तर खरें. "

असें धैर्यशील बोलल्यावर ते सर्व एका बाजूस उभे राहिले. दरोडखोर देवीस नमस्कार करून मोठ्या आनंदानें उड्या मारीत बाहेर

पडले; आणि दुसऱ्या एका रस्त्यानें पुनः गांवांत शिरले. चोरांचें द-रोडा घालण्याचें घर बिचाऱ्या श्यामसुंदराच्या श्वशुराचेंच होतें. तें घर किंचित् आडवळणीस असून त्यास मागील व पुढील असे दोन दरवाजे होते. त्याचा पुढील दरवाजा एका मोठ्या प्रसिद्ध रस्त्यांत होता, व मागील दरवाजा अगदीं कुत्सित गल्लींत होता.

धैर्यशील व पुष्पशील यांस सोडून, बरोबर कंदील व मनुष्य घेऊन मोठ्या आनंदानें श्यामसुंदर आपल्या श्वशुरगृहीं निद्रा करावयास गेला होता. त्याचा बिछाना एका रंगमहालांत टाकिला होता, व तेथें उत्तम प्रकारची आराम केली होती. तो बिछान्यावर जाऊन बसल्यावर "प्रियपत्नी अजून कां येत नाहीं?" असें त्यानें दासीस पुसलें. तें ऐकून दासी ह्मणाली, "महाराज, बाईसाहेबांचें जेवण होतांच त्यांस एक वांती झाली व किंचित् ज्वरांशही आला आहे; याकरितां त्या दुसऱ्या खोलींत निजल्या आहेत." असें दासीचें भाषण ऐकून श्यामसुंदराचें मन अगदीं खट्टू होऊन गेलें. तो तसाच बिछान्यावर पडला, परंतु चैन पडेना, व निद्रा लागेना. असे दोन तीन तास गेल्यावर त्याला दिशेस जावेंसें वाटलें म्हणून दासीकडून कंदील आणवून तो खालीं उतरला.

त्या घराचा शौचकूप मागील दरवाज्याचे बाहेरचे बाजूस होता, म्हणून त्यानें मागील दरवाजा उघडला. त्या वेळेस दरोडखोर त्याच दरवाज्याचे बाहेरचे अंगास येऊन गडबड न करितां दार उघडण्याची खटपट करीत होते. इतक्यांत एकदम दरवाजा उघडलेला पाहून कदंबा देवीनें आपणास साहाय्य झाली असें त्यांस वाटलें, आणि त्यांनीं तत्काळ नारळ फोडून, "जय कदंबे माते!" असा शब्द करून 'दीन,' 'दीन,' म्हणत आंत प्रवेश केला. त्या वेळेस बिचाऱ्या श्यामसुंदराची जी अवस्था झाली ती सांगतां येत नाहीं. त्यास वाटलें कीं, आज आपली पुण्यतीथ खचित होते! तो भयानें घाबरा होऊन एका कोंपऱ्यांत जाऊन पडला.

चोरांपैकीं दोनतीन असामी बाहेर राहून बाकीचे आंत शिरले. बाहेरील तिघांनीं तीन रस्ते रोंखिले. त्यांनीं त्या रस्त्यांत एकसारखा गोफणीनें दगड मारण्याचा क्रम चालविला होता; म्हणून कोणाची

पुढें येण्यास हिंमत चालेना. धैर्यशील व पुष्पशील हे एका रस्त्यांत होते; त्यांसही वाटलें कीं, आपणांस एखादा धोंडा लागला तर मोठी दुखापत होईल, म्हणून त्यांनीं आपलीं पिस्तुलें एकदम उडविलीं; त्यांपैकीं एका पिस्तुलाची गोळी त्या रस्ता रोखणारास लागून तो तत्काळ गतप्राण झाला; यामुळें त्या रस्त्यांतील दगड बंद झाले. नंतर त्या दोघांनीं आपले बरोबरचे शिपायांस मोठ्यानें ओरडत सर्व शहरांत फिरण्यास सांगितलें. ते लोक मोठ्यानें ध्वनि करीत व "धांवा धांवा!" "दरोडा पडला," "घरें लुटलीं," वगैरे शब्द मोठ्यानें ह्मणत सर्व शहरात फिरले. पोलिसठाण्यांत गेले, व राजवाड्यापर्यंत ओरडाओरड केली; परंतु कोणीही बाहेर निघेना. ज्यास त्यास वाटे कीं, आपण दार उघडलें कीं ते चोर आपले घरावर येतील.

त्या शहरांत असे प्रसंग वारंवार घडत असत, यामुळें त्यांस हें मोठें आश्चर्य वाटत नसे. अशा वेळीं प्रत्येक घरांतील मनुष्यें आपआपलीं दारें अधिक मजबुतीनें बंद करून घरांत स्वस्थ बसत असत. बहुतेक सरकारी अंमलदार चोरांस सामील असत, सबब ते कानाडोळा करून आपला जीव धोक्यांत घालीत नसत. यामुळें त्या ठिकाणीं चोरांचें प्राबल्य विशेष होऊन असे दरोडे हंमेशा पडत.

कोणीही बाहेर येत नाहीं असें पाहून पुष्पशीलास व धैर्यशीलास फार वाईट वाटलें. नंतर निरुपाय होऊन आतां आपणच यांचा नाश कोणत्या रीतीनें करावा म्हणून विचार करीत ते एका ओट्यावर बसले. दरोडखोर आंत शिरल्यावर त्यांनी जीं क्रूर कर्में केलीं तीं लिहिण्यासही अंगावर रोमांच उभे राहतात! त्यांनी त्या घरचा मुख्य मालक जो श्यामसुंदराचा सासरा त्यास धरून खालीं पाडलें; आणि त्याचे गळ्यावर नागवी तरवार टेवून द्रव्य कोठें आहे तें दाखीव, नाहीं तर आतां गळा कांपितों अशी भीति घातली. दुसरे जे घरांतील कोणी मनुष्य आह्मांस या संकटांतून सोडवा असें ओरडूं लागले, त्यांच्या तोंडांस त्या दुष्टांनीं राखेचे तोबरे दिले. एका दोघां मुख्य मनुष्यांस तर उलटें टांगिलें; आणि खालून तरवारीचीं टोकें त्यांच्या अंगांस टोंचून "बताव, बताव," असें मोठ्यानें ओरडले. त्यांनीं कांहीं द्रव्य दाखविलें ह्मणजे आणखीही यांस माहित असेल अशी कल्पना

करून त्यांचे नानाप्रकारचे हाल करूं लागले. ते स्त्रियांकडे गेल्या-वर काय विचारतां? एकच आकांत होऊन गेला! त्या भयानें लट-लटां कांपूं लागल्या, व त्यांच्या तोंडावाटे शब्द फुटेना. तितक्यांत कोणी रडूं लागल्यास रांडेच्या तोंड्यांचें भय. 'तोंड बांधून बुक्क्यां-चा मार' ही ह्मण त्यांस त्या समयीं मूर्तिमंत दिसली!! ज्यांच्या अंगावर डागिने नव्हते त्यास फारशी इजा झाली नाहीं; परंतु डा-गिने अंगावर असलेल्यांची दुर्दशा फारच झाली!! त्यांच्या हातां-तील अलंकार लवकर न निघाल्यास त्या दुष्टांनीं वाकसानें त्याचे पंजे तोडून काढावे; व नाकांतील नथा आणि कानांतील बाळ्या व बुग-ड्या एका हिसक्यानें नाक कान तोडून काढाव्या! लहान लहान मु-लांच्या पायांतील तोडे त्वरेनें निघण्याकरितां त्यांनीं कुऱ्हाडीनें त्यांची मागील टांच तोडून काढावे; व निर्दयपणानें त्यास आपटून देऊन चालतें व्हावें!!!

घरांतील फडताळास अगर पेटीस कुलूप असल्यास एका मोठ्या घणाचा टोला मारून तें फोडून टाकावें; व त्यांतील माल काढून घ्यावा. एखादा कापडाचा गट्टा अगर खिडकी दारांतून न मावल्यास त्यांनीं घणाचे टोंक मारून चौकट पाडून टाकावी; व भिंती पाडाव्या. त्यांच्या टेंभ्यांस चिरगूट लागल्यास जवळ असलेल्या मनुष्याचें वस्त्र फेडून घेऊन तें टेंभ्यास गुंडाळावें व तेलाच्या घागरींतून त्यावर तेल ओतावें. अशा प्रकारें त्यास किंचित् सोय होण्याकरितां त्या नरपशूंनीं अत्यंत क्रूर कर्में केलीं.

चोरांचा आंत झालेला गोंगाट व घरांतील मनुष्यांचा शोक ऐकून पुष्पशील व धैर्यशील यांस आंत काय चाललें असावें याची कल्प-ना बरोबर करितां आली. ते ह्मणाले, "काय अनर्थ हा! सुधारले-ल्या देशांतील बेवारस ह्मातारीस जें सुख मिळतें त्याच्या शतांशही सुख असल्या बेबंद राज्यांत मोठ्या लक्षाधीशास मिळत नाहीं." नंतर नगरजनांचें साहाय्य मिळत नाहीं व चोरांनीं दरोडाही घातला, आतां पुढें तजवीज काय करावी ह्मणून ते विचार करूं लागले. शे-वटीं पुष्पशील ह्मणाला, "मला एक युक्ति यांचा नाश करण्यास चांगली दिसते. ती अशी कीं, हे चोर जरी क्रूर आहेत, तथापि त्या

देवीवर यांचा भाव आहे. ते चोरलेला सर्व माल घेऊन पुनः देवीस नमस्कार करण्यास जरूर येतील. याकरितां मी देवीच्या जागीं बसून देवीच बोलते असा त्यास भास करीन. नंतर ते एकत्र होतांच " हुशार " असा शब्द करीन; तो होतांच तुह्मीं सर्वांनीं चोहों बाजूंस तयार राहून एकदम पिस्तुलें त्यांच्या अंगावर सोडून त्यांस ठार करावें. " असें पुष्पशील बोलल्यावर ती गोष्ट धैर्यशीलास व त्यांच्या शिपायांस मान्य होऊन ते सर्व चोरांच्या अगोदर देवळाकडे गेले.

वर लिहिल्याप्रमाणें अघोर कृत्यें करून दरोडखोरांनीं त्या घरांतील सर्व मालाच्या मोटा बांधिल्या; आणि त्या डोक्यांवर घेऊन एकामागें एक चालले. सर्व चोर त्याच गांवचे राहणारे असून ते तें द्रव्य वांटून घेण्यास कदंबेच्या देवळांत गेले.

इकडे देवळांत सर्व चोर आले, तेनसमयीं पुष्पशील तरवार सज्ज करून देवीच्या समोर गाभाऱ्याचें दार बंद करून आंत बसला होता; व धैर्यशील देवळाच्या बाहेरचे बाजूस उभा होता. त्यांचे चाकर सभामंडपाचे बाहेर अंगणांत समोरासमोर उभे होते. दरोडखोर आपले हेतु सिद्धीस गेले ह्मणून उन्मत्त होऊन अगदीं बेपर्वा झाले होते, ह्मणून त्यांस हें कृत्य बिलकूल समजलें नाहीं.

ते देवळांत येऊन स्थिर होतांच पुष्पशील आंतून देवीच्या रूपानें ओरडला: " हे माझे प्रियभक्तांनो. आजपर्यंत तुमची एकनिष्ठ भक्ति पाहून मी तुह्मांवर सुप्रसन्न आहे. तुह्मी पाहिजे तो वर मागा. " अशी देवीची विशाल वाणी ऐकून आनंदयुक्त झालेले चोर अतिशय विस्मित झाले; व आपणास देवतेनें साक्षात्कार दाखविला, तस्मात् आपण त्रैलोक्यांत धन्य आहों, असें त्यास वाटलें. नंतर सर्व एकत्र उभे राहून ते नमस्कार करून ह्मणाले, " मातुश्री, या आमच्या वंशपरंपरागत कृत्यास अशीच साहाय्य कर ह्मणजे झालें. दुसरें मागणें नाहीं." तेनसमयीं " तथास्तु! " असें देवी बोलून एकदम " हुशार " असा शब्द झाला. तो होतांच धैर्यशीलानें व चाकरांनीं एकदम चोहोंकडून पिस्तुलें सोडिलीं. ती सुटतांच चार पांच चोर तत्क्षणीच गतप्राण होऊन बाकीचे भयभीत होत्साते पळूं लागले परंतु त्या देवळांतून बाहेर पडण्यास दरवाज्याशिवाय रस्ता नव्हता, ह्मणून ते सर्व दरवाज्याकडे

धांवले. तेसमयीं त्या सर्वांचा मारा धैर्यशीलावर पडतांच तो अगदीं घाबरून गेला, व आतां आपण प्राणास मुकतों असें त्यास वाटलें. परंतु ते सर्व दरवाज्याकडे लोटतांच पुष्पशील आंतून जसा गजसमुदायावर सिंह पडतो तसा त्या चोरांवर पडून त्यांस कापूं लागला. त्यांचे शिपाईही आपळे धन्यांचें शौर्य पाहून जीवाकडे न पाहतां त्या तस्करसमाजांत शिरून त्यांचा नाश करूं लागले.

दरोडखोर देवीच्या साक्षात्कारेंकरून विस्मित झाले होते. त्यांस अकस्मात् हें अघोर विघ्न आलेलें पाहून अतिशय भय प्राप्त झालें. त्यांस वाटलें कीं, येथें कांहीं तरी पिशाचबाधा होऊन हा प्रकार घडूं लागला आहे; यामुळें ते अगदीं भयभीत होऊन चळचळा कांपूं लागले. त्यांचे हातांपायांतील वीर्य नाहींसें झालें, व काय करावें तें सुचेना. ते तसेच धडपडत कोणीकडून तरी बाहेर पडण्यास पाहूं लागले. त्यांस आंतून पुष्पशील कापूं लागला व बाहेर पडलेल्यांस धैर्यशील ठार करूं लागला. त्या भयभीतांवर तरवार फिरविण्याचे कामांत अत्यंत चतुर अशा पांच सहा पुरुषसिंहांचा मार पडल्यामुळें दोन तीन खेरीजकरून बाकी सर्व चोर प्राणास मुकले. जे शिलक राहिले होते ते मोठ्या कष्टानें बाहेर पडून पळूं लागले. तेसमयीं धैर्यशीलानें पिस्तुल मारून एकास ठार केलें, परंतु दोघे मात्र अजिबात पळाले. त्यांसही जीवंत सोडूं नये असें मनांत आणून धैर्यशील शिपाई बरोबर घेऊन मोठ्या आवेशानें त्यांच्या मागें लागला. तेसमयीं सर्वांनी त्यांमागें लागण्यांत अर्थ नाहीं असें मनांत आणून पुष्पशील आपल्या बिऱ्हाडीं गेला. त्यानें हातपाय धुऊन सर्व कपडे उतरले, व तो बिछान्यावर जाऊन पडला, परंतु झालेल्या गोष्टींबद्दल आश्चर्य व अनेक विचार मनांत येऊं लागले, त्यामुळें निद्रा येईना. सबब तसाच पडला.

---

## भाग ५.

## व्यभिचारपरिस्फुटता.

---

मागील भागांत लिहिल्याप्रमाणें अनेक कल्पनांचे तरंग पुष्पदंशीला-च्या मनावर उठत असतां, तो ज्या खोलींत निजला होता त्या खोलीचें दार एकदम उघडून श्यामसुंदर आंत आला. त्यास पाहून व वड्याळांत साडेचार वाजले आहेत तें पाहून तो त्यास ह्मणालाः—

पुष्प०—( आश्चर्यानें ) श्यामसुंदरा, अरे, या वेळेस तूं अति-आनंदांत असावयाचा असून येथें आलास हें काय?

श्याम०—अरे, कसला आनंद आणि कसचें काय? मजवर जें ल-चांड आलें आहे तें पुसूं नको.

पुष्प०—अरे, इश्कगृही उपभोग घ्यावयास गेलास असे असून तेथें संकट उत्पन्न होण्याचें कारण काय?

श्याम०—नशीब फुटकें असलें ह्मणजे समुद्रांत टाकिलें तरी म-नुष्य कोरडा निघतो हें तुला माहीतच आहे.

पुष्प०—बरें, पण येथें तसें कसें झालें?

श्याम०—मी तिकडे निजावयास न जातां याच वाड्यांत आजची रात्र निजलों असतों तर फार चांगलें झालें असतें. रत्नजडित हार धरावयास गेलों आणि मनीं हातीं लागला, तशी अवस्था माझी झाली!

पुष्प०—बरें, काय झालें तें सांग तर खरें.

श्याम०—नायकोकरितां तिकडे गेलों तों ती आजारी होती. ए-क कलम झालें. पुढें रात्रीं दिशेस जाण्याकरितां दरवाजा उघडला तों तेथें दरवडा पडला!

पुष्प०—( दुःखानें ) अरेरे! तो दरवडा तुझ्या सासऱ्याचेच का घरावर पडला? फार वाईट झालें. बरें पुढें?

श्याम०—पुढें काय विचारतोस, दरोडखोर सर्व निघून गेल्यावर, मीं दरवाजा उघडतांच चोर आंत आले, तस्मात् मी त्या चोरांस साहा-

य्य आहे असें त्यांनीं ठरविलें; आणि मलाच हजारों शिव्या देऊं लागले. नंतर त्यांनीं मला घरच्या गड्यास सांगून एका खोलींत कोंडून ठेविलें. आणि बाहेरून कुलुप लाविलें. उदईक या गोष्टीचा पुरावा राजापुढें होऊन मजवर आरोप शाबीत झाल्यास मला कायद्याप्रमाणें शिक्षा देणार.

**पुष्प०**—अरे, काय मूर्खपणा हा ? परंतु तूं त्या खोलींतून निघून इकडे कसा आलास ?

**श्याम०**—अरे कसा आलों ह्मणून काय पुसतोस ? मला ज्या खोलींत टाकिलें होतें त्या खोलीस रस्त्याच्या बाजूस लांकडी गजाची एक खिडकी होती, तिचे दोन तीन गज म्यां आपल्या चाकूनें तोडून कोणास न कळतां इकडे आलों.

**पुष्प०**—( भयानें ) अरे पण येणेंकरून तुजवर चोरांस सामील असल्याचें त्वरित शाबीत होणार आहे.

**श्याम०**—अरे जा रे, मी त्यांस दाद देणार आहें काय ? मूर्ख लोक भलतेच तर्क करितात, त्यांस शरम वाटत नाहीं ? आणि इतक्याउपर तूं सांगशील तर पुनः तेथें जाऊन बसतों.

**पुष्प०**—असो. त्याविषयीं विशेष काळजी करणें नको. कारण, तुझ्या सामग्याचा माल सर्व त्यास उद्यां मिळेल; व आह्मीच त्या सर्व दरोडखोरांचा नाश केला असें सर्वांस कळेल; त्यावरून अर्थात् तुजवर सामील असल्याचें शाबीत होणार नाहीं. ( दरोडखोराची सर्व हकीकत सांगतो ).

**श्याम०**—अरे, तुह्मी दोघांनीं तर खूपच तरवारबहादुरी केली. मला हें वर्तमान कळतें तर मीही तुमच्या साहाय्यास आलों असतों.

**पुष्प०**—बरें, तूं आणि तुझी बायको यांपैकीं तर कोणास चोरांनीं मारहाण अगर दुखापत केली नाहीं ना ?

**श्याम०**—मला तर कांहीं एक झालें नाहीं. मी अंधारांत एका कोंपऱ्यांत लपून बसलों होतों. परंतु माझ्या बायकोचा खालचा ओंठ चोरांनीं चिरला ह्मणून ती सर्वांस दाखवीत होती.

**पुष्प०**—( आश्चर्यानें ) खालचा ओंठ चिरला ! अरे, त्या ओंठापाशीं चोरांस काय कर्तव्य होतें ?

**श्याम०**—चोरांचा इकडे तिकडे तरवारीचा हात फिरतांना ओं-ठास लागून चिरला असेल, दुसरें काय आहे ?

**पुष्प०**—(छाकट्याची गोष्ट सांगतो.) त्या स्त्रीचाही याच दारा-पुढील पायरीवर ओंठ फुटला गेला.

**श्याम०**—(विस्मित होऊन.) अरे, ती माझीच तर बायको नसेलना!

**पुष्प०**—छिः वेड्या, तुझी बायको तेथें कशास येते ? (तिच्या खुणा सांगतो.) पण ती अशी होती.

**श्याम०**—(खिन्न होऊन) पुष्पशीला, मला माझ्या बायकोचें चिन्ह बरोबर स्मिरत नाहीं !

**पुष्प०**—तें सोडून दे पण मी तुला एक उत्तम वर्तमान सांगतों ऐक.

**श्याम०**—(उत्कंठेनें) सांग पाहूं.

**पुष्प०**—(दगवड्याचें व पद्मनयनेच्या भेटीचें वगैरे झालेलें सर्व वर्तमान सांगून.) श्यामसुंदरा, पद्मनयनेसारखें रत्न मला प्राप्त झालें. ती किती सुंदर आहे म्हणून सांगूं ! तिला पाहिल्याबरोबर सहस्त्र चंद्र एकदांच देदीप्यमान आले असें मला वाटलें!

**श्याम०**—तुझें हें वर्तमान ऐकून मलाही अत्यंत आनंद झाला आहे. ही हकीकत ऐकून आनंद होणार नाहीं असा कोण आहे ? परंतु पुष्पशीला, मी विचारतों, पद्मनयना बाहेरून चांगली आहे तशी आंतून चांगली आहे काय ?

**पुष्प०**—यांत काय संशय ! ती अत्यंत सुशिक्षित असून फारच नीतिमान् आहे.

**श्याम०**—या शहरच्या गहटीवरून माझी तर खातरी झाली आहे कीं, येथें एक स्त्री अगर एक पुरुष चियाम देखील पवित्र सां-पडणार नाहीं. घरोघर व्यभिचार व भ्रष्टाकार अगदीं गजबजत आहे. आणि इतकेंही असून आश्चर्य हें कीं, ते लोक बाहेरून लोकांस असें ढोंग दाखवितात कीं, जसे काय यांचेसारखे पवित्र व ईश्वरपरायण कोणीच नसतील. परंतु ईश्वराची भीति ह्मणून काय पदार्थ तो त्यांस ठाऊक देखील नाहीं!

**पुष्प०**—तूं ह्मणतोस ती गोष्ट खरी आहे. परंतु तें पद्मनयनेस लागू नाहीं. सर्व गांव वाईट असून ती एकटीच चांगली कशी नि-

घेल अशी शंका घेऊं नको. कारण, कोकिळेचा जन्म कावळ्यांच्याच कुळांत आहे.

श्याम०—जर ती चांगली आहे अशी तुझी खातरी झाली असेल तर उत्तम आहे. मी सर्व गांवांची साधारण गोष्ट सांगितली. असो. परंतु पद्मशीला, ही गोष्ट धैर्यशीलास आणि मनोहर पंडितास कळविली आहेस काय?

पुष्प०—होय. त्या दोघांसही पद्मनयनेच्या भेटीचें कच्चें वर्तमान कळविलें आहे; व तें ऐकून त्या दोघांसही अति आनंद झाला आहे.

श्याम०—त्या दोघांस ही गोष्ट पसंत वाटली ह्मणतोस तर मग फारच उत्तम आहे.

पुष्प०—परंतु, कायरे श्यामसुंदरा, काय विलक्षण शहर हें! या शहरांत इतकी अंदाधुंदी आणि भोळेपणा हा काळपर्यंत असेल असें मला वाटलें नव्हतें. आपण इतके दिवस कलकत्त्यास होतों, परंतु, दरवड्याचें कधीं नांव तरी ऐकिलें कायरे? राज्य इंग्रजसरकारानेंच करावें!

श्याम०—अरे, राज्य हिंदूंचें असलें ह्मणून काय झालें! परंतु चोरट्यांस इतकी फार मिळणें ही अगदी राज्यकर्त्यांस शरमेची गोष्ट आहे. मला वाटतें, येथील सर्व अंमलदार अत्यंत आळशी व विलासी असावे. एवढा दरवडा पडून कोणी उठून मदतीस आले नाहींत ही केवढी आश्चर्याची गोष्ट!

पुष्प०—आणि त्या चोरांची तरी काय विलक्षण समजूत! बळी दिल्यानें देव प्रसन्न होतो असें ते मानितात काय आश्चर्य हें! आणि दरोड्याकरितां राजकन्येचा बळी ही किती विलक्षण गोष्ट आहे!!! (दोघेही मोठ्यानें हंसतात.) एक कवडी मिळावी ह्मणून ब्रह्मगिरीच्या लक्ष प्रदक्षिणेचा संकल्प!

श्याम०—दरोड्याच्या वगैरे अशा प्रकारच्या गोष्टी आपण दंतकथांनीं ऐकत होतों; परंतु त्या येथें प्रत्यक्ष अनुभवास आल्या. याचें कारण, हें राज्य इंग्रजसरकारच्या राज्यापासुन फार दूर आहे, व यास नेपाळचा शेजार आहे. यावरून जी पूर्वी गौडबंगाली कपटविद्या होती ह्मणून सांगतात, ती या राज्यांत असेल!

पुष्प०—यावरून आपल्या मुलुखांतही असेच प्रकार होत असतील!

श्याम०—छिः छिः, असें कधींही नसेल !

पुष्प०—एकपरी आपण येथें येऊन आपणांस ह्या गोष्टी समजल्या हें उत्तम झालें. कारण, आपण आपल्या मुलुखांत परत गेल्यावर अशीं वेडें असल्यास मोडून टाकूं.

श्याम०—बरें तें असो. पुष्पशीला, माझ्या बायकोच्या पातिव्रत्याचा मला फार संशय आला आहे; तर तूं त्या समोरच्या घरीं या वेळेस जाऊन कांहीं रुपये खर्च करून त्या म्हातारीस या पायरीवर ओंठ फुटलेली स्त्री कोण होती हें पुस. कारण, तूं सांगितलेल्या सर्व गुणाखाणांचा विचार केला असतां ती माझीच बायको असावी असें मला वाटत आहे; व तें खरें किंवा खोटें हें समजल्याशिवाय माझें अंतःकरण स्वस्थ होईल असें मला वाटत नाहीं. जर ती माझीच बायको आहे असं सिद्ध झालें तर मी त्या सासऱ्याचे घरांत पुनः पाय घालणार नाहीं. इतकेंच नव्हे, तर या शहरांत सुद्धां राहणार नाहीं.

पुष्प०—श्यामसुंदरा, मी अगदीं थकून गेलों आहें, व साऱ्या रात्रींत माझा डोळ्याशीं डोळा लागला नाहीं.

श्याम०—पुष्पशीला, तें कांहीं असो; एवढें काम करून ये. मग स्वस्थ सारा दिवस नीज.मीच गेलों असतों,परंतु ती म्हातारी मला कदाचित् पाहिलें असल्यास ओळखील. आणि जर ती माझी बायकोच असेल तर तिनें माझ्या खुणा त्या थेरडीस सांगितल्या असतील. याकरितां मी गेल्यानें काम होणार नाहीं.

असें श्यामसुंदर बोलल्यावर पुष्पशील साधा पोषाख करून त्या म्हातारीच्या घरापाशीं आला तो रस्त्यांत उभा राहून आंत डोकावूं लागला. तेसमयीं पांच वाजण्याचा सुमार होऊन माणसें तुरळक वागूं लागलीं होतीं. अरुणोदय होऊन रात्रीच्या निबिड अंधकाराचा नाश होत चालला होता. त्या वेळेस ती म्हातारी जागी होऊन दरवाजाची एक फळी उघडी ठेवून आंतल्या अंगास अंथरणावर बसली होती. कोणी आपल्या घरांत डोकावीत आहे असें तीस समजतांच ती धांवत दारापाशीं आली. ती पुष्पशीलाकडे पाहून फारच आनंद पावली. कारण, तीस वाटलें कीं, हा कोणी तरी मोठा श्रीमान् आहे, तर अ-

शाची ताबेदारी केल्यास आपलें दारिद्र्य विच्छिन्न होईल. नंतर तिणें पुष्पशीलास मोठ्या आदरानें आंत बोलाविलें. आणि त्यास गाली-च्या, लोड वगैरे बिछायत होती तीवर नेऊन बसविलें. आगकाडी ओढून समई लावून त्यापुढें आणून ठेविली, आणि पानसुपारीचें तबक घेऊन त्या पुढें येऊन बसली. नंतर ती ह्मणते:—

म्हा०—रावसाहेब, आपण या वेळेस इकडे कशी वाट चुकलां ?

पुष्प०—एरव्हींच आलों.

म्हा०—तें समजलें. परंतु सारी रात्र कोठें कमिली ?

पुष्प०—सारी रात्र इकडे तिकडे फिरण्यांतच गेली.

म्हा०—( हांसून ) कोठें कांहीं योग जमला नाहीं वाटतें ? आणूं का एखादें पांखरूं ?

पुष्प०—( हांसून ) हो हो, पांखरें बाहेर पडण्याची ही वेळ आहे खरी. ( मनांत ) आतां इच्याशीं इच्यासारखें बोलल्याशिवाय खरें बाहेर पडणार नाहीं. ( बाहेर ) आतां दिवस उगवत चालला आहे, या वेळेस पांखरूं कसें सांपडेल ?

म्हा०—वः! ही वेळ तर उत्तम; नवऱ्यांच्या माखरझोंपेची व बाय-कांची दळणकांडण करीत फिरण्याची! (मोठ्यानें हांसत) कां खरें कीं नाहीं?

पुष्प०—( मनांत ) काय हलकट आहे ही ! हरहर ! ! ( बा-हेर ) पण मी सांगेन तें पांखरूं आणिलें पाहिजे.

म्हा०—तुह्मीं तसें पोटाला दिल्यास जें सांगाल तें आणीन.

पुष्प०—येथील राजाची मुलगी आणाल ?

म्हा०—छिः भलतेंच, तेवढें नाहीं होणार. तिजकरितां तर हे भों-तालीं पायलीचे पंधरा राजे आज कइक दिवस लाळ घोंटीत पडले आहेत; व तीस दृष्टीस पाडून देण्याकरितां हजारों रुपये खर्च कर-ण्यास तयार आहेत. परंतु ती कसची सांपडते ? आणि ती तशी नाहीं असेंही कित्येक खटपट करणारांस दिसून आलें आहे.

पुष्प०—मग तुह्मी दुसरे कोणास आणणार ?

म्हा०—( हळूच ) येथील प्रतिनिधीची बालविधवा चौदा पंध-रा वर्षांची मुलगी आहे तिला आणितें. ती कशी आहे ह्मणाल तर जसें गुलाबाचें फूल !

पुष्प०—( हांसून ) गुलाबी थंडीच्या समयीं या गांवांत गुलाबाचीं फुलेंही बरींच अमावीतसें वाटतें ?

म्हा०—तें पुसूंच नका; घरोघरीं एकाहून एक चढाई !

पुष्प०— बरें, तिला आणिल्यास खर्च काय पडेल ?

म्हा०— ( हात जोडून ) पंचवीस रुपये पडतील रावसाहेब.

पुष्प०—हे घ्या पंचवीस रुपये.

म्हा०—( आनंद पावून मनांत ) यानें दहा तरी द्यावे ह्मणून मीं त्यास पंचवीस सांगितले; परंतु त्यानें कांहीं किसकिस नकरितां पंचवीस दिले. आतां हा मागेल तें केलें पाहिजे. ( बाहेर ) रावसाहेब, तुह्मी येथें बसा, मी इतक्यांत येतें पहा. ( पण ती या वेळेस कशी सांपडेल कोण जाणें अशी पुटपुटत जाऊं लागते. )

पुष्प०—आणि ती आतां सांपडण्यासारखी नसेल तर रात्रीं घेऊन या.

म्हा०—वाहवा ! मग ठीक आलें. रावसाहेब, मी रात्रीं तिला येथें सारी रात्र राहण्यास घेऊन येईन. ( पुनः येऊन बसते. )

पुष्प०—बरें तुमचें नांव काय ?

म्हा०—रावसाहेब, माझें नांव आवडाबाई. पण मला तुमच्या सारखे येणार जाणार आजी ह्मणतात.

पुष्प०—बरें, अजे, काल ओंठ फुटला ती कोण होती गे ?

म्हा०—ती मेल्या त्या मुरतराम सोनाराची पोरगी. भली छिनाल रांड ! ती पाहिजे तर आतां घेऊन येतें.

पुष्प०—पण तिचा ओंठ फुटला आहेना ?

म्हा०—कांहीं झालें असलें तरी ती माझा शब्द ऐकतांच हजार बहाणे करून येईल.

पुष्प०—काल तिच्या बापाच्या घरावर दरोडा पडला असें ऐकतों ?

म्हा०—अं: ! असे कैक दरोडे पडतात; त्यांची भीति कोणास आहे?

पुष्प०—पण काय गे अजे, ती तशी ओंठ फुटून घरीं गेल्यावर तिला कोणी बोललें नसेल ?

म्हा०—( हांसून ) वा! रावसाहेब वा! तुह्मी असल्यांमध्यें रात्रंदिवस राहून अशा वेळेस तिणें काय निमित्त केलें असावें हें तुह्मास समजत नाहीं? तिचा नवरा येथें आला आहे; तेव्हां त्यांगेच रात्रीं धिंगामस्ती करतांना ओंठ फोडिला ह्मणून आईसाहेबांस सांग असें म्यां तीस सांगितलें होतें. मग तिणें काय केलें कोण जाणें.

पुष्प०—हें छपविण्यास दरोड्यानें कदाचित तिला चांगलें साहाय्य केलें असेल. बरें तिचें सासर कोणत्या गांवीं आहे?

म्हा०—( किंचित् संशयात्मक होऊन ) चौशहापूर.

पुष्प०—तिचा नवरा येथें एकटाच आला आहे काय?

म्हा०—नाहीं; त्याचे कांहीं स्नेही बरोबर आले आहेत, अशी कांहीं कथा ती सांगत होती. बरें पण रावसाहेब, आपण तिजविषयीं इतकी चौकशी करितां याचें कारण काय?

पुष्प०—(दुःखानें) एरव्हींच. पण तूं असें वागतेस हें वाईट! इतकें पुष्पशील बोलतांच तिणें पुष्पशील पुढें पान द्या ह्मणून तबक ठेवून आपण घावऱ्या घावऱ्या आंत गेली; आणि आंतील मनुष्यास ह्मणते:—

म्हा०—भालेरावा, घात झाला!

भालेरा०—अजे, काय झालें गे?

म्हा०—अरे, हा मेला बाहेर बसला आहे हा त्या चमेलीच्या नवऱ्या रोबर आलेला त्याचा स्नेही दिसतो! त्यानें माझ्या पोटांत शिरून सर्व काढून घेतलें. आतां तो तिच्या नवऱ्याला सर्व सांगून तिला संसारास मुकवील, आणि माझी फजिती करील. तूं बाहेर जाऊन त्याला बसवून ठेव, मी आलें.

पुष्पशील विडा न घेतां विचार करतो:—"काय अनर्थ हा! श्यामसुंदराचा बाप किती थोर, कुलीन आणि सदाचरणी आहे. त्याला हें वर्तमान कळतांच तो प्राण देईल, अगर विरक्त होऊन तपश्चर्या करण्याकरितां कोणीकडे निघून जाईल. अरेरे! हे प्रकार कसे होतात हें मी आतां समजलों. स्त्रियांस विद्या न शिकविण्याचीं हीं फळें होत. श्रीमंत लोकांच्या मुली लाडक्या असतात; व त्यांस आपला वेळ घालविण्यास काय उपाय करावा तो समजत नसतो. दुसरें,

त्यास खाण्यापिण्यास उत्तम प्रकारचें मिळून वस्त्रालंकारांची समृद्धि असते, व नौकर चाकर त्यांचे ताब्यांत असून त्या बहुतेक स्वेच्छाचारी असतात; यामुळें त्यांचें मन दुसऱ्या कोणत्याही गोष्टीकडे न वळतां तें विषयाकडेच आसक्त होतें. रात्रंदिवस मनांत विषयसुखाचे तरंग उठावयाचे, मग त्या अनर्थास काय पारावार आहे! मी ह्मणतों, श्यामसुंदराच्या बायकोनें हें फार थोडें केलें; वस्तुतः तिणें याच्याही पलीकडे जाऊन ठेपावें. हे विचार या वेळेस माझ्या मनांत आले आहेत खरे; परंतु माझें शरीर क्रोधाग्नीनें अत्यंत तप्त होऊन गेलें आहे. असें वाटतें कीं, त्या जारिणीस याच क्षणीं जाऊन ठार करून टाकावें! बरें, आतां मी श्यामसुंदरास काय सांगूं? ती त्याची बायको होती याविषयीं आतां संशय राहिला नाहीं. कारण, मी कोण आहे याचा विचार न करितां ती सहज बोलून गेली. अखेरीस तिला मजविषयीं किंचित् संशय येऊन ती उठून आंत गेली. काय असेल तें असो, आतां आपण जावें."

याप्रमाणें विचार करून पुष्पशील जाऊं लागला. इतक्यांत तो आंतील मनुष्य बाहेर येऊन पुष्पशीलाशीं बोलूं लागून त्यास थांबवितो.

ह्मातारीनें पुष्कळ विचार करून ठरविलें कीं, यास बाहेर पडूं देऊं नये. ती आपल्याशीं ह्मणाली, "यानें मला पंचवीस रुपये कपटानें देऊन त्या गाईचा आणि माझा घात करण्याचा इरादा केला आहे. मेला जाऊं लागला, पण रात्रीं येतों वगैरे कांहीं बोलतो तरी का! हरहर! मेल्यानें कपट केलें! मला हें अगोदर समजतें तर तिला अशा थापा दिल्या असत्या कीं, पत्ताच न लागे. पण काय करूं? मी इतकी ठक असून हा मेला मला महाठक मिळाला. याचा प्राण घेतल्याशिवाय माझा तरणोपाय नाहीं. मग त्याबद्दल काय होईल तें होवो."

त्या मनुष्याशीं किंचित् बोलणें झाल्यावर फार वेळ झाला ह्मणून पुष्पशील पुनः जाऊं लागला. इतक्यांत ह्मातारी बाहेर येऊन तिणें त्या मनुष्याला, पुष्पशीलास जाऊं देऊं नको अशी खूण केली. पुष्पशीलाला थांबविण्यास त्याला दुसरा कांहीं इलाज दिसेना, ह्मणून त्यानें त्याचा जोडा लाथेनें ठोकर मारून उडवून दिला. हें त्याचें कृत्य पाहून आपण या ठिकाणीं आलों हा फार मूर्खपणा केला;

असें पुष्पशीलास वाटून, तो आलेला क्रोध आंवरून जोडयाची आशा न बाळगतां बाहेर पडला. त्याच्या मागें पुनः म्हातारीच्या सांगण्या-वरून तो मनुष्यही बाहेर रस्त्यांत आला, आणि चाललास कोठें? असें पुष्पशीलास म्हणाला. ते समयीं पुष्पशीलास क्रोध न आंवरून त्यानें त्या मनुष्यास मोठ्या जोरानें लोटून दिलें, त्या लोटण्यासरसा तो मनुष्य रस्त्याचे बाजूस जवळच बिनतोंड बांधलेली एक जमीनी-बरोबर मोठी विहीर होती तिच्या कांठावर जाऊन आपटला. त्या वेळीं त्यानें पुनः आपल्या मागें येऊं नये म्हणून पुष्पशीलही त्या विहिरीचे कांठावर जाऊन त्याशीं "पुनः भलत्याचे मागें लागूं नको, व मी कोण आहें हें लक्ष्यांत ठेव," इत्यादि भाषणें करूं ला-गला. इतक्यांत ती म्हातारी, जी एवढा वेळ एकसारख्या शिव्या देत पुष्पशीलाजवळ फिरत होती, तिनें 'अग या मेल्याची खाज कधीं भरते!' असें बोलून पुष्पशीलास दोहों हातांनीं अकस्मात् मोठा धक्का मारून त्या विहिरींत लोटून दिलें. पुष्पशील विहिरींत पडतांच म्हातारी व तो मनुष्य या उभयतांनीं घरांत जाऊन दार बंद केलें.

# भाग ६.

## अज्ञानत्वाचा परिणाम.

मनोहरपंडित आपल्या श्वशुरगृहीं द्विरागमनास गेला होता, तेथेंही मोठा चमत्कार झाला. त्याला तिकडील एका सुंदर रंगमहालांत टाकिला होता; व तेथें उत्तम रोषनाई केली होती. तेथें तो जाऊन बसल्यावर थोडकेच वेळानें त्याची स्त्री हातांत पंचारती घेऊन आली. ती लहान बांध्याची असून अगदीं अशक्त होती. तिणें मनोहरपंडितास परम प्रीतीनें ओंवाळून त्याच्या मुखांत तांबूल घातला. त्याच्या पायांस धूप चोळिले. व हातपाय रगडून त्याची पुष्कळ सेवा केली. त्याच्या अंगास सुवासिक अत्तर लाविलें, व हातांत पुष्पांचे गजरे घातले. आटविलेलें दूध साखर घालून प्यावयास पुढें ठेविलें. व त्याची आज्ञा ऐकण्यास अगदीं तत्पर होऊन राहिली.

अशा प्रकारचा आपल्या स्त्रीचा आदरसत्कार पाहून मनोहर पंडितास फार आनंद वाटला. परंतु त्याबरोबर त्यास दुःखदायक गोष्ट ही आढळली कीं, त्याच्या स्त्रीचा मुखचंद्रमा त्या वेळेस पूर्णचंद्रवत् प्रफुल्लित दिसावा तसा दिसला नाहीं. त्यानें तिची मुखश्री टवटवीत करण्यास पुष्कळ विनोदपर भाषण केलें; व नानाप्रकारें हास्यरस उत्पन्न केला; परंतु बळेंच आनंद दाखविण्याच्या चिन्हाशिवाय दुसरें कांहीं दिसेना. अखेरीस तिची कळी फुलत नाहीं असें पाहून, तिच्या मुखेंदूवर हृद्रोगाहूनें छाया पडली आहे असें त्यानें अनुमान केलें. नंतर जिज्ञासु होत्साता तिला प्रीतीनें आलिंगन देऊन तो ह्मणतो:-

**मनो०**--प्रिये, तूं अशी दुःखी कां बरें दिसतेस?

**स्त्री**--( बळेंच आनंद दाखवून. ) नाहीं, मी दुःखी असण्याचें कारण काय?

**मनो०**--छिः प्राणवल्लभे तूं मजपासून चोरतेस. तुझें मन कोणत्या तरी महा चिंतेनें झुरत आहे, यांत संशय नाहीं.

स्त्री—( मोठ्यानें स्वास टाकून. ) प्राणनाथ मला काय कमी आहे बरें ! मी मनांत कशाकरितां झुरूं ?

मनो०—प्रिये, तूं मोकळ्या मनाची असून तुझ्या देहास शस्त्राप्रमाणें टोंचत असलेल्या व्याधीचें निरुपण तुला मजजवळ करवत नाहीं काय ?

स्त्री—( डोळ्यांत आंसवें आणून. ) प्राणनाथ. काय सांगूं ! कांहीं सांगण्यासारखें नाहीं !

मनो०—( आश्चर्यानें. ) अगे, तुझ्या देहास तें दुःख शस्त्राप्रमाणें प्रहार करीत असून सांगण्यासारखें नाहीं म्हणून ह्मणतेस ! वः काय चमत्कार हा ! त्या चिताग्नीनें तुझे कमळासारखे डोळे खोल नेले आहेत; तुझ्या गालांवरील गुलाबी छटा नाहींशी करून तुझें सर्वांग भाजून टाकिलें आहे; तुझें अर्धोन्मित गुलाबकळीसारखें हास्यमुख कोमेजून गेलें आहे; आणि तुझ्या सर्व विचारशक्तीचा ऱ्हास करून तुला कोणतेंही काम गोड लागत नाहीं, अशी तुझी स्थिति त्या दुःसह हृद्रोगानें केली असून तूं तें कांहीं नाहीं ह्मणतेस याला काय ह्मणावें ! सखे, तूं आलीकडे फार खोल झालीस.

स्त्री—प्राणवल्लभा, मी खोल नव्हे बरें. ( सद्गदित होऊन. ) मी काय करूं ! माझ्यानें तें दुःख आपल्याजवळ सांगवत नाहीं.

मनो०—सखे, आपल्या पतीस न सांगण्यासारखी गोष्ट स्त्रियांस कोणतीच नाहीं. पतिसंबंधी सुखदुःख स्त्रियांना मातापितरांस सांगतां येणार नाहीं; मातापितरांचें सुखदुःख इष्टमित्राजवळ कदाचित् सांगतां येणार नाहीं; परंतु भ्रतारापासून चोरून ठेवण्याजोगी अडचण स्त्रियांस कालत्रयीं येणार नाहीं, अशी माझी खातरी आहे.

स्त्री—पण प्राणनाथ, जर ती गोष्ट भ्रताराच्याच वाइटाची असेल तर:—

मनो०—ती तर भ्रतारास अवश्य सांगितली पाहिजे. कारण, तिचें निराकरण तोच करणार. प्रिये, बोल, बोल आतां, काय हृद्रोग आहे तो कळूं दे. ( तिची हनवटी धरितो. )

स्त्री—( नेत्रांत अश्रु आणून ) प्राणनाथ, त्या दिव—नको बाई ! मी नाहीं सांगत. आपल्यास त्यापासून फार वाईट वाटेल.

मनो०—( तिचा हात आपल्या गळ्यावर ठेवितो. ) प्रिये, तुला माझ्या गळ्याची शपथ आहे. खरें काय असेल तें सांग; मग तें माझ्या दुःखास कारण असलें तरी चिंता नाहीं.

स्त्री—सांगतें तर. देवा! तूं संभाळणार आहेस. आज कमी हो, सुमार तीन वार झाले, शेजारीं शिलेदारणीकडे एक काशीचा कापडी आला होता. त्या वेळेस तेथें पुष्कळ बायका जमल्या होत्या, ह्मणून मीही सहज तेथें गेलें. पण काय असेल तें असो, माझ्या तोंडाकडे पहातांच तो ह्मणाला, या पोरीचा नवरा एका महिन्यानें याच गांवांत पिसाळलेलें कुत्रें डसून मरेल.

मनो०—( हांसून. ) एवढेंच का कारण, या सुकुमार बाळेच्या कोमळ अंतःकरणास इतकें दुःख देत आहे? मीं ह्मटलें दुसरें कांहीं भयंकर कारण असेल.

स्त्री—( किंचित् हांसून. ) आतां यापेक्षां आणखी भयंकर तें कोणतें पाहिजे?

मनो०—स्त्रिये, तूं अगदीं भोळी व वेडी आहेस. अगे, हे लबाड लोक बायाबापड्या भोंदण्याकरितां गांवांत फिरतात, आणि भलतेंच एखादें भय, भोळ्या लोकांच्या पोटांत उत्पन्न करून आपलें पोट जाळितात, हें तुला अजून कसें कळत नाहीं? जर तो माझ्या समक्ष असें बोलता तर तेथेंच त्याचें टाळकें जोड्यानें सडकलें असतें.

स्त्री—प्राणनाथ, मीही त्याच्या बोलण्याकडे विशेष लक्ष्य दिलें नव्हतें; परंतु आपला इकडे येण्याचा कांहीं संबंध नसतां त्याच्या बोलण्याप्रमाणें महिना भरण्याच्या सुमारासच आपण अकस्मात् येथें आलां ह्मणून माझ्या पोटांत तो संशय आला आहे.

मनो०—( धिक्कारून ) अंः! त्यावर काय आहे! तूं त्याबद्दल कांहीं एक मनांत आणूं नको. तूं पहा, जो मी अरण्यांतील वृक, व्याघ्र, आणि सिंह इत्यादिकांच्या मागें लागून त्यांस यमसदनास पाठवितों त्या मला पिसाळलेलें कुत्रें डसेल काय? आणि जरी डसलें तरी मजजवळ असें एक उत्तम औषध कुत्र्याचे विषावर आहे कीं, तें लाविलें ह्मणजे कसेंही पिसाळलेलें कुत्रें असलें, तथापि त्याच्या विषापासून कांहीं व्हावयाचें नाहीं.

**स्त्री**—तें सर्व खरें; परंतु माझ्या मनांतील धास्ती जात नाहीं त्यास मी काय करूं? ठकुबाई काशीकरीण त्यावर मला सांगूं लागली कीं, काशीचे कापडी जें बोलतात तें अगदीं खरें होतें.

**मनो०**—(मनांत) काय ह्या बायका मूर्ख आहेत. हरहर! आतां इच्या मनांतील शंका तो काल निघून जाई तोंवर जाणार नाहीं. असो, यांत कांहीं विशेष नाहीं. (बाहेर) प्रिये, यावर तूं बिलकुल भरंवसा ठेवूं नको हो, हें सर्व खोटें आहे.

असें **मनोहर** पंडित बोलल्यावर त्यास निद्रा आली. त्याची स्त्री अत्यंत भोळी, व अतिशय भेकड असे. तिला लिहितां वाचतां वगैरे कांहीं येत नसून दुसरा जें सांगेल तें तिला खरें वाटत असे. तिचा बाप व माहेरकडील सर्व मनुष्यें जुन्या चालीचीं धर्मभोळीं असत. **मनोहर** पंडिताच्या घरच्या मनुष्यांची वागणूकही प्रायः त्याप्रमाणेंच होती. म्हणून त्याच्या स्त्रीचा ग्रह व श्रद्धा सर्व प्रकारच्या भोळ्या व कल्पित दंतकथांवर असे.

त्या कापड्याची काळवाणी कदाचित् खरी होईल कीं काय, कोण जाणे, अशा प्रकारच्या विचारांत **मनोहर** पंडिताची स्त्री निमग्न होऊन मनाच्या अनेक तरंगांत भ्रमण करूं लागली. तिला निद्रा येईना व क्षणोक्षणीं तिच्या नेत्रांवाटे अश्रुधारा चालूं लागल्या. अशा स्थितींत ती असतां एकदम वरून एक पाल **मनोहर** पंडिताच्या डोक्यावर पडली. मग काय विचारावयाचें आहे! त्या अबलेच्या पोटांतील धास्ती शतगुणित वाढून ती मनांतल्या मनांत जळून खाक झाली. तिनें विचार केला कीं, आतां आपल्या नवऱ्यास जागें करून हें वर्तमान सांगितलें तर त्याच्या मनास कदाचित् चरका बसेल; याकरितां हें वर्तमान कोणास सांगूं नये. पुढें अनेक कुविचार तिच्या मनांत येऊन तिला वाटलें कीं, आपला नवरा लवकरच मरणार यांत संशय नाहीं, तस्मात् आपण त्याचा मृत्यु पहाण्यास जगावें, त्यापेक्षां त्याच्या अगोदर आपला प्राणत्याग करावा हें उत्तम आहे. परंतु पुनः ती ह्मणाली, "मी मेलें तर माझ्या आईबापांस फार दुःख होईल, व मलाही आत्महत्येचें पाप घडेल. पालिपतनाबद्दल शांति केली असतां त्यापासून अनिष्ट निवारण होतें असें ह्मणतात;

तेव्हां तो उपाय करून धीर धरून राहावें, पुढें भगवान् आहे. "

असें मनांत आणून नवरा मेल्यावर पुढील वैधव्याच्या दुःखाच्या अनेक कुकल्पना तिच्या मनांत आल्या, व त्या दुःखदायक स्थितींत-च तिला निद्रा लागली. त्या रात्रीं तिला स्वप्न पडलें कीं, जशा काय दोघी तिघी विधवा रडत रडत तिजकडे आल्या, आणि त्यांणीं तिची ओटी राखेनें भरली.

असें स्वप्न पडतांच ती दचकून जागी झाली, आणि अत्यंत शोक करूं लागली. तिनें आपल्या कपाळावर मारून घेतलें, आणि मणगट चावून तोंडांत माती घातली. डोकें भुईवर आपटलें, आणि मनांत अति कष्टी होऊन हातपाय पासरूं लागली. तिणें आपले अलंकार काढून फेकून दिले आणि म्लानवदन करून ती मनोहरपंडिताकडे पाहूं लागली.

अशा प्रकारच्या एका मागें एक अनिष्ट सूचना आल्यामुळें त्या अबलेचें धैर्य खचून तिची कंबर खचली. तिच्या हातांपायांतील शक्ति नाहींशी झाली. तिची छाती फाटून काळीज तुटूं लागलें; व सर्वांग कंपायमान होऊन त्यावर रोमांच उभे राहिले. नेत्रांतून अश्रुपात एकसारखा चालला; व कंठ भरून आला. ऊर धडधडां उडूं लागला व सर्व दिशा तिला शून्य भासल्या.

अशी तिची अवस्था झाल्यावर आपला पति आतां लवकरच मरण पावणार अशी तिची पक्की खात्री झाली. पुढें या संकटास कांहीं तोड दिसत नाहीं, सबब आपलाच प्राणत्याग करावा; असें मनांत आणून दुसऱ्या विचाराकडे मन न लावितां, व मनोहर पंडितास न कळवितां, तिणें आपल्या चंद्रहारांतील एक हिरकणी काढिली, आणि ती गिळून स्वस्थ मनोहर पंडिताच्या शेजारीं निजून राहिली.

अरुणोदयाची वेळ होतांच मनोहर पंडित जागा होऊन मोठ्या प्रेमानें तीस आलिंगन देऊं लागतो, तों ती लांकडासारखी कडक होऊन काल्याप्रमाणें गार लागूं लागली. तेसमयीं तो घाबरा होऊन तिला काय झालें म्हणून हालवूं लागला, व मोठ्यानें तिला हांका मारूं लागला; परंतु तें प्रेत त्याला कोठून जबाब देणार? अखेरीस त्याच्या मनांत भीति उत्पन्न होऊन ही मेली असावी असा त्यास भास

झाला. नंतर दिवा घेऊन पाहूं लागला तों ती हातपाय पसरून प-डली आहे, तिच्या अंगावरील वस्त्रें अस्ताव्यस्त झालीं आहेत, केंसांचा डोक्याभोंवतीं भारा झाला आहे, डोळे कवड्यांसारखे बाहेर आले आहेत, व जीभ तोंडाबाहेर पडली आहे असें दिसलें.

याप्रमाणें तिचें भयंकर प्रेत दृष्टीस पडतांच मनोहरपंडितानें मोठ्यानें किंकाळी फोडून सासऱ्यास हांक मारिली. ती त्याची भयप्रदर्शक आ-रोळी ऐकून घरांतील सर्व मनुष्यें घाबरून धांवत त्याजजवळ गेलीं. ते-समयीं मनोहर पंडिताच्या बायकोचें प्रेत सर्वांच्या दृष्टीस पडतांच एकच आकांत झाला. बायका, पोरें व मोठीं मनुष्यें अशीं एकदांच मोठ्यानें रडूं लागलीं. त्यांचा तो भयंकर आक्रोश ऐकून शेजारी पा-जारी व रस्त्यांतील शेंकडों मनुष्यें वाड्यांत आलीं. नंतर मुलीस मरा-यला झालें काय याचा शोध चालविला. कोणी ह्मणाले: सर्पदंश झाला असेल; कोणी ह्मणाले, विषप्रयोग झाला असेल; अशा अनेक कल्पना निघूं लागल्या. कांहीं अति शहाणे होते ते म्हणाले, हा दांडगा जां-वई काल आला यानेंच रात्रीं मस्ती करून कोंवळी पोर मारून टा-कली असेल. एक जण म्हणाला, छि: इतका इंग्रजी शिकून हुशार झालेला भांग प्याल्यासारखें का करणार आहे? दुसरा ह्मणतो; अहो, हें भांगेचें काम नव्हे; हें दुसरेंच कदाचित् असेल. ( हळूच ) हे एम्. ए. आणि बी. ए. दारू पिण्याचे कामांत मोठे प्रवीण असतात. आणि या स्वारीनें बहुतकरून एखादी बाटली झोंकून हें कृत्य केलें असेल; किंवा पोरीस पाजून तिला तें न पचून प्राण निघून गेला असेल.

याप्रमाणें अनेक रीतीनें विचक्षणा होत आहे, इतक्यांत एकानें जाऊन एका दीड शहाण्या वैद्यास ती कशानें मेली याची परीक्षा करण्याकरितां आणिलें. त्यानें सर्व चिन्हें पाहून सांगितलें कीं, सर्पदंश नव्हे व विषबाधा नव्हे. भूत पिशाच नव्हे व शस्त्रघात नव्हे. या उपर काय असेल तें पाहून घ्या.

याप्रमाणें वैद्य बोलल्यावर मनोहरपंडितानेंच मद्यपान करून आणि करवून इचा प्राण घेतला असें सर्वांनीं ठरविलें. नंतर लागलेंच त्याला पोलिस शिपायाच्या ताब्यांत देऊन तिची पुढील तयारी चा-लविली. त्यांणीं त्या प्रेतास न्हाऊं घातलें व कपाळीं मोठें कुंकूं ला-

विलें; तोंडांत विडा घालून तिची ओंटी भरली; आणि प्रेतावर गुलाल व विड्याचीं पानें टाकलीं. पुढें वाद्यें लाविलीं व पांच पन्नास मनुष्यांनीं बरोबर जाऊन तिला अग्नि दिला. बायकांनीं मनोहर पंडितास शिव्यांचा अगदीं भडिमार चालविला; व पुरुष आंतल्याआंत त्याच्या दुष्टकृत्याचें आश्चर्य करूं लागले.

---

# भाग ७.

श्लोक.

॥ जे न्यायकर्ते विषयी विकारी ॥ कर्तव्यकर्मे त्यजितात सारीं ॥
॥ आलस्य अज्ञान मुळा वरीती ॥ अनीति ये दीनमुळावरी ती ॥

## विलक्षण न्याय.

धैर्यशील त्या शिलक राहिलेल्या चोरमागें अशा झपाट्यानें लागला कीं, त्या चोरास गांवांत इकडे तिकडे लपण्यास वाव न सांपडून तो रानोमाळ पळूं लागला. धैर्यशीलानेंही त्याचा पिच्छा न सोडितां तो एकसारखा त्याच्या मागें लागला. अखेरीस गांवापासून सुमारें एक कोश गेल्यावर तेथें एक जोंधळ्याचें शेत उभें होतें त्यांत तो शिरला. तेसमयीं धैर्यशीलाचा नाइलाज होऊन तो मागें परतला. त्याच्या अंगांतील चिलखताचें व हत्यारांचें त्यास ओझें झालें होतें, व अंगास घाम आला होता; ह्मणून त्यानें सर्व हत्यारें वगैरे लढाऊ पोषाक उतरून तो शिपायाजवळ दिला. आणि त्यास त्या शेताच्या भोंवतींच दिवस उगवेपर्यंत फिरण्यास सांगून आपण बिन हत्यारी पहांटच्या समयाची थंडी हवा घेत हळूहळू गांवाकडे येऊं लागला. जरा कांहीं शेतांत वाजलें ह्मणजे तो चोर आला असें समजून तिकडे धांव. व कांहीं नाहीं असें वाटल्यावर पुनः गांवाकडे जाई; असें करीत तो शहरांत आला. त्याच्या बिन्हाडाच्या रस्त्यावर एक पोलिस शिपायांचें ठाणें होतें. त्या ठाण्यांत सात आठ शिपाई होते. त्यांस वांटून दिलेल्या रस्त्यांत रात्रीची गस्त घालून चोऱ्या वगैरे शहरांत होऊं देऊं नये, हें त्यांचें काम होतें. परंतु त्यांच्यांवर चौकशी करणारे दरोगे वगैरे असत, ते अंदाधुंद राज्य ह्मणून चोरांस सामील होऊन आपले महालांत स्वस्थ निद्रा करीत; या कारणानें शिपाईलोकही गस्त वगैरे न घालतां अंमल खाऊन स्वस्थपणें चावडींत झोंप घेत पडत. रात्रीं जेव्हां भयंकर दरवडा पडला तेव्हां हे लोक

आपल्या अमलाच्या ऐन भरांत होते; सबब त्यांस काय झालें हें समजलें देखील नाहीं. अरुणोदय होतांच जेव्हां गुलाबी थंडी पडली, तेसमयीं त्या आळशी शिपायांपैकीं एक सुमारें पंचेचाळीस वर्षांचे उमरीचा झोलबा नांवाचा शिपाई जागा झाला. तो अर्धवट अंमल उतरल्यासारखा होऊन लघवी करण्याकरितां बाहेर आला. इतक्यांत त्याची आणि धैर्यशीलाची गांट पडली. त्या वेळीं मी सरकारचा शिपाई आहें, व हा कोणी हलकट मनुष्य आहे असें समजून झोलबा त्यास मोठ्या आवेशानें व आढ्यतेनें विचारतो:--

**झोलबा.**--कोण आहे?

**धैर्यशील.**--मुसाफर.

**झो०**—इतक्या रात्रीं कोठें गेला होतास?

**धै०**—( त्याच्या प्रश्नाचें उत्तर न देतां ) तूं कोण आहेस?

**झो०**—( रागावून ) तुला मस्ती आली आहे काय? येथील पोलिस शिपायांचा कडाका तुला ठाऊक नाहीं वाटतें? तुझ्या डो-ळ्यांवर धुंदी आली आहे नाहीं? बोल लवकर कोठें गेला होतास; नाहीं तर तुला दाखवितों कसें आहे तें.

**धै०**—( संतप्त होऊन ) मुर्खा, सरकारानें तुला पोलिस शिपाई नेमिलें असून शहरांत हवे ते व्यापार रात्रीं चालतात, त्यांकडे लक्ष्य न पुरवितां भलत्यावर शंका घेतोस, तुला लाज वाटत नाहीं!

**झो०**—( त्यास बळकट धरून ) मुरारबा, अहो देवबा, धांवा धांवा चोर पकडला, लवकर या.

**धै०**—( त्यास एका हिसक्यानें जमीनीवर आदळून ) गाढवा-च्या लेंका मी कोण आहें तें तुला ठाऊक नाहीं? जर मजजवळ या वेळेस तरवार असती तर तुझा येथेंच शिरच्छेद केला असता. भल-त्याला चोर ह्मणतोस? तुझ्या बापांनीं दरोडे घातले त्यांची त्यां काय अवस्था केली आहे ती दाखवितों चल.

( दुसरे दोघे धांवून येतात ).

**झो०**—आहो बांधा याला, पहातां काय राव! चला याला द-रोगेसाहेबांकडे पोंचवून देऊं, ह्मणजे समजेल काय आहे तें.

**धै०**—( मनांत ) जर मजजवळ या वेळेस माझीं हत्यारें असतीं

तर यांपैकीं एका दोघांस तरी लंबे करून मी घराकडे निघून गेलों असतों. परंतु काय करूं ! नाइलाज झाला आहे. असो. आतां या हलकटांशीं जास्ती न बोलतां हे कोणता दरोगा ह्मणत आहेत त्याकडे जाऊं, आणि त्यास रात्रींचें सर्व वर्तमान सांगूं. कारण तो सुज्ञ असेल. याकरितां आतां यांच्याशीं जास्ती बोलूं नये. ( बाहेर ) अरे काय आहे बाबांनो, तुमच्या मनांत आहे तरी काय !

पुरा०—कां झोलबा, आतां कसा वठणीस आला! ( कंबरेचा कांच्या त्याला बांधण्याकरितां सोडितो. )

धै०—तुह्मी मला जिकडे न्याल तिकडे मी येतों, पण मला बांधूं नका.

झो०—तूं मोठा रावण आहेस काय ! ( आणखी दोघांतिघां शिपायांस उठवून बाहेर आणितो. )

( धैर्यशील बांधूं देत नाहीं, परंतु ते बळेंच त्यास बांधितात. )

दे०—चल बे, आतां पुढें हो.

झो०—( मोठ्या आवेशानें त्यास गचांडी मारून ) असा पुढें घातला पाहिजे, चल ह्मटल्यानें का तो चालणार आहे ! (दोघे तिघे एका बाजूस कुजबुजतात, आणि पुनः धैर्यशीलापाशीं येतात. )

पु०—कारे, अजून तुला आह्मी सोडतों, सुटावयाची मर्जी आहे!

धै०—( नम्रतेनें ) नाईकजी मी खरेंच सांगतों, मजकडे कांहीं अपराध नाहीं. मी कधींही खोटें बोलत नाहीं. या वेळेस मला सोडाल तर मी तुमचे मोठे उपकार मानीन.

दे०—( दोन बोटें दाखवितो. ) इतके पडतील.

धै०—( क्रोधानें ) काय तुह्मांस दोनशें रुपये लांच देऊं ! एक कवडी तर मागा. चला तुमच्या वरिष्ठाकडे ह्मणजे तुमचे दोनशें काढितों.

झो०—बोलूं नका राव, इला जर फांशीं न देववीन तर नांव बदलून टाकीन! ( मिशांवर ताव देतो. )

धै०—अरे जारे, अशा धमक्या देणारे तुझ्यासारखे केक पाहिले आहेत.

झो०—बरें, पहा चमत्कार.

याप्रमाणें बोलत ते सर्व दरोगेकचेरींत आले. तेथील जमादारास

सर्व वर्तमान सांगितल्यावर त्यानें धैर्यशीलास, नागव्या तरवारींच्या पाहाऱ्यांत कैदी होते, त्यांत नेऊन बसविलें. आणि फक्त झोलबास बसवून घेऊन बाकीच्या सर्वांस जाण्यास सांगितलें. दरोगेसाहेब आठ वाजत तोंपर्यंत निजूनच उठले नाहींत. मग हळूच उठून मुखमार्जन वगैरे करून कचेरींत आले. आणि आज नवीन तंटे कोणते आहेत ते पुढें येऊं द्या ह्मणून त्यांनीं हुकूम केला. नाइकानें झोलबास पुढें पाचयास खूण केली. झोलबानें पगडी सरसावून मिशांवर ताव देऊन मोठ्या नम्रतेनें जाऊन दरोग्यास सलाम केला.

दरोगा—( सलाम न घेतां मोठ्या आदचतेनें. ) काय आहे रे झोलब्या ?

झो०—जी सरकार, पायांपाशीं अर्ज इतकाच आहे कीं, आमच्यासारख्या इजतदाराची नौकरी करण्याची सोय आतां राहिली नाहीं.

द०—कां ? आतां काय झालें ?

झो०—चोरटे लोक जर आह्मांस लाथा बुक्या मारूं लागले, आणि त्यांची दाद जर सरकारांत न लागेल, तर नौकरी करण्याची काय शोभा ?

द०—काय, तुला शिपायाला चोरांनीं मारलें ?

झो०—जी सरकार. त्यास चौघे शिपाई साक्ष आहेत.

द०—बरें, सर्व मजकूर सांग; त्या दुष्टाचे हातच तोडून टाकितों.

झो०—हुकूम सरकार. काल रात्रीं मी गस्त घालीत असतां, मोहनपुऱ्यांतील नाक्याजवळ आलों, तों मनुष्याची किंचित् चाहूल लागली. नंतर बारीक दृष्टीनें पाहिलें इतक्यांत दूर घाबऱ्या घाबऱ्या चालला आहे असा एक चोर दिसला. त्याला धरण्याकरितां पाय न वाजवितां त्याच्या अगदीं जवळ गेलों. तोही मोठा काफर व चलाख होता सरकार, माझी चाहूल लागतांच पळाला. मीही त्याच्यामागें लागून चावडीजवळ मोठ्या कष्टानें त्यास धरिलें. आज पंधरा वर्षें मी नौकरी करीत आहें, व पुष्कळ चोर धरले, परंतु आजच्यासारखी मेहनत मला कधींही पडली नाहीं. तो माझ्या हातीं लागतांच सुटण्याकरितां मला लाथा आणि बुक्या मारूं लागला. तो मजपेक्षां जवान पडला, त्यामुळें माझा इलाज चालेना. परंतु त्याचा सर्व मार सो-

सून दुसऱ्या चावडीवरील चौघां शिपायांस मीं हांका मारल्या. ते आल्यावर मात्र तो उगा राहिला. मग बांधून सरकाराकडे आणिला आहे.

द०—शाबास झोलबा, शाबास!अशीच इमानानें नौकरी करावी.

झो०—माझे नशिबानें एवढें बरें झालें, कीं त्याच्या हातीं शस्त्र नव्हतें. त्यानें बोलूनही दाखविलें कीं, जर मजजवळ हत्यार असतें, तर तुझें डोकेंच उडविलें असतें.

द०—खरें काय? तर मग तो पक्का चोर आहे. बरें, तूं आतां स्वस्थ ऐस; तुझ्या मेहनतीबद्दल मी राजास रपोट करून तुला इनाम देववितों, व चोरासही चांगलें शासन करवितों; तूं काळजी करूं नको.

झो०—महाराज, त्याच्या तोंडाकडे पाहिलें तर भला मनुष्य दिसतो, परंतु त्यावर जाऊं नका. आलीकडे चोरटे लोक आपले मूळचे पेहेराव सोडून उंच उंच वस्त्रें अंगावर घेऊं लागले आहेत, एवढ्याकरितां कीं, कोठें शिपायाच्या तावडींत सांपडले तर भले माणूस आहेत असें वाटावें, आणि सुटून जावें.

याप्रमाणें झोलबा शिपायाचें बोलणें दरोग्यास अक्षरशः खरें वाटून त्यानें राजास तत्क्षणीं एक रिपोर्ट लिहिला. त्यामध्यें आपली प्रतिष्ठा दाखविण्याकरितां आणखी थोड्या लबाड्या घालून तो तयार केला. त्यांतील भावार्थ असाः—" आह्मी काल रात्रीं गस्त घालीत फिरत असतां एक मोठा धूर्त चोर दृष्टीस पडला. त्यास आह्मीं मोठ्या श्रमानें धरिलें. सर्वांमध्यें आमच्या झोलबा शिपायानें त्यास धरण्याकरितां प्राणान्त संकटें भोगिलीं, यास्तव सरकारांनीं मेहेरबान होऊन असल्या इमानी नौकरास उत्तम प्रकारचें बक्षीस द्यावें, ह्मणजे सर्वांस उत्तेजन येऊन जो तो आपलें काम फार लक्ष्यपूर्वक करील."
अशा प्रकारचा रिपोर्ट बनावून तो मुद्दाम एका शिपायाजवळ देऊन राजाकडे पाठविला; आणि आपण धैर्यशीलाची भेटही न घेतां त्याच्या भोंवतीं चार हत्यारबंद शिपायांचा पाहारा असावा, असा हुकूम करून आपण आपल्या क्रीडामंदिरांत निघून गेला.

तो दिवस चित्रपाल राजाचा कचेरींत येण्याचा होता; ह्मणून साडेआठ वाजण्याचा सुमार होतांच कचेरी भरून तयारी झाली. प्रधान, पंतप्रतिनिधि वगैरे सर्व मोठमोठे कामदार आपआपल्या जा-

ग्यावर येऊन बसले. कारकून, दफ्तरदार, चिटणीस वगैरे लोक आपआपल्या कामास लक्ष्यपूर्वक लागले आहेत; कचेरीची बरदास्त ठेवणाऱ्या कामदारांची अगदीं धांदळ उडाली आहे; अर्जदार लोक म्लान वदनें करून राजाच्या आगमनाची मार्गप्रतीक्षा करीत आहेत; व जरा गलबला झाला ह्मणजे स्वारी आली असें समजून दचकत आहेत; आणि हातांत अर्ज घेऊन चकित होत्साते उभे राहून इकडे तिकडे अवलोकन करीत आहेत, इतक्यांत भालदार चोपदारांचा एकच ' बडेजाव, मेहेरबान! ' इत्यादि ललकार होऊन चित्रपाल राजा कचेरींत आला. ते समयीं सर्व लोक एकदांच उठून उभे राहिले, व राजास सर्वांनीं एकसमयावच्छेदेंकरून प्रणाम केले. राजा सिंहासनारूढ झाल्यावर सर्व लोक आपापल्या जाग्यावर बसले; आणि नंतर राज्यकारभारास आरंभ झाला.

पद्मनयनेनें रात्रींच राजास पुष्पशीलाची व धैर्यशीलाची सर्व हकीकत कळविली होती; राजानें प्रथमतः रात्रीच्या दरोड्याची चौकशी करावयाची असा हुकूम केला. तो हुकूम होतांच सुरतराम शेट जो श्यामसुंदराचा सासरा तो डोळ्यांत आंसवें आणून पुढें झाला, आणि अतिकरुणाकर शब्दानें ह्मणाला, " सरकार, माझ्याच गरिबाच्या घरावर रात्रीं दरोडा पडला! " असें बोलून एक अर्ज लिहून आणिला होता तो प्रधानाच्या हातांत दिला. प्रधानानें तो अर्ज वाचला; त्यांतील मतलबः—" सरकार माझ्या घरीं काल रात्रीं एक वेषधारी जांवई दोन तीन स्नेही घेऊन आला होता. व त्यानें माझ्या घरीं निद्रा करून आपल्या सोबत्यांस बाहेर निजविलें. सुमारें मध्यरात्रीचा समय होतांच त्यानें दरवाजा उघडून संकेताप्रमाणें बोलाविलेले चोर आंत घेतले, आणि माझें सर्वस्व हरण केलें. प्रातःकाळ होतांच जांवयाचा ठिकाण नाहीं; व त्याच्या सोबत्यांचाही ठिकाण नाहीं. माझ्या घरीं निजलेल्या वेषधारी जांवयानें दरवाजा उघडला यास ही दासी साक्षी आहे; व त्याचे स्नेही बाहेरून आलेल्या चोरांबरोबर ढाल तरवार बांधून गेले, यासही ज्या वाड्यांत ते उतरले होते, त्या वाड्याचा मालक साक्षी आहे; आणि हे दोन्ही साक्षीदार सरकारकदमापाशीं हजर केले आहेत, तर सरकारांनीं याची चौक-

शी करून त्यास पकडण्याची तजवीज करावी, आणि तो सांपडल्यास योग्य शिक्षा देऊन माझी जिंदगी माझ्या हातीं लागे अशी तजवीज करावी. वेषधारी जांवयाबरोबर आलेला एक मनुष्य पांडुरंगशास्त्री यांच्या घरीं निजला होता; परंतु रात्रीं त्यानें त्यांच्या मुलीचा प्राण घेतल्यामुळें त्यांनीं त्यास आपल्या घरीं कैद करून ठेविलें आहे; यामुळें तो बाहेर पडूं शकला नाहीं, अशी खबरही मला लागली ह्मणून सरकारास ती जाहिर केली आहे. माझा जांवई, व त्याचे दोघे सोबती असे तिघेही बहुधां सारख्याच रूपाचे आहेत. ते सुमारें एकोणीस वर्षांच्या उमरीचे असून गोरे आहेत, आणि त्यांचीं मुखें गोल असून नुकतीच मिसरूड फुटत चालली आहे. अशा तऱ्हेच्या लोकांचा मुख्यत्वेंकरून शोध लावून चौकशी करावी हा अर्ज. ”

यांप्रमाणें सुरतराम सोनाराचा अर्ज ऐकून राजा प्रधानास ह्मणतो, “ प्रधानजी, दरोग्यास बोलवा. ” असा हुकूम होतांच प्रधानानें दरोग्यास बोलावणें पाठविलें; इतक्यांत दरोग्याचा रिपोर्ट शिपायानें प्रधानाच्या हातांत दिला. तो मोठ्यानें प्रधानानें वाचतांच राजास अतिशय आनंद झाला. तो ह्मणाला, आहाहा ! माझ्या दरोग्यानें एक चोर पकडला काय ? यावरून माझे कामदारांचें शौर्यही वर्णनीय आहे. दरोग्यानें रिपोर्टांत लिहिलेला चोर दुसरा ठरणें कठिण. कारण, रामराज्यामारखें जें माझें राज्य त्यामध्यें निरनिराळ्या प्रकारचे चोर एककालीं चौर्यकर्मास प्रवृत्त होणें केवळ अशक्य आहे. काल रात्रींची दरोडखोरांची टोळी परदेशाहून येथें आली असावी. जर ते गांवचे ह्मणावे तर यापूर्वीं त्यांनीं कोणाचें द्रव्य कधींही चोरून नेलें नव्हतें. माझ्या राज्यांत बंदोबस्त अगदीं उत्तम प्रकारचा आहे. कारण, कालच्या कृत्यांत कोणत्याही कामदारास दोष देववत नाहीं. चोर, लबाड, लुच्चे वगैरे लोकांस गांवांत न येऊं देण्याकरितां जे नौकर नेमले आहेत त्यांकडे हा दोष ह्मणावा तर त्यांनीं काय करावें ? धूर्त चोर आपले मूळचे पेहेराव सोडून वेष पालटून गांवांत शिरले. रात्रीच्या गस्त घालणाऱ्या वगैरे इमानी चाकरांनीं तर एक चोर धरून आपली नौकरी उत्तम बजाविली. बाकीच्या दुसऱ्या लोकांनीं हें सर्व वर्तमान मला

आहा !! काय विनोदपर बोलण्याची शैली !! माझा एकनिष्ठ भाव पाहून त्यांनींही एकदम माझा अंगीकार केला. त्या वेळेस मला जो आनंद झाला तो बोलतां येत नाहीं. काय, तें सर्व सुख नाहींसें झालें? अरे अरे ! दैवानें अमूल्य रत्न दिलें, परंतु कर्मानें नेलें ! हा माझा देहपिंडच अभागी आहे! बरें, आतां पुढें वांचून तरी काय फळ आहे? त्या पुढील मोहळ्यापेक्षां मला मरण बरें वाटतें. ( एक तरवार हातांत घेते. ) या तरवारीनें मी आतां आपलें गर्दन उडवितें ! परंतु परमेश्वरा, मजकडून आत्महत्येचें पातक कां करवितोस ? या वेळेस एखादें संकट उत्पन्न करून त्यांत माझें प्राणोत्क्रमण कां करीत नाहींस ?" इतक्यांत खिडकीवर कोणीं धोंडा मारिला, तो ऐकून चकित होऊन ह्मणते: " फार चांगलें झालें. माझी प्रार्थना परमेश्वरानें ऐकिली. माझ्या महालाच्या आसपास कोणी चोर आले असावे व त्यांचा उद्देश मला मारून माझ्या अंगावरील अमोल किमतीचे दागिने हरण करावे असा असेल. त्यांणीं हा दगड मी जागी आहे किंवा निद्रिस्थ आहे हें पाहण्याकरितां माझ्या खिडकीवर मारिला असावा. पहा ! स्यां अरिष्ट प्राप्त होऊन मरावें अशा प्रकारची प्रार्थना करितांच संकट येऊन हजर झालें; आणि माझा प्राणनाथ मला भेटावा ही विनंति केली ती व्यर्थ गेली ! तस्मात् या जगांत अनिष्ट चिंतिलें असतां तात्काळ प्राप्त होतें. आणि कल्याणाकरितां कितीही तपश्चर्या केली तरी तें प्राप्त होण्याची मुष्किल पडते, हा नियम खरा आहे. असो, लिखिताक्षर चुकत नाहीं. ( असें ह्मणून खिडकी उघडून बाहेर डोकावते. ) यारे चोरांनो, मला लवकर येथून घेऊन जा. आणि मला मारून माझे दागिने घेऊन जा. " असें ह्मणतांच खालून शब्द होतो: " पद्मनयने, अशी विरक्त कां झालीस ? परमेश्वरानें तुझें संकट निवारण्यास मला येथें उत्पन्न केलें आहे, तर लवकर वरतीं येण्याचा मार्ग दाखीव. " असे अमृतासारखे ओळखीचे शब्द कानीं पडतांच ती ह्मणाली: " कोण? प्राणनाथ! आपण आहां काय? तो म्हणाला, " प्राणप्रिये, अजून तुला भ्रांति वाटते कां ? "

असें पुष्पशीलाचें उत्तर ऐकतांच पद्मनयनेस जो आनंद झाला तो वर्णन करितां येत नाहीं. तीस असें वाटलें कीं, आतां खिडकीतून

उडीच टाकूं कीं काय! तिनें धांवत जाऊन दाराची कडी काढली; इतक्यांत तिची दासी तेथें होतीच. तीस तिनें लगबगीनें सांगितलें कीं, " अगे, लवकर खालीं जा आणि माझे प्राणपति आले आहेत. त्यास झटकन् वरतीं घेऊन ये. " हे शब्द ऐकून दासी गेली आणि तिनें पुष्पशीलास वर आणिलें. तीं एकमेकांच्या दृष्टीस पडतांच दोघांसही अत्यंत प्रेम उत्पन्न होऊन त्यांणीं परस्परांस घट्ट आलिंगन दिलें. दोघांच्याही डोळ्यांवाटे आनंदाश्रु चालले. त्या दोघांसही प्रथमतः काय बोलावें तें सुचेना. मग्न एकमेकांच्या गळ्यांत मिठ्या मारून ते निश्चेष्ट उभे राहिले. ज्या दासीनें पुष्पशीलास वर आणिलें तीसही मोठा आनंद होऊन ती तत्क्षणीं पद्मनयनेचे आईबाप निजले होते तिकडे गेली. त्या उभयतां वृद्धांसही निद्रा लागली नव्हती; व पोरीच्या हट्टास आतां काय करावें या विचारांत पडून ते अगदीं चिंताक्रांत होऊन गेले होते. इतक्यांत " पुष्पशील महाराज आले आहेत, " अशा दासीच्या वाक्सुमनांची वृष्टि झाली. त्या वेळेस त्या उभयतांस अतिशय आल्हाद वाटून ते तत्क्षणींच पद्मनयनेच्या महालांत आले. ते येतांच पद्मनयनेनें, हे माझे भर्तार आहेत, असें पुष्पशीलास सुचविलें. पुष्पशीलानें लागलेंच जाऊन त्या उभयतांस नमस्कार केला.

अगोदरच पुष्पशीलाचे स्वरूपाची व गुणांची कीर्ति त्यांस कळली होती; आतां तर त्यांनें मदनासारखें स्वरूप प्रत्यक्ष दृष्टीस पडलें, तें पाहून त्यांस फारच संतोष झाला. नंतर राजा म्हणाला, " पुष्पशील महाराज, आमच्या पोरीनें आपले प्राण तुम्हांकरितां काढून ठेविले होते. बरें झालें. आपण लवकर येऊन सर्वांस आनंदरूप केलें. असो. परंतु तुह्मी विहिरींत बुडाल्याविषयीं बातमी उठली होती. हें कसें झालें व आपण या समयीं येथें कसे प्राप्त झालां; तें आह्मांस कृपा करून सांगावें. अशी राजाची विनंति ऐकून पुष्पशील बोलूं लागलाः " महाराज, पद्मनयनेला मी सोडून गेलों, तेथपर्यंत तिच्या मुखानें सर्व वर्तमान तुह्मास समजलेंच असेल. दुसरे दिवशीं रात्रीं आमचा मित्र श्यामसुंदर याच्या मामस्याचे घरावर दरवडा पडला. त्या वेळेस मी आणि माझा मित्र धैर्यशील या दोघांना सर्व चोरांस देवा

च्या देवळांत मारून टाकिलें. एक चोर मात्र राहिला होता त्याच्यामागें धैर्यशील गेला होता. व त्यास तुमच्या अधिकाऱ्यांनीं चोर समजून त्याला अटकेंत केला असें समजलें. असो. मी घरीं आल्यावर मला माझ्या एका स्नेह्याच्या बायकोच्या गैरवर्तुकीचा संशय आल्यावरून त्याविषयीं खुलासा करण्याकरितां मी समोरील एका स्मशानाच्या वर गेलों. तेथें चवकशी करितां तिची लबाडी माझ्या लक्षांत आली. ते समयीं मी आपल्या स्नेह्यास तें दुष्ट कृत्य कळवून तिला शिक्षा करवीन असें भय तीस प्राप्त होऊन तिनें माझा प्राण घेण्याची युक्ति चालविली. अखेरीस त्या दुष्ट नारीनें मी एका विहिरीच्या काठीं उभा असतां मला आंत लोटलें. त्या वेळेस माझी जी अवस्था झाली ती विचारूं नका. आंत पडल्याबरोबर मला अत्यंत भय प्राप्त झालें. विहीर फार मोठी आणि तींत अपरंपार पाणी असून अंधार अतिशय होता. मला तर पोहतां येत नव्हतें; परंतु मीं पुस्तकांत पुष्कळ ठिकाणीं वाचलें होतें कीं, जर आपण पाण्यांत पडलों, आणि पोहतां येत नसलें, तर निश्चित पडावें. हातपाय हालवूं नये. म्हणजे आपण पाण्यापेक्षां हलके आहों या कारणानें आपण वर तरंगतों; त्याप्रमाणें म्यां केलें. प्रथम मोठें कठिण वाटलें. परंतु कांहीं वेळ दम कोंडून धरून हात पाय पसरून पाण्यावर निश्चेष्ट पडल्यावर पाणी स्थिर झालें. आणि मी स्वस्थ वर तरंगूं लागलों. नंतर चाचपून पाहिलें तों दैववशात् तेथें जवळून एका पिंपळाच्या झाडाची मुळी लोंबली होती, ती माझ्या हातीं लागली. मग त्या मुळीच्या आधारानें पाण्यावर पडून राहून आंतून बाहेरच्या लोकांस हांका मारूं लागलों. काय सांगावें, तुमच्या गांवचे लोक मला कोणी काढिनात!

" शेवटीं माझा स्नेही श्यामसुंदर तेथें आला. त्याला ही खबर कळतांच त्यानें सर्व चाकरांस बोलावून आणून मला बाहेर काढण्याची फार जलदी केली. त्यास मदत करण्यास गांववाले कोणी धजेनात. फक्त मौज पहाण्यास पुष्कळ जमले; परंतु दयेनें कळवळा कोणासही येईना. अखेरीस त्यानें पुष्कळ खटपट करून एक दोर आणिला, आणि तो एका झाडास बांधून व त्याच्या शेवटीं एक शिंकें बांधून

तो विहिरींत सोडिला. नंतर त्या शिक्यांत बसून मोठ्या कष्टानें मी वर आलों. विहिरीच्या कांठावर इतके तमासगीर जमले होते कीं, मला बाहेर निघण्यास जागा देखील नव्हती; परंतु मला त्या विहिरींतून बाहेर ओढण्यास, माझे चाकरांखेरीज व मित्राखेरीज कोणीं मदत केली नाहीं. याप्रमाणें बाहेर पडल्यावर म्यां त्याच्या स्त्रीच्या वर्तणुकीविषयीं कांहीं मजकूर त्यास सांगतांच तो अगदीं विरक्त होऊन, पुन्हां श्वशुरगृहाचें तोंड पहाणार नाहीं अशी त्यानें प्रतिज्ञा केली. तशांत माझ्या चाकरांनीं सांगितलें कीं, आह्मां चौघांपैकीं कोणीही कोठें सांपडला कीं, त्यास चोर समजून धरून न्यावा असा राजानें हुकुम केला आहे. तेसमयीं आपली समजूत उलटी झाली असावी असें मला वाटलें; परंतु आपली भेट होईपर्यंत आपले शिपाई वगैरे लोक विनाकारण त्रास देतील, याकरितां या गांवांतच राहूं नये असा विचार करून, आह्मी सर्व खटला घेऊन अर्ध कोशावर एक खेडें आहे तेथें मारुतीच्या देवळांत जाऊन उतरलों. आह्मी पुष्कळ वेळां वेष पालटून राजवाड्यापाशीं आलों; परंतु कोणी आम्हांस धरील याची मोठी धास्ती वाटे.

" याप्रमाणें निरुपाय झाल्यावर म्यां **पद्मनयने**चा महाल ध्यानांत आणिला; आणि सर्व शिपाई निजल्यावर रात्रीं जाऊन तिचे खिडकीवर धोंडा मारून तीस खूण पटवावी, असा बेत करून, आज रात्रीं तशी तजवीज करून, आपले भेटीस या समयास मी प्राप्त झालों आहें." असें त्याचें वर्तमान ऐकतांच सर्वांस दुःख व आश्चर्य वाटलें. **पद्मनयने**च्या नेत्रांवाटे अश्रुपात चालले. तिनें ते पुसून टाकिले आणि ती ह्मणालीः " जरकरितां आपण आणखी एक घटकाभर उशीरानें आलां असतां, तर मी आपल्या दृष्टीस पडलें नसतें! " असें ह्मणून तिनें लागलीच उपसलेली तरवार आणली, आणि " इनें मी आपला गळा कांपून घेणार होतें " वगैरे सर्व सांगितलें. तें ऐकून व ती खिडकीवाटे प्रथम डोकावण्याचे वेळेस जे शब्द बोलली होती त्यांवरून तिच्या पातिव्रत्यधर्माविषयीं **पुष्पशीला**ची खात्री झाली, आणि त्यास गहिंवर आला. नंतर असली गुणवान् व रूपवती स्त्री परमेश्वरानें आपणास दिली ह्मणून त्यानें त्याचे आभार मानले. नंतर " मजवि-

पर्यंतें वर्तमान तुम्हांस कोणीं कळविलें ? " असें **पुष्पशीलानें** विचारल्यावर **पद्मनयनेनें धैर्यशीलाची** सर्व हकीकत सांगितली. आणि " मी मूर्च्छित पडल्यावर तो विरक्त होऊन देशांतरास निघून गेला," असें बोलली.

राजासही आपण अन्यायानें त्याचा वध करीत होतों, हें समजून पश्चात्ताप आला. तो **पुष्पशीलापुढें** हात जोडून ह्मणाला, "महाराज, मी अज्ञान, मूर्ख, व मतिमंद आहें. आपण सर्वगुणसंपन्न आहां, याकरितां आपले प्रधानर्जास क्लेश दिल्याची मला क्षमा करा. आपण या वेळेस प्रकट होऊन माझ्या मुलीस जीवदान देऊन तिला काळाच्या दाढेंतून ओढिलें हे आपले उपकार मजकडून आजन्मांत फिटणार नाहींत." इतकें राजा बोलल्यावर कामदार लोकांच्या अज्ञानानें अशी गोष्ट झाली, त्यास आपला काय इलाज आहे? असें **पुष्पशीलानें** बोलून त्याचें सान्त्वन केलें. नंतर **श्यामसुंदराच्या** श्वशुराच्या वरावर दरवडा कोणत्या रीतीनें पडला व त्या वेळेस गांवांतील कोणी सरकारी लोक धांवून आले नाहींत. वगैरे सर्व वर्तमान **पुष्पशीलानें** राजास सांगितलें, इतक्यांत **पद्मनयनेनें**ही **धैर्यशीलाची** कच्ची हकीकत **पुष्पशीलाकरितां** पुनः सांगितली. हें सर्व वर्तमान ऐकून राजास अतिशय वाईट वाटलें. नंतर तो स्फुंदत ह्मणाला. " महाराज, मी वृद्ध भोळा मनुष्य, साधारण अनुमानावरून न्याय करितों. अशा प्रकारचीं कुलंगडीं आणि कोडीं शोधून सत्य निवडण्याची माझी शक्ति नाहीं. मी राज्यकारभार चालविण्यास अगदीं नालायक आहें. राज्यकारभार करण्यास मनुष्य पुष्कळ धूर्त आणि अति बुद्धिमान् पाहिजे. आतां ही मुलगी आणि हें सर्व राज्य मी आपणास अर्पण करितों. आपण याची व्यवस्था हवी तशी करावी. त्या जगन्नियंत्या परमेश्वराचा आज मी फार आभारी आहे कीं, मला असा गुणनिधान जांवई त्यानें दिला. "

अशीं त्यांचीं भाषणें झाल्यावर **पुष्पशील** निरोप घेऊं लागला. तेसमयीं राजा व **पद्मनयनेची** आई वगैरे सर्व एकदांच म्हणालीं, "छिः महाराज, आतां येथून जाऊं नका. आपण गेलां कीं, आम्हां सर्वांस एक क्षणभर देखील चैन पडणार नाहीं. " **पुष्पशील** म्हणाला, " परंतु माझा **श्यामसुंदर** व चाकर वाट पाहत असतील, तस्मात् त्यांक-

रितां मला गेलें पाहिजे. " त्या वेळीं राजानें आपल्या शिपायांस हुकूम केला कीं, पुष्पशील महाराजांबरोबर आलेल्या मनुष्यांमागर्मे जाऊन त्या खेड्यावरून त्यांचा सर्व खटला व श्यामसुंदर रावसाहेब यांस इकडे घेऊन यावें. त्याप्रमाणें शिपाई जाऊन सर्व खटल्यासुद्धां त्यांनीं श्यामसुंदरास आणिलें. सर्वांच्या भेटी झाल्यावर अत्यानंद होऊन सर्व आपापले ठिकाणीं निद्रा करावयास गेले.

---

# भाग १०.

## सुधारणा.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळ होतांच पुष्पशील मनोहरपंडितावर काय प्रकार आले तें पहावयास गेला. त्यानें सर्व हकीकत सांगितल्यावर त्याची स्त्री हिरकणी नाहींशी झाली असेल अशी पुष्पशीलानें तेव्हांच कल्पना करून चित्र [illegible]. नंतर चंद्रहागांतील एकून हिरकणी नाहींशी झाल्याची बातमी ऐकून त्यास सोडवून आणिलें. नंतर ते तिघे [illegible] एकत्र जमतांच त्यांस अतिशय आनंद झाला. मग ते एकमेकांच्या खबरा ऐकल्यावर बोलतात:—

श्याम०—पुष्पशील, हा. केवढा अनर्थ हा! यासारखें वकाली शहर या त्रैलोक्यांत नसेल.

पुष्प०—सगळ्यांपेक्षा धैर्यशील. आपण सर्व मरणास पात्र झालों अशी कल्पना करून विरक्त होऊन तो देशांतरास निघून गेला, याचें मला फार वाईट वाटतें.

मनो०—त्याचा शोध लवकर केला पाहिजे; नाहीं तर तो कदाचित आपल्या जीवाचें कांहीं करून घेईल.

पुष्प०—धैर्यशीलाच्या शोधास मनुष्य पाठवूं, परंतु या शहरांत आतां कशी व्यवस्था करावी कोण जाणे. ही सर्व व्यवस्था एकाएकीं मोडणें कठिण गोष्ट आहे.

श्याम०—मला वाटतें, येथें चोरट्यांचीं घरें फार आहेत, याकरितां त्यांचा बंदोबस्त अगोदर झाला पाहिजे.

पुष्प०—त्यांचा बंदोबस्त होण्यास युक्ति थोडी आहे. येथील कदंबा देवीचें देऊळ मोडून टाकावें म्हणजे चोरटे नाहींसे झालेच समजा.

श्याम०—खरी गोष्ट आहे. तें देऊळ मोडलें म्हणजे त्यांस मग लपण्यास वगैरे जागा राहणार नाहीं.

मनो०—ही युक्ति फार उत्तम आहे. त्याशिवाय बंदोबस्त हो-

णार नाहीं. कारण, तें एक संस्थानच आहे. त्याच्या आश्रयानें कितीएक पोट भरून असतील.

**पुष्प०**—हें देऊळ मोडण्याचें कृत्य **चित्रपाल** राजास विचारून उद्यां लागलेंच करून टाकूं.

**मनो०**—याशिवाय येथें शाळा स्थापन झाल्या पाहिजेत; व पोलिसाचा बंदोबस्त चांगला ठेविला पाहिजे.

**श्याम०**—**धैर्यशीलास** पकडण्यास मुख्य कारण झालेल्या दरोग्यास त्यानें मारिलें, व तो शिपाईही त्याच्या घोड्यानें टाफ मारून गतप्राण केला, याचा मला फार आनंद वाटतो.

**पुष्प०**—बरें! चला आतां त्या म्हातारीचा वगैरे शोध करून त्यांस शिक्षा देऊं.

असें **पुष्पशील** बोलल्यावर ते सर्व कचेरींत आले. त्यांनीं प्रधान, प्रतिनिधि वगैरे सर्वांस शहरांत कसे गोंधळ चालतात ते सांगितले. नंतर ती म्हातारी व **श्यामसुंदराची** बायको आणि सासरा अशी मंडळी बोलावून आणिली. प्रथम, म्हातारीनें **पुष्पशीलास** विनाकारण जीव घेण्याच्या इरादानें विहिरींत लोटून दिलें म्हणून तीस काळ्यापाण्याची शिक्षा दिली. मग **श्यामसुंदराच्या** सासऱ्यास पुढें बोलावून त्यास त्याच्या मुलीची कच्ची हकीकत सांगितली. ती ऐकून त्याला तिचा फार राग आला, आणि तो म्हणाला. "असें आहे तर माझ्या मुलीस पाहिजे ती शिक्षा सरकारानें द्यावी." **श्यामसुंदराच्या** बायकोनें अति नीच कर्म करून ती **पुष्पशीलावर** अरिष्ट उत्पन्न करण्यास कारण झाली. असा चार्ज तिजवर ठेवून व तिचा आणि **श्यामसुंदराचा** पुढें संबंध नाहीं अशा प्रकारचा ठराव करून तीस दहा वर्षं सक्त मजूरीच्या कैदेची शिक्षा दिली. परंतु ती कैदेंत गेल्यावर थोडकेच दिवसांनीं मरण पावली.

**सुरतराम** सोनाराच्या घरचा माल दरवडेखोरांनीं आणिलेला सर्व देवीच्या देवळांत पडला होता, तो **पद्मनयनच्या** मागण्यावरून दुसऱ्या दिवशीं राजानें **सुरतरामास** देऊन टाकिला होता, सबब त्या बाबतींत चौकशी करण्याचें कारण राहिलें नाहीं.

याप्रमाणें न्याय व अपराध्यांस शिक्षा झाल्यावर मागें विचार के-

जितकें लवकर कळवेल तितकें कळविलें आहे. यावरून माझी खातरी आहे. अशा प्रकारचा बंदोबस्त अन्य राज्यांत सांपडणें फार मुष्कील आहे. ''

इतकें चित्रपाल राजा बोलत आहे इतक्यांत दरोगयानें येऊन राजास सलाम केला. दरोगयानें अंगावर लढाऊ पोषाख घालून चिलखत घातलें होतें. कंबरेंत बिचवा, तमंचा, वगैरे हत्यारें खोंविलीं होतीं. पाठीशीं ढाल व एका बाजूस तरवार लटकती बांधली होती, डोक्यास भरजरी मंदील बांधून तो एका कानावर फिरवून दिला होता; व त्याखालीं डोक्याचे केश तेल लावलेले विंचरून त्यांच्या कुरळ्या पाडल्या होत्या. दाढी विंचरून तिचा भांग हनुवटीच्या मध्यभागीं करून दोहों गालांकडे केशांचे झुबके बनविले होते. मिशाही विंचरून अगदीं साफ करून त्यांस विंचवाच्या नांगीसारखे कल्ले फिरवून दिले होते आणि दोहों शिरांमधले केश वाढलेले होते.

असा तो दरोगा. त्यास अद्यापपर्यंत रात्रीं शहरांत दरोडा पडला हें माहित देखील नाहीं. तो कचेरींत येऊन उभा राहिला. त्याकडे पहातांच राजास व सर्व लोकांस वाटलें कीं, यानें मोठा दिग्विजय केला आहे. अशा सर्वांचीं मनें आल्यावर त्या दरोगयानें जें जें सांगितलें तें तें सर्वांस सत्य वाटलें. त्यानें सर्वांस तुच्छ करून आपली बढाई अतिशय केली. तथापि त्याबद्दल कोणाच्या मनांत कांहीं संशय आला नाहीं. अखेरीस आपण धरलेला चोर कशा प्रकारचा आहे असें राजानें विचारल्यावर, त्या धूर्त दरोगयानें धैर्यशीलास जातां येतां ओझरतें पाहिलें होतें त्यावरून मागील अंकांत लिहिलेल्या सर्व खुणा त्यानें सांगितल्या.

तें ऐकतांच आपण केलेला तर्क अगदीं खरा आहे असें राजास वाटून तो उभा राहून बोलला:—'' पहा, या चोरानें शहरांत येऊन माझ्या गरीब प्रजेस किती दुःख दिलें ! याकरितां यास आज गांवांत धिंड काढून फांशीं द्यावें. '' ( दरोगयाकडे वळून. ) '' दरोगेसाहेब, आपण हें कृत्य करावें. आपल्या रात्रीच्या महत्कृत्याबद्दल आपणास पुढील महिन्याच्या पहिल्या तारखेपासून न्यायाधीशाची जागा दिली आहे. आपल्या झोलवा शिपायास एक मंदील

बक्षीस दिला जाईल; व आज मित्तीपासून त्याचें नांव हवालदारांत दाखल करावें."

दरोग्यानें पकडलेला चोर स्वतः पाहिल्याशिवाय, व तो काय बोलतो हें ऐकल्याशिवाय त्या मूढमति राजानें त्यास फांशीं द्यावें असा हुकूम केला; आणि सुरतराम सोनाराच्या जांवयाचा सोबती जो पांडुरंगशास्त्री याचे घरीं आहे, त्यास दरोग्याच्या ताब्यांत तुर्त द्यावें, त्याची चौकशी पुढें केली जाईल, असें सांगून व देवीच्या देवळांतील सांपडलेला माल सुरतरामास नेण्याचा हुकूम देऊन आपण महालांत गेला.

राजा महालांत गेल्यावर प्रथम पद्मनयनेची अवस्था कशी आहे तें पहाण्यासाठीं तिच्या मंदिरांत गेला; आणि एक चोर दरोग्यानें धरला आहे, सबब त्यास धिंड काढून फांशीं देण्यास सांगितलें असें बोलूं लागला. पद्मनयना त्यास म्हणाली, "पण बाबा, पुष्पशीलास आणि धैर्यशीलास इकडे येण्याकरितां मोठ्या आदरानें बोलावणें पाठविलें काय?" राजा बोलला, "नाहीं बेटा; मी कचेरींत गेलों होतों त्यामुळें त्यांस बोलावणें पाठविण्याची त्वरा म्यां केली नाहीं." तें एकतांच पद्मनयना स्फुंदत स्फुंदत म्हणाली, "बाबा, तूं असेंच माझ्या कामाविषयीं जेव्हां तेव्हां दुर्लक्ष्य करितोस." राजा तिचे अश्रू आपल्या पदरानें पुसून ह्मणतो, "बेटा एवढ्याकरितां रडणें कशास? आतां बोलावणें पाठवितों." पद्मनयना किंचित् हांसून ह्मणत्ये: "पाठीव तर लवकर."

नंतर राजानें लागलेंच प्रधानास बोलावून त्यास पुष्पशील व धैर्यशील ज्या वाड्यांत उतरले होते त्या वाड्याचा पत्ता सांगून त्यांचा शोध करून त्यांस मोठ्या इतमामानें राजवाड्यांत आणण्यास सांगितलें. आज्ञेप्रमाणें प्रधान त्या वाड्यापाशीं येऊन पहातो तों त्यास कुलुप लागलें आहे, व जवळपास खबर सांगण्यासही कोणी नाहीं असें दिसलें. तेसमयीं निरुपाय होऊन आणखीही एक दोन ठिकाणीं शोध केला, परंतु व्यर्थ. कोठें कांहींच पत्ता लागेना. तेव्हां ते या शहरांतून निघून गेले असतील अशी कल्पना करून त्यानें सर्व हकीकत राजास व पद्मनयनेस सांगितली. पद्मनयनेस ती गोष्ट खरी वाटेना. तिनें म-

नांत विचार केला, " असें कसें होईल ? एवढा सद्‌गृहस्थ मनापासून वचन देऊन न विचारतां निघून जाईल अशी गोष्ट कालत्रयीं सुद्धां घडणार नाहीं. परंतु प्रधानजी स्पष्ट सांगतात कीं, त्या घरास कुलुप असून त्यांचे नोकर चाकर वगैरे कोणीही आढळले नाहींत, त्यास हा काय प्रकार झाला असावा ! मला रात्रीं स्वप्न तर पडलें नाहीं ! कारण, एका रात्रींतून सर्व अदृश्य होणें हें अगदीं अशक्य आहे. "

असे विचार तिच्या मनांत येऊन तिच्यानें प्रधानाच्या बोलण्यावर विश्वास ठेववेना. याकरितां तिनें आपल्या स्वतःच्या दासीस तिकडे पाठवून शोध करविला,परंतु तिलाही कांहीं पत्ता लागला नाहीं. याप्रमाणें निराश झाल्यावर तिनें एक वेळ स्वतः तेथें जाऊन चौकशी केली, तथापि कांहीं ठिकाण लागला नाहीं. नंतर ते आपल्या मित्रांच्या घरीं उतरण्यास गेले असतील अगर दुसऱ्या बिऱ्हाडीं गेले असतील, व आपणास एक दोन रोजांत कदाचित् भेटतील. अशी कल्पना करून ती स्वस्थ राहिली.

---

# भाग ८.

दिंडी.

॥ पुरुषपुंगवशौर्याब्धि धैर्यशीला ॥ राज्यकर्ते वधणार नदाल्हीला ॥
॥ सर्वसाक्षी जगदीश दावितांहे ॥ कथाभागीं या वीररसा पाहे ॥

# शौर्य.

---

दरोगेकचेरींत **झोलवा** शिपायास देण्याकरितां मेडल अकरा वाजतां **येऊन** दाखल झाला. तो पाहून दरोग्यास व **झोलवास** आकाश पाताळ एक झालें. दरोग्यानें लागलेंच **धैर्यशीलास** पुढें बोलावून आणून धिंडी-**सह फांशीच्या** शिक्षेची समज दिली. तसमयीं **धैर्यशील** कांहीं बोलूं लागला, इतक्यांत **झोलवा** शिपाई जवळ होताच,त्यानें **धैर्यशीलाच्या पाठींत** अशी जोरानें दरोग्यादेखत लाथ मारिली कीं, तेणेंकरून तो **धाड्कन** जमिनीवर आपटला, आणि अन्याय ! ! अन्याय ! ! ! असें **मोठ्यानें** ओरडला. परंतु दरोग्यास त्याची करुणा तिळमात्र न येऊन **तो झोलवाच्या** तोंडाकडे पाहून हंसूं लागला. इतक्यांत तीन चार **हत्यारबंद** शिपायांनीं येऊन **धैर्यशीलास** उचलून पहाऱ्यांत नेलें. **तसमयीं** जसा जाळ्यांत सांपडलेला सिंह निरुपाय होतो तशी त्या **प्रतापी धैर्यशीलाची** अवस्था झाली !

दुपारीं दोन वाजतां दरोग्यानें पुनः कचेरी भरून सर्व सरकारी **नौकर** व गांवांतील सभ्य लोक बोलाविले. नंतर त्या सर्वांदेखत **झोलवाची मोठी** प्रशंसा करून त्यास तो मेडल बांधिला. मग **झोलवा-बरोबर** आणखी कांहीं शिपाई व हवलदार साहाय्यास देऊन धिंडी-च्या शिक्षेची तयारी करावयास हुकूम दिला. त्या दुष्टांनीं त्या नि-**र्दोष धैर्यशीलाचे** पांचपाट काढण्याकरितां एक न्हावी आणविला; **व तेलांत कोळसा उगाळून** तो रंग त्याच्या तोंडास व अंगास लाव-**ण्याकरितां आणिला.** कंबरेस बांधण्याकरितां एक काळ्या दोऱ्याचा **करगोटा व एका** जुन्या काळ्या लुगड्याची लंगोटी त्यास नेसविण्याक-

रितां तयार केली. कांदे. लसूण, बिब्बे, आणि फुटक्या कवड्या यांच्या माळा त्याच्या गळ्यांत घालण्याकरितां तयार केल्या. व दोन चार फाटके जोडे एका सुतळींत ओंवून ठेविले. एक फाटक्या चवाळ्याचा तुकडा त्यास पांघरण्याकरितां आणिला, व काठ्यांस तुटक्या केरसुण्या बांधून त्यांचीं छत्रें त्याच्या डोकीवर धरण्यासाठीं तयार केलीं. महारमांगांचीं पोरें तीं छत्रें धरण्यास बोलाविलीं; व नीच लोकांचीं डफडीं वगैरे हलकीं वाद्यें वाजवणार आणविले. एका गाढवावर शिंदीच्या फड्यांची वळी घालून तें धैर्यशीलास बसण्याकरितां आणिलें; व सर्व गांवांत, " आज एका चांगल्या धिंड काढून फांशीं दिलें जाईल " असा डांगोरा पिटविला.

याप्रमाणें तयारी व सरंजामाची सिद्धता आल्यावर पंचवीस पोलिस शिपाई, सरकारी कपडे अंगावर घालून हातांत नागव्या तरवारी घेऊन धैर्यशीलाच्या खोलींत आले, आणि धमक्या देऊन त्यांनीं त्यास बाहेर आणिलें. बाहेर येऊन तो सरंजाम पाहतांच त्यास अत्यंत वाईट वाटलें, व कोणी तरी आपणास या संकटांतून सोडविण्यास आलें असेल ह्मणून तो चोहोंकडे पाहूं लागला. परंतु यमस्वरूपी दुष्ट व निर्दय लोकांशिवाय त्यास कोणी दिसेना. दरवाजाबाहेर हजारों तमासगीर मजा पाहण्यास जमले होते; व मोठमोठे लोक रस्त्यांतील माड्यांवरील खिडक्यांतून मौज पाहण्यास बसले होते. मोठमोठे रस्त्यांतनही लोक ओट्यांवर बसले होते; व गांवाबाहेर फांशीच्या ठिकाणींही अत्यंत गर्दी आली होती. धैर्यशील त्या चांडाळ शिपायांच्या मेळ्यांत जाऊन उभा राहिल्यावर त्यास हें संकट निवारण्यास कांहीं एक युक्ति सुचेना. त्याची अक्कल गुंग होऊन आपलें मरण येऊन ठेपलें असें त्यास वाटलें. त्यास मरणाचीही इतकी परवा वाटेना; परंतु हे धिंड काढून जो आपला अपमान करणार याचें त्यास मोठें वाईट वाटलें. त्याच्या मनांत आलें कीं, या वेळेस तरवारीनें आपला शिरच्छेद करून घ्यावा तो बरा; परंतु पांचपाट काढून हीं वस्त्राभरणें धारण करणें यासारखें दुसरें दुःख नाहीं. नंतर स्ववीर्याशिवाय हा आपला अपमान टळत नाहीं असें मनांत समजून त्यानें जगन्नियंत्या परमेश्वराची करुणा भाकिली; आणि अत्यंत क्रोधा-

यमान होऊन त्यानें झट्कन् एका शिपायाच्या हातची तरवार हिस-कून घेतली. नंतर महाकाळेश्वराप्रमाणें दांत खाऊन व गर्जना करून अतित्वरेनें विद्युल्लतेप्रमाणें तरवार आपल्या सभोंवतीं फिरवूं लागला. तें पाहून कोणत्याही शिपायाची छाती त्यापुढें जाण्यास होईना. इतक्यांत, आतां हा पळून जाईल असें समजून एका शिपायानें झट्दिशीं दरवाजा बंद करून त्यास कुलुप घातलें. धैर्यशील तेथें कांहीं वेळ हस्तकौशल्य दाखवून, नंतर बाहेर पडण्यास पाहूं लागला. ते समयीं दरवाज्यास कुलुप आहे असें पाहून तो दरवाज्यावरील माडीवर गेला आणि माडीवरील खिडकींतून खालीं जमलेल्या तमासगिरांत त्याणें एकदम उडी टाकली. तेणेंकरून त्यास कांहीं एक दुखापत न होतां, तो तरवार परजीत सपाट्यानें गांवाबाहेर जाऊं लागला.

ते समयीं चोर पळाला असा एकच गोंगाट करून सर्व शिपाई व तमासगीर त्याच्या मागें पळूं लागले. त्या सर्वांत झोलबास आपल्या शौर्याचा फार गर्व झाला होता, सबब तो अति कष्टानें सर्वांपुढें धांवूं लागला.मागें लागणारे पुढील येणारास चोर! चोर!धरा! धरा! असे शब्द मोठ्या आवेशानें करीत; परंतु धैर्यशीलाची ते समयींची मुद्रा व तरवार फिरविण्याचें चापल्य पाहून त्यास धरण्यास कोणी धजेना, व सर्व लोक निमुटपणें आपल्या जीवास भिऊन त्याला जाण्यास रस्ता देऊं लागले.

शहर अति विस्तीर्ण पडलें, व चोर पळाल्याचा बोभाटाही एका क्षणांत सर्व गांवभर झाला. यामुळें लोक चोहोंकडून फारच जमूं लागले; व जागजागच्या चावड्यांवरील शिपाई तरवारी हातांत घेऊन सामोरे येऊं लागले; सबब अर्धगांव जावयाचा राहिला तोंच धैर्यशीलास थकल्यासारखें वाटलें, व पुढें पार पडण्यास मोठी पंचाईत दिसली. इतक्यांत फांशीं देण्याच्या स्थानीं पुष्कळ लोक जमले होते ते, हें वर्तमान ऐकून धैर्यशीलास धरण्याकरितां समोरील रस्त्यानें आले, त्यामुळें पुढील रस्ता अगदीं मनुष्यांनीं गच्च भरून पाऊल टाकण्यास देखील जागा राहिली नाहीं. तेसमयीं धैर्यशीलास वाटलें कीं, आतां आपण आपला रस्ता इतक्या तमासगिरांतून काढूं लागलों तर शेंकडों लोकांचे प्राण घ्यावे लागतील, याकरितां पट्टा

खेळत खेळत थोडें थोडें पुढें गमन केलें पाहिजे. असा विचार करून तो, कोणी आपणास तरवार अगर भाला टोंचील ह्मणून विद्युल्लतेप्रमाणें तरवार फिरवीत व पट्टा खेळत पुढें जाऊं लागला; व वारंवार परमेश्वराची मदत अतिदीनपणें मागता झाला.

या स्थितींत धैर्यशील आहे, इतक्यांत एकदम सिंहनाद झाल्यासारखें सर्वांस वाटलें. तेसमयीं चकित होऊन ती भयंकर गर्जना कशाची आहे तें कळण्याकरितां सर्व एकदांच गप्प राहून भयभीत होत्साते कान देऊन ऐकूं लागले. तो ध्वनि उत्तरोत्तर वृद्धिंगत होत होत अगदीं नजीक आला, तेव्हां कांहीं तरी अघोर संकट येत आहे असें वाटून सर्व घाबरले. इतक्यांत पवनवेगानें एक मोटा अरबी घोडा अतिशय मस्त झालेला असा पुढच्या रस्त्यानें आला. त्याचा रंग बगळ्याचे पंखांसारखा पांढरा सफेत होता. मानेवरील आयाळ व शेंपटीचे केश सडक विंचरलेले होते. शरीरानें अतिपुष्ट व त्याची कांति लिंबाप्रमाणें होती. त्याचे अंगावर सर्व अलंकार होते. बहुमोल जीन व तोंडांत लगामही होता. असा तो घोडा मोठ्यानें खिंकाळत पुढील तमासगिरांच्या सन्निध उड्या मारीत व मागील पिछाड्या झाडीत आला. तेव्हां कोणी त्यास धरावयास यत्न करूं लागले व कोणी त्यास भेवडावूं लागले. घोड्याचे मनांत कोणाच्याही हातीं लागूं नये असें होतें, सबब त्यास लोकांनीं भेवडावतांच तो बुजून मंडळीच्या समाजांत शिरला; आणि त्यानें पिछाड्या झाडण्यास आरंभ करितांच पांच पंचवीस मनुष्यांस त्या वर्मी लागून ते धाड्कन् जमीनीवर आपटले. त्यांची ती दशा पाहून सर्व तमासगीर भराभर पळाले, व आपापल्या घरांत जाऊन दरवाजे बंद करून बसले.

नंतर तो घोडा हत्यारबंद शिपायांपाशीं आला. ते शिपाईही भेकडच होते ह्मणून तेही जीव घेऊन पळूं लागले. घोड्याच्या मनामध्यें हा समाज टाकून पलीकडे जावें असें होतें, याकरितां तो तसाच पुढें चालूं लागला, तें पाहून हा आमच्याच मागें लागला असें शिपायांस वाटून ते फारच पळूं लागले. त्या वेळेस झोल्लवास आपल्या पराक्रमाचा फार गर्व झाला होता, सबब तो सर्वांस धिक्कारून ह्मणाला: "अरे शिपायाच्या लेंकांनो, घोड्यास भिऊन पळतां, तुह्मांस लाज

वाटत नाहीं? अरे तुमच्या हातांत नागव्या तरवारी आहेत. याकरितां यास चोहोंकडून घेरा; आणि हा हातीं लागत नसेल तर तरवारीनें त्याचें मुंडकें उडवा." इतकें बोलून मागून जाऊन त्याच्या तंगडीवर तरवार मारून त्यास घायाळ करावें असें मनांत आणून, मोठ्या आवेशानें घोड्याचे मागें त्याचे पायावर तरवार मारावयास गेला. इतक्यांत घोड्यानें जी टाफ मारली, ती झालवाचे मस्तकावर बसली. तेणेंकरून त्याचें मस्तक फुटून तो तत्काळ गतप्राण झाला. हें कृत्य अवलोकन करून व धैर्यशीलाचीही त्या समयींची अति क्रोधायमान मुद्रा पाहून त्या सर्व रस्त्यांत धैर्यशील व घोडा यांशिवाय तिसरा प्राणी राहिला नाहीं. पुष्कळ लोक माडीवरून खिडकीवाटे मात्र पहात होते.

धैर्यशीलानें तो घोडा अवलोकन करितांच त्यास अतिशय आनंद झाला. तो तत्क्षणीं घोड्यापुढें जाऊन, "छबिल्या, बेटा ये, ये बेटा ये! इतका कां बावरलास?" असें ह्मणाला. ते ओळखीचे शब्द ऐकतांच तो शांत झाला आणि धैर्यशीलाजवळ येऊन हुंगूं लागला; व त्याचे अंगास आपलें डोकें घांसूं लागला. त्या वेळेस धैर्यशील सानंदाश्चर्यभरित होत्साता एकदम उडी मारून त्यावर बसला, आणि खिडकींतून पहाणाऱ्या तमासगिरांस अलौकिक आश्चर्य उत्पन्न करून घोड्यास भरधांव काढीत गांवाबाहेर निघून गेला.

तो गेल्यावर लागलेच, मार पळाला, ह्मणून शिपाई व दुसरे लोक पुनः बाहेर पडून त्यास धरण्याकरितां धांवूं लागले. परंतु त्याचा ठिकाण लागला नाहीं.

आतां हा घोडा येथें कसा आला याविषयीं वाचकांस जाणण्याची इच्छा होईल. त्यास त्यांनीं असें समजावें कीं, ज्या चोरामागें धैर्यशील लागला होता तो गांवाबाहेर एक कोसपर्यंत जाऊन कडब्याच्या शेतांत लपला असें मागें लिहिलें आहे. तो चोर तत्क्षणीं कडब्यांत लपून न राहतां एका पाउलवाटेनें धांवतच गांवांत आला; आणि सुरतराम सोनाराच्या दुसऱ्या वाड्यांतील तरी कांहीं माल न्यावा अशा इराद्यानें तो चोर त्या वाड्याच्या पाळतीवरच होता. अखेरीस त्यानें त्या वाड्याचा मागील दरवाजा युक्तीनें उघडून आंत

प्रवेश केला. आणि बाहेरच्या बाजूस चाकरलोक निजलेले आहेत व पहाट होत चालली आहे असें पाहून दुसरें कांहीं चोरण्यास सांपडेना म्हणून एखादा घोडा सोडून न्यावा असा विचार त्यानें केला. ते समयीं तेथील चार घोड्यांपैकीं **धैर्यशीलाचा** घोडा सर्वांत उत्तम दिसला म्हणून तेथील निद्रिस्थ लोक जागे न व्हावे यासाठीं कांहीं गलबला न करितां त्यानें तो घोडा हळूच सोडला; आणि नुसता घोडा नेल्यास कोणी चोर म्हणतील याकरितां तेथें जवळच एका खांबावर जिनें ठेविलीं होतीं त्यांतून एक जीन व लगाम डोक्यावर घेऊन घोड्यासह निघून गेला. जाते वेळेस त्याच्या मनांत आलें कीं, आपण नुसती चोरी करण्यापेक्षां कांहीं नुकसान करावें. असा विचार करून पुनः आंत जाऊं लागला. परंतु, त्या वेळेस आंतील कोणी मनुष्य खोकला, ते पाहून काहींच साधणार नाहीं असें मनांत आणून तो तेवढाच घोडा घेऊन पळाला. त्यास वाटलें कीं, हा आपल्या घरीं ठेवल्यास कदाचित् कोणी सरकारांत जाहीर करून आपणावर संकट उत्पन्न करील; याकरितां यास एकदम दुसऱ्या एखाद्या गांवांत नेऊन विकून टाकावें. अशा इराद्यानें त्यानें तो घोडा गांवाबाहेर आणून त्यावर जीन बांधिलें; आणि तो घोडा अति खंदा म्हणून वर बसूं देईना. याकरितां चुचकारीत पुष्कळ लांब नेऊन एका उंच टेकडावर चढून त्याच्या पाठीवर त्यानें उडी मारिली. तेसमयीं तो घोडा अरण्यांत निघून या चोरास आवरेना. अखेरीस त्यानें त्याच्या तोंडावर एक फोंक मारिला; ते समयीं तो घोडा अतिशय दचकून उंच उडाला; आणि त्यानें राउतास खालीं पाडिलें. तेणेंकरून त्या चोराचा पाय दुखावून तो तेथेंच कण्हत पडला; आणि घोडा मोकाट जंगलांत उड्या मारीत चालता आला. नंतर कांहीं वेळानें स्थिर होऊन तो नदीच्या कांठची हिरवी हरळी वगैरे खाऊं लागला. असा सुमारें चार वाजे तोंपर्यंत चरून तो पाणी प्याला; आणि चंद्रीची व आपल्या धन्याची आठवण आल्यामुळें **धैर्यशील** ज्या वाड्यांत उतरला होता तिकडे जाऊं लागला. पुढें रस्त्यांत जो प्रकार झाला तो मागें आलाच आहे.

इतक्यांत मनुष्यांतून व हत्यारबंद शिपायांतून जेव्हां चोर पळाला

असें वर्तमान राजास समजलें, तेव्हां त्यास वाटलें कीं, हा पक्का तस्कर आहे यांत संशय नाहीं; याप्रमाणें राजाची खात्री होऊन त्यानें अशी दवंडी पिटविली कीं, जो कोणी या चोरास धरून देईल त्यास एक हजार रुपये बक्षीस मिळतील.

धैर्यशील जो त्या ठिकाणाहून निघाला तो दोन तासांत बारा चौदा कोस निघून गेला. तेथें एक मोठें शहर होतें, त्याजजवळ गेल्यावर त्यानें आपल्या हातांतील एक अंगठी काढिली, आणि तींतील हिरा ठेवून प्रथम सोनें विकलें. त्या रुपयांचे त्याणें आपणास थंडी निवारण होण्यासाठीं कांहीं कपडे व फराळाचे पदार्थ घेतले. आणि घोड्यास दाणा वैरण घेतली. नंतर गांवाबाहेरील एका मारुतीच्या देवळांत रातचगत राहून पुढें काय तजवीज करावी ह्मणून त्यास मोठी काळजी पडली. त्यास वाटलें कीं, प्रथम या बेबंद राज्यांत आत्मसंरक्षणार्थ आपल्याजवळ हत्यारें असावीं. असा विचार करून अंगठीवरील हिरा बाजारांत नेऊन तो त्यानें योग्य किमतीस विकला, आणि ढालतरवार व पिस्तुल वगैरे सरंजाम घेऊन लढाऊ पोषाख व एक चिलखत घेतलें; याप्रमाणें तो हत्यारबंद झाल्यावर त्याच्या मनांत अत्यंत धैर्य आलें. तो ह्मणाला, "आतां पंचवीस तीस शिपाई माझ्या अंगावर आले तथापि मी भिणार नाहीं. त्या वेळेस मी बिन हत्यारी होतों ह्मणून माझा इलाज चालेना. अशा प्रकारच्या बेबंद राज्यांत बिन हत्यारी वागणें हें केवळ मूर्खपणाचें काम होय. जरकरितां गांवाकडे येतांना हत्यारबंद आलों असतों तर मजवर एवढें भयंकर प्राणनाशक संकट आलें नसतें. अशा मुलुखांत देवपूजेससुद्धां हत्यारबंद बसलें पाहिजे. हत्यार हाच काय तो आत्मरक्षणास उपाय. बळी तो कान पिळी. जो बिन हत्यारी आहे तो चोर, मूर्ख, गरीब, असा न्याय येथें व्हावयाचा. असा देश मीं जन्मांत पाहिला नाहीं. बरें असो. परंतु आतां पुढें काय विचार करावा? मला वाटतें, त्या शहरांत श्यामसुंदर व मनोहरपंडित हे आपल्या श्वशुरांच्या घरीं आहेत. यामुळें त्यांवर माझ्यासारखीं लचांडें उत्पन्न होण्याची भीति फारशी नाहीं; परंतु मी इकडे आल्यानें बिचाऱ्या पुष्पशीलास अत्यंत दुःख वाटेल. तो घराकडे विश्रांति घेण्याकरितां

गेला होता तेव्हांपासून त्याचें काय वर्तमान आहे हें मला अद्याप कळलें नाहीं. मला वाटतें, आपण पुनः एक वेळ त्या दुष्ट विचित्रपुरींत जाऊन पुष्पशीलास इकडे घेऊन यावें; ह्मणजे आह्मी दोघे आगखी कांहीं शहरें पाहून चौशहाणपुरास निघून जाऊं; मग हे जांवई मागाहून मेजवान्या घेऊन सावकाश येतील. त्याला टाकून माझा जीव कधींही सुखी व्हावयाचा नाहीं. तोही सहज कोठें बाहेर पडल्यास ते दगलबाज अंमलदार त्यावर कांहीं तरी आरोप आणून त्यास संकटांत पाडतील, अशी माझी खातरी आहे. त्या विचित्रपुरींतील लोक एका पैशाकरितां दुसऱ्याचा जीव घेतील; याकरितां मी त्या कोमल अंतःकरणाच्या राजपुत्रास तेथें राहूं देणार नाहीं. मी आज रात्रीं सुमारें अकरा वाजतां पुनः विचित्रपुरींत कोणास न कळतां जाऊन त्यास सर्व हकीकत सांगून रातोरात इकडे घेऊन येईन."

असा विचार करून मध्यान्हकाळीं आठ वाजल्याबरोबर धैर्यशीलानें लढाऊ पोषाख चढविला; आणि घोड्यावर बसून तो विचित्रपुरीकडे चालला. तो मनांत ह्मणतो, "मी सशस्त्र असतां युद्धकुशलवीरांच्याही समुदायावर जाण्यास भिणार नाहीं, मग भेकड विचित्रपुरीकरांची बिशाद काय? ते सर्व एकदम जरी माझ्या अंगावर आले, तथापि सर्वांची कत्तल उडवून पुष्पशीलास घेऊन येईन." इत्यादि विचार करीत तो साडेअकरा वाजण्याच्या सुमारास विचित्रपुरींत येऊन दाखल झाला. शहरचा बंदोबस्त दररोज्याचे रात्रीसारखाच होता; व चंद्रास्त होऊन पुष्कळ वेळ झाला असल्यामुळें अंधकार निबिड पडून सर्व सामसूम झालें होतें. धैर्यशील गांवांत शिरतांच दुसरे कोणीकडे न पहातां ज्या वाड्यांत ते उतरले होते त्या वाड्यापाशीं जाऊन पुष्पशीलास व चाकरलोकांस हांका मारूं लागला. परंतु त्या वाड्यास कुलूप होतें ह्मणून कोणी ओ देईना. तेससयीं पुष्पशीलास जिणें विहिरींत लोटलें ती ह्मातारी जागी होती; ती बाहेर येऊन पाहूं लागली तों नक्षत्रांच्या उजेडानें धैर्यशीलाचा सफेत घोडा दृष्टीस पडला. धैर्यशीलास फांशीं देण्याकरितां नेत असतां एक बावरलेला घोडा येऊन त्यावर बसून चोर पळाला हें कृत्य त्या

ह्मातारीनें पाहिलें होतें; ह्मणून तो घोडा दृष्टीस पडतांच राजानें देऊं केलेलें हजार रुपयांचें बक्षीस आपणास मिळण्याचें संधान आलें आहे, तर तें साध्य करून घेऊंद्या. असा विचार करून आपल्या घरांतील एका सारख्याम दरोग्याला बोलावयास पाठवून तिणें धैर्यशीलास हांक मारली. तेसमयीं त्या वाड्यास कुलुप लागलें आहे असें पाहून या ह्मातारीस तरी पुष्पशील कोठें गेला हें कदाचित् माहित असेल असें समजून तो तिच्या घराकडे गेला. तिणें त्याचा पुष्कळ आदर सत्कार करून त्यास घोडा बांधण्यास जागा दिली; आणि बैठकीवर बसावयास विनंति केली . धैर्यशीलास ही सलगी विशेष न आवडून तो पुष्पशीलाचें वर्तमान विचारण्याची घाई करूं लागला. तेसमयीं ह्मातारीस चमेलीच्या द्वारें पुष्पशीलाविषयीं पुष्कळ वर्तमान कळलें होतें; व पुष्पशीलाचा आणि धैर्यशीलाचा चेहेरा, पेहेराव आणि बोलणें एक सारखेंच आढळलें, त्यावरून हा त्या विहिरींत लोटलेल्या गृहस्थाचीच खबर विचारतो असा पक्का निश्चय होऊन ती ह्मणाली, "महाराज, तुमचा स्नेही तुमच्या सारखाच गोरा असून वयानेंही तुह्मांइतकाच आहे नाहीं? त्याचा एक सोबती गुरतरामशेटजीचा जांवई आहे, आणि एक तुह्मी व आणखी एक कोणसा आहे,—असे तुह्मी चौघेजण परवांच्या दिवशीं संध्याकाळीं येथें आलां, खरेंना?" इतक्या खुणा ह्मातारीनें सांगितल्यावर ज्या अर्थी हिला इतक्या बारीक गोष्टी कळल्या आहेत त्या अर्थी हिला पुष्पशीलाची माहिती आहे यांत संशय नाहीं, असें धैर्यशीलास वाटलें. तो ह्मणाला, "बाई, आपण सांगितलें तें सर्व खरें आहे, परंतु आतां तो पुष्पशील कोठें भेटेल तें मला सांगा." तेसमयीं श्वास टाकून ती म्हातारी म्हणाली, "बाबा, आतां तो तुला कोठून भेटेल? तो काल पहांटेस या शेजारच्या विहिरींत पाय घसरून पडून मरण पावला!"

असें म्हातारी बोलतांच धैर्यशीलाच्या पोटांत धस्स झालें! परंतु छाकत्याचा तंटा याच म्हातारीच्या घरांतून बाहेर पडला होता, याकरितां या म्हातारीच्या बोलण्यावर केवळ भरंवसा ठेववत नाहीं. असा विचार करून तो तत्क्षणीं उठून बाहेर आला. आणि समोरील

एका वाण्याच्या दुकानी पुष्कळ हांका मारून त्यानें आंतील दुकानदारास जागें केलें. त्यानें बाहेर येऊन काय आहे म्हणून विचारलें. त्यास धैर्यशीलानें असें विचारलें. माझा स्नेही येथें जवळच कोठें विहिरींत पडून मेला म्हणतात. त्यास खरें काय तें आपण कृपा करून सांगा. मी लांबून आलों आहें. तो वाणी चांगल्या स्वभावाचा व भला मनुष्य होता. तो म्हणाला. " एक तरुण मनुष्य एका ह्यातारीनें विहिरींत लोटला असें मी काल ऐकिलें होतें. परंतु माझ्या दुकानदारीच्या गर्दीमुळें मी त्या विहिरीकडे पहाण्यास गेलों नाहीं. त्यास नंतर विहिरींतून काढलें हेंही मीं ऐकिलें; परंतु कोणी म्हणत मेला, कोणी म्हणत थोडी धुगधुगी आहे.परंतु खरें काय तें मला कळलें नाहीं. विहीर पुसाल तर फार खोल आहे. व आंत अंधार आहे. इतक्यांत जर तुमच्या स्नेहास पोहतां येत असेल तर तो कदाचित् वांचला असेल तर न जाणो. नाहीं तर जीवंत निघण्याची आशाच नको. "

असें दुकानदाराचें बोलणें ऐकून धैर्यशीलाची कंबर खचली. ह्यातारीनें सांगितलें त्या वेळेस ही कदाचित खोटें बोलली असेल असें धैर्यशीलास वाटलें होतें. परंतु दुकानदारानेंही तसेंच सांगितल्यावर याच दुष्ट ह्यातारीनें पुण्यशीलाचा प्राण घेतला. अशी त्याची खातरी झाली. तो दुकानदाराचे आभार मानून पुनः घोडा घेण्याकरितां ह्यातारीच्या घराकडे जाऊं लागला. त्यानें वर आकाशाकडे डोळे केले आणि ह्मणाला. " हे जगदीश्वरा. त्या वृद्ध भरतसिंगावर केवढें आकाश कोसळेल हें ! हरहर ! ! हें वर्तमान त्यास समजतांच त्याची जी अवस्था होईल ती मनांत येऊन त्यापेक्षांही मला आतां अधिक दुःख होतें ! पुण्यशीला. तूं या जगांतून नाहींसा झालास काय ? अरे, लहानपणापासून तुझ्या संगतीनें मीं सुखानें काळ घालविला; आतां मला हें सर्व आयुष्य दुःसह होईल ! काय करूं ? तें चांदहाणपूर मला आतां स्मशानवत् भासेल ! ! तेथील लोकांस मी आतां तोंड कसें दाखवूं ? ही मृत्युलोकची वस्ती क्षणभंगुर आहे; याकरितां घराकडे आपण जाऊं नये. सारा जन्म परोपकार व जग सुधारण्यांत घालवावा ह्मणजे या जन्माचें सार्थक्य तरी होईल. माझी सुखाची घडी बिघडली ती जमण्यास दुसरा इलाज राहिला नाहीं. "

नंतर त्या दुष्ट म्हातारीनें **पुष्पशीलास** विहिरींत लोटलें खचित्; या करितां तिचा प्राण घेऊन आपण चालतें व्हावें, असा विचार करून क्रोधानें संतप्त होत्साता तिच्या वाड्यांत आला. त्यानें तीस पुष्कळ हांका मारल्या, व चोहोंकडे पाहिलें, परंतु ती कोठें दिसली नाहीं. मग या दुष्ट शहरांत राहण्याची अगदीं सोय नाहीं असें मनांत आणून रातोरात निघून जावें, असा बेत करून तो घोडा सोडण्यासाठीं गेला. इतक्यांत पंचवीस तीस शिपाई मशाली घेऊन हत्यारबंद आले. त्यांस पाहतांच **धैर्यशील** अगदीं घाबरून गेला. परंतु त्या वेळेस तो जीवावर उदार झाला होता व हें जग त्याला शून्यवत् भासत होतें, म्हणून त्यानें धैर्य धरून आपली तरवार बाहेर काढली. शिपायांनीं दरवाजा बंद करून त्यास कुलुप घातलें. आणि तरवार उपसून **धैर्यशीलास** पकडण्याकरितां ते त्याकडे येऊं लागले. तें पाहून, जसा कोपलेला सिंह गजांच्या कळपांत बिनधोक शिरतो, तसा तो त्या भेकड शिपायांच्या समाजांत घुसला. तो अशा शर्थीनें तरवार परजूं लागला कीं, त्याकडे कोणाच्यानें पाहवेना. तो क्रोधानें व्याप्त होत्साता पट्टा खेळत आपल्या अंगावर येतो असें त्या आळशी शिपायांनीं पाहतांच त्यांनीं आपलीं हत्यारें टाकून पळ काढला. ते सर्व नांवास मात्र शिपाई होते. बहुतेकांस तरवार कशी धरावी तेंही माहित नव्हतें. बळेंच त्यांच्या कमरेस ढाल तरवार बांधून त्यांस दरोग्यानें आणिलें होतें. **धैर्यशीलाचें** हस्तलाघव व चपलत्व त्यांच्या दृष्टीस पडतांच कोणी म्हातारीच्या मध्यघरांत पळाले, व कोणी माडीवर गेले. कोणास कोठेंच जावयास रस्ता सांपडेना म्हणून ते जागचे जागींच **धैर्यशीलास** शरण येऊन त्याच्या पायां पडूं लागले. दरोगे साहेब मागील दारानें मुकाट्यानें येऊन म्हातारीच्या माडीवर जाऊन बसले होते. त्यांसही **धैर्यशीलाचें** शौर्य पाहून फार आश्चर्य वाटलें. त्यांनीं विचार केला कीं, आतां यास बाहेर पडावयास रस्ता नाहीं, सबब रातचे रात्र तसेंच राहूं द्यावें; मग दिवस उगवल्यावर यास धरण्याची कांहीं तरी तजवीज काढूं. मग त्यानें सर्व शिपायांस ताकीद केली कीं, "सर्व दरवाजांचा बंदोबस्त करून येथें स्वस्थ निजून राहा." असा हुकूम होतांच शिपायांनीं तसें केलें. **धैर्यशील** तूर्त तर संकट गेलें असें पाहून

वीरासन घालून बिछायतीवर तरवार हालवीत जागत बसला.

धैर्यशील आंत सांपडून दरवाजास कुलुप घातलें इतकें कृत्य होतांच म्हातारी दरोग्याकडे गेली, आणि सरकारानें जाहीर केल्याप्रमाणें माझ्या श्रमाचें सार्थक्य व्हावें, म्हणून त्याची प्रार्थना करूं लागली. त्यानें तत्क्षणींच हा म्हातारीनें पकडून गेलेला चोर धरण्याची खरी मेहनत केली आहे, याकरितां कबूल केलेले एक हजार रुपये बक्षीस इला मिळावे, असें सर्टिफिकीट दिलें. ती तें रात्रींच हस्तगत करून दिवस उगवल्याबरोबर प्रधानाकडे गेली आणि तें सर्टिफिकीट दाखवून एक हजार रुपये पदरांत पाडून घेतले.

प्रातःकाळ होतांबरोबर सर्व शिपाई दरोग्याकडे गेले, आणि पुढें काय तजवीज करावी म्हणून विचारूं लागले. दरोगा मनांत म्हणे, " यास धरण्यास अगर ठार मारण्यास काय युक्ति करावी ? याच्या चपलत्वामुळें कोणाच्यानेंही याच्याजवळ जाऊन यास धरवणार अगर मारवणार नाहीं. दुरून गोळी घालून मारणाराही आपल्या शिपायांत कोणी दिसत नाहीं. सेनाधिपतीकडून कोणी गोलंदाज बोलवावा, तर आपलेपाशीं इतके शिपाई असून एक चोर धरवत नाहीं असें राजास समजून आपली अब्रू कमी होईल. नंतर किंचित् स्तब्ध राहून त्याणें शिपायांस सांगितलें कीं, " चार हुशार असामींनीं मागील दारानें जाऊन थोरल्या दरवाजापाशीं तरवारी उपसून तयार राहावें, आणि दरवाजा खुला करून त्यास बाहेर जाण्याची परवानगी द्यावी. नंतर तो बाहेर पडतांक्षणींच बाहेरच्या लोकांनीं त्याचे तुकडे करावे. " असा हुकूम आला तो त्या भेकड शिपायांस फार पसंत वाटला. त्यांनीं आपल्यांतून मोठे धैर्यवान् असे चार शिपाई निवडून त्यांस दरवाजापाशीं उभें राहण्यास पाठविलें, आणि बाकीच्यांनीं दरवाजा उघडला. तें पाहून धैर्यशील पुन्हां उठला आणि पट्टा घेऊन वाडा सोडण्यास जाऊं लागला. इतक्यांत दरोगा वरून खिडकीवाटे तोंड बाहेर काढून म्हणाला, " खबरदाररे, याला खुशाल जाऊं द्या, कांहीं एक हरकत करूं नका. " असें त्याचें कपटाचें भाषण ऐकतांच धैर्यशीलानें वर त्याकडे पाहिलें. तोंपर्यंत त्यानें दरोग्यास पाहिलें नव्हतें. तो दृष्टीस पडतांच इतकें कृत्य

करण्यास हाच मनुष्य कारण आहे, असें त्याचे मनांत येऊन त्यानें रागानें आपला पिस्तुल काढला, आणि लागलाच दरोग्यावर मोडून त्यास ठार केलें. धैर्यशील इतकें कृत्य करितो आहे तोंच एका धैर्यवान् शिपायानें येऊन धैर्यशीलाच्या पाठींत तरवार मारली, परंतु अंगांतील चिलखतामुळें ती त्यास लागली नाहीं. त्याणें तत्क्षणींच त्या शिपायाकडे तोंड फिरविलें, आणि त्यास वार केला; तेणेंकरून त्याच्या एका हातास तो लागून त्याचा तुकडाच पडला. परंतु जीवाचे भयास्तव तो शिपाई तसाच दारावाटे पळून गेला.

दरोगेसाहेब प्राणास मुकले व एका शिपायाची तशी वाट झाली, हें पाहून बाकीच्या शिपायांसही जीवाचें भय प्राप्त होऊन तेही क्षणांत नाहींसे झाले. असें पाहून धैर्यशीलानें परमेश्वराचे आभार मानून तो घोड्यावर बसला, आणि आनंदानें घोडा उधळीत गांवाबाहेर निघून गेला. नंतर त्यानें विचार केला कीं, जर आपण या थोरल्या रस्त्यानें जाऊं लागलों, तर, आणखी एखादें संकट निर्माण होईल. असें मनांत आणून तो आडमार्गानें नदीच्या कडेनें नाल्यांतून व खोंगळ्यांतून लपत छपत चालला. तो कोणीही मनुष्य दिसत नाहीं, इतका दूर गेल्यावर नदीच्या वाळवंटावर आला. तेव्हां तेथें एका धोंड्यावर एक म्हातारा मनुष्य तोंड धुत बसला होता. तो त्याच्या दृष्टीस पडला. त्यानें धैर्यशीलास पहातांच उठून मोठ्या नम्रतेनें सलाम केला, आणि तो त्यास दुवा देऊं लागला.

हा मनुष्य त्या शहरांतील इमानी व धर्मशील असा एक फकीर होता. पहिले दिवशीं जेव्हां हे चौघे विद्वान् त्या शहरांत आले त्या वेळेस यानें धर्म मागितल्यावरून त्या चौघांनीही यास एक एक रुपया धर्मार्थ दिला होता, सबब तो त्यांच्यामागें ते मनोहरपंडित व श्यामसुंदर यांच्या श्वशुरांनीं तयार केलेल्या गृहीं जातपर्यंत आशीर्वाद देत आला होता. ह्मणून त्यास त्या चौघांचीही चांगली ओळख झाली होती.

धैर्यशीलानें पुन्हा त्यास एक रुपया दिला. तो येऊन बहुत दिलें ह्मणून संतोष पावून तो मुसलमानी भाषेत दुवा देऊं लागला. बोलतां बोलतां अखेरीस तो ह्मणाला, " भगवान् तुमचें कल्याण

करो; परंतु तुमच्या दोघां स्नेह्यांचें फार वाईट झालें!" तें ऐकून पुन्हां धैर्यशीलाच्या पोटांत धस्स झालें! त्यानें "मला कांहीं माहित नाहीं, याकरितां खरें काय असेल तें कृपा करून सांग," ह्मणून त्याची विनंति केली. नंतर फकीर बोलूं लागलाः—

"महाराज, आज तिसरा रोज आहे, तुमच्या एका स्नेह्याच्या श्वशुरगृहावर दरोडा पडला. त्या वेळेस तुमच्या स्नेह्यानेंच चोरांस दार उघडलें असें लोक ह्मणतात. परंतु त्या वेळेपासून त्यांचा ठिकाण नाहीं. मला वाटतें, चोरांनीं त्यांस सकृद्दर्शनीं बळी देऊन पुरून टाकलें असावें. दुसरें, काल मी धर्म मागण्यास दरोगेकचेरींत गेलों होतों. तों तेथें तुमचा दुसरा मासुरवाडीस गेलेला स्नेही हातांपायांत बेड्या ठोकलेला माझ्या दृष्टीस पडला! मग त्यानें काय गुन्हा केला असेल तो असो. मला माहित नाहीं. म्यां शोध केला पण कोणी मला सांगेना." इतकें बोलून फकीर सलाम करून निघून गेला.

धैर्यशीलानें तें वर्तमान ऐकतांच त्यास त्रिभुवन शून्य दिसलें. व त्याच्या डोळ्यांपुढें अंधारी आली. त्याच्या मनांत आलें कीं, पुष्पशील व श्यामसुंदर हे तर प्राणास मुकले; आणि मनोहर पंडितही पेंचांत सांपडला आहे; त्यासही येथील अधिकारी अन्यायानें फांशीं देतील. एकूण आपले तिन्ही स्नेही नाहींसे झाले. असें वाटून त्यास अतिशय दुःखाचे उद्गार येऊं लागले. कंठ सद्गदित होऊन शोकाग्नीनें त्याच्या सर्वांगाचा दाह झाला. हातपाय लटलटां कांपूं लागले. व देहभान नाहींसें झालें. याप्रमाणें मूर्च्छना आल्यासारखें होऊन घोड्याच्या मानेवर डोकें टेकून तो पडला; व घोड्याचा लगाम ढिला सोडून त्यानें त्यास मनास येईल तिकडे जाण्यास मोकळीक दिली.

---

# भाग १.

दिंडी.

॥पद्मनयना लावण्य राजबाला॥हांक शोकें मारील पुष्पशीला ॥
॥मनामाजीं त्यावरील एकभावें॥ कथाभागीं या लक्ष्य जनीं द्यावें॥

## खरी प्रीति.

---

सुमारें नऊ वाजण्याचा समय प्राप्त झाला होता. प्रभातकाळची थंडी नाहींशी होऊन ऊन अंगास किंचित् चटका देऊं लागलें होतें. अशा समयास त्या नदीच्या कांठानें धैर्यशीलाचा घोडा हरळी खात खात जिकडे हिरवें दिसत होतें तिकडे चालला. तो नदीच्या किनाऱ्याचा भाग अतिरमणीय होता. त्या ठिकाणीं नदीचें पात्र रुंद असून प्रवाहाच्या एका बाजूस मोठा खडक व दुसऱ्या बाजूस वाळवंट होतें. उदकाचा प्रवाहही खडकाळींतून चालत असल्यामुळें व कित्येक ठिकाणीं लहान लहान धबधबे असल्यामुळें पाण्याचा आवाज एकसारखा धोधोधो असा चालत होता. त्या पाण्याच्या आपटण्यानें तें बगळ्याच्या पंखासारखें स्वच्छ उदक नाहींसें होऊन त्याचे लक्षावधि बिंदु बनून ते चोहोंकडे उडत. त्यावरून मोत्यांचा वर्षाव होतो कीं काय असें वाटे ! कोठें कोठें मोठमोठे त्याचे चांदीचे पत्रे होत आहेत, व कोठें त्यास नानातऱ्हेच्या आकृति येताहेत असा भास होई. दोहों बाजूंची दरड फार उंच नसून हिरवी गार दिसे, व तीवरील लहान लहान झुडपें तिजवर काळीं जनावरें चरतात असा दुरून भास होई. आंब्याचे, फणसाचे व वडाचे वगैरे पुष्कळ वृक्ष दोहों अंगांस होते त्यामुळें तर त्या स्थलास फारच शोभा आली होती. त्या वृक्षांवरून पोपट, कोकिळा, साळुंख्या, व भारद्वाज, इत्यादि पक्षी बसून सुस्वर शब्द करीत; व या झाडावरून त्या झाडावर आनंदानें उड्या मारीत. वडाच्या पारंब्या कित्येक ठिकाणीं जमीनीपर्यंत येत चालल्या होत्या त्यांवर बसून गुराख्यां-

चीं मुळें ओंके घेत; व कित्येक ठिकाणीं त्या. मोठ्या तपस्व्याच्या दा-
ढीप्रमाणें लोंबत आहेत असें दिसत होतें.

धैर्यशील चालला होता त्याच्या पलीकडचें स्थळ तर फारच सु-
शोभित होतें. त्याच्या उभयतांगास केळी, पोफळी व नारळी यांचे
बगीचे होते. नदीकिनाऱ्यासंनिध झाडी दाट लागली होती. पाण्या-
चा त्या ठिकाणीं एक विस्तीर्ण डोहो होता, व एका अंगास मोठें वा-
ळवंट होतें. अशा त्या स्थळीं पद्मनयना आपल्या सख्यांसहवर्तमान
जलक्रीडा करावयास आली होती. त्या स्थळाच्या आसपास शिपा-
यांचे पहारे होते; व तिजबरोबर आलेल्या तिच्या दासी व मैत्रिणी
तिच्यानजीक पुष्कळ होत्या. पालख्या, म्याने, तुरख्याच्या गाड्या,
वगैरे त्यांचीं वहनें एका बाजूस उतरलीं होतीं. व जरीकांठी पीतांबर,
शेलाऱ्या, पैठण्या, तपशीले, वगैरे त्यांचीं वस्त्रें व नाना तऱ्हेचे अलंकार
वाळवंटावर पडले होते. अशा रीतीनें त्या संपूर्ण तरुण मुली उपवस्त्रें नेसून
पाण्यामध्यें अति आनंदानें डुंबत आहेत व एकमेकींच्या अंगावर पाणी
फेंकीत आहेत; इतक्यांत धैर्यशीलाचा घोडा त्यांच्या दृष्टिकटाक्षम-
र्यादेंत आला. त्यास प्रथमतः हरिणाक्षी पद्मनयनेनें पाहिलें. तीस हा
पुष्पशीलच आहे असें वाटून ती आपल्या सख्यांच्या समुदायांतून
निघून कोरडें नेसून धांवतच धैर्यशीलाकडे आली. ती जवळ आल्या-
वर हा पुष्पशील नव्हे असें तिला समजलें, परंतु त्याचा मित्र
धैर्यशील असावा असें अनुमान तिणें केलें. नंतर ती अति नम्रतेनें
ह्मणाली, " महाराज, आपण सर्व इतके दिवस कोठें होतां? आपणांस
शोधून शोधून आह्मी थकून गेलों आहों. बरें झालें, आज अवचित
तरी गांठ पडली. "

धैर्यशील देहभान विसरून दुःखसमुद्रांत बुडून गेला होता; तो
हे मंजुळ शब्द ऐकून डोळे उघडून पाहूं लागला, तों सर्व चमत्का-
रिक देखावा त्याच्या दृष्टीस पडून त्यास फार आश्चर्य वाटलें. नंतर
किंचित् विचार करून व पद्मनयनेचें लावण्य स्वरूप पाहून त्यानें
कल्पना केली कीं, हा राजकन्या असून येथें जलक्रीडार्थ आली अ-
सावी. मग तो तीस ह्मणाला, " बाई तुह्मी कोण आहांत व येथें क-
शास आलां? पद्मनयना ह्मणाली. मी विचित्रपुरीच्या राजाची कन्या,

माझें नांव **पद्मनयना**. आपलें नांव कृपा करून सांगावें. त्यावर **धैर्यशीलानें** आपलें नांव सांगितल्यानंतर तिनें त्यास **पुष्पशीलानें** सांगितलेलें वर्तमान सांगून त्याची तारीफ केली. तें ऐकून **धैर्यशील** म्हणाला, " **पद्मनयने**, तुझ्या नगरजनांचे संरक्षणास्तव आह्मीं अनिर्वाच्य संकटें भोगिलीं असून आम्हांस या शहरांत अशीं बक्षिसें मिळावीं काय? आहाहा! काय राजनीति! आणि काय न्याय!! अरेरे! असा अनर्थ कोठेंही नसेल!! या दुष्ट राजाच्या आणि कपटी रहिवाशांच्या शहरास आग कां नाहीं लागत? 'बेबंद राज्य आणि झोटिंग बादशाही,' ही म्हण मी इतके दिवस ऐकत मात्र होतों; परंतु ती या शहरांत विशाल रूपानें दृष्टीस पडली. परमेश्वरा, आम्हास येथें येण्यास बुद्धि कशाकरितां दिली? येथें आल्यानें एका क्षणांत माझीं स्वर्गसुखापेक्षां उत्तम सुखें नाहींशीं होऊन मी चिरकाळ शोकार्णवांत पडण्यास पात्र झालों आहें! हाय हाय! माझे सर्व मित्र नाशाप्रत पावले, आतां मी काय करूं? (क्रोधाच्या आवेशानें) अरे, येथील राजाच्या नरडीचा जाऊन घोंट घेऊं! अगर सर्व गांवास अंगार लावून देऊं! किंवा तो सूड उगवण्यास या राजकन्येचाच येथें शिरच्छेद करून टाकूं! अथवा मी आपला प्राणत्याग करूं! करूं तरी काय!! (रडूं लागतो.)

असें **धैर्यशीलाचें** आवेशाचें भाषण ऐकून **पद्मनयना** थरथरां कांपूं लागली. ती दीनवाणें तोंड करून हात जोडून **धैर्यशीलास** ह्मणाली:"महाराज, हें काय आपण बोलत आहां? माझे पित्याकडून अगर मजकडून कोणता अन्याय झाला, तो मला कथन करा. कोणीं आपणांस विनाकारण गांजिलें असेल अगर आपला अपमान केला असेल त्याचें शिर उडविल्याशिवाय मी अन्न घेणार नाहीं. परंतु अपराध पदरांत घालण्याचे अगोदर विनाकारण निर्दोष अंतःकरणास डाग लावाल तर नाइलाज आहे. हे **धैर्यशील**महाराज! कोणाचेंही हातून जे अपराध झाले असतील ते सत्वर सांगावे; तुमच्या या संशयात्मक भाषणानें माझें काळीज दुभंग झालें आहे."

हें **पद्मनयनेचें** बोलणें संपल्यावर **धैर्यशीलानें** विचार केला कीं, ईस सर्व हकीकत सांगण्यांत कांहीं हंशील नाहीं, मग तो ह्मणाला,"**पद्मन**-

यने. पुष्पशीलास भेटण्याचे वगैरे सर्व विचार आतां सोडून येथून चाल-ती हो; यापेक्षां जास्ती मजकूर ऐकण्यांत कांहीं जीव नाहीं," असें म्हणून धैर्यशील जाऊं लागला. तों इतक्यांत पद्मनयना घोड्यापुढें जाऊन आडवी पडली. आणि म्हणाली, "छिः छिः महाराज, असें करूं नका. अगोदर माझा शिरच्छेद करा आणि मग जा. निष्कलंकाला जन्मभर न बुजणारा घाव मारून जाऊं नका, सर्व हकीकत काय आहे ती सांगा; माझे मनांत, बिलकुल कपट नाहीं. पुष्पशीलाचें पाणिग्रहण म्यां कायावाचामनेंकरून केलें आहे, आतां त्यावांचून इतर पुरुष मला बापाभावाप्रमाणें आहेत असें समजावें. इतकेंही असून जर आपण मला खरें वर्तमान सांगत नसाल तर मी येथेंच प्राण देईन." असें तिचें निग्रहाचें बोलणें ऐकून धैर्यशील शांत झाला, आणि त्याणें वर सोडल्यापासून झालेलें सर्व वर्तमान सांगितलें; आणि अखेरीस पुष्पशील विहिरींत पडून मरण पावला हेंही निवेदन केलें. धैर्यशील तें वर्तमान सांगत असतां तिला आपल्या बापाचा व सर्वांचा फार राग आला. तिच्या डोळ्यांवाटे अश्रुधारा चाल-ल्या. परंतु अखेरचा पुष्पशील वारल्याचा वृत्तांत ऐकतांच तिला मूर्च्छा येऊन ती खालीं पडली! इतक्यांत तिच्या दासी येऊन त्या तिला सांवरूं लागल्या. त्या वेळेस धैर्यशीलानें विचार केला कीं, आतां आपण येथून जावें, कारण, ही सावध झाल्यावर म्यांच कांहीं करून इला मूर्च्छित केलें वगैरे भलतेंच एखादें लचांड उत्पन्न व्हा-वयाचें. लचांड गळ्यांत येण्यास या गांवांत कांहीं उशीर नाहीं. क-दाचित् ही राजकन्याच मजवर उलटेल. त्यास वाटलें कीं, जसे गां-वचे दुसरे लोक अल्पमनाचे व अल्प समजुतीचे आहेत तशीच हीही असेल. अशी कल्पना करून तो घोडा फेंकीत चालता झाला.

दासींनीं तीस उठवून बसविल्यावर सावध होऊन ती ह्मणते, "प्राणनाथ, मला टाकून कोठें गेलां? आह्मी दुष्ट विचित्रपुरींती-ल रहिवाशांनीं तुमचा छल केला ह्मणून असें केलें काय? आतां मी देह ठेवणार नाहीं." इत्यादि तिचीं भाषणें ऐकून दासींच्या डोळ्यांत अश्रुधारा आल्या. त्यांनीं कल्पना केली कीं, त्या रात्रीं यांणीं जो नवरा वरला तो मरण पावला असावा. नंतर त्यांणीं तीस

पालखींत घालून घरीं आणलें; आणि तिच्या मातापित्यांस तें वर्तमान सांगितलें. त्यांसही फार वाईट वाटलें; परंतु **पद्मनयने**नें त्या वेळेपासून फारच धास्ती घेतली. तिणें अन्नपाणीही वर्ज्य केलें. हें पाहून तिच्या बापानें विचार केला कीं, ही उपवर झाली आहे, याकरितां इला इतकें दुःख वाटत आहे; सबब कोणता तरी एक वर कायम करून महिन्या पंधरादिवसांचे आंत इचा विवाह करून टाकावा. असा बेत करून दुसरे दिवशीं, तिसरा प्रहरीं **पद्मनयना** आपले महालांत निश्चिंत बसली आहे, असें पाहून तिच्या बापानें जे कांहीं वर पाहिले होते त्यांच्या तसबिरा जमा करून तिच्या पुढें ठेविल्या आणि हास्यमुख करून ह्मणाला, " **पद्मनयने** , हें पहा तुझ्या समोर काय आहे तें, यांतून कोणती तसबीर चांगली दिसते व तुला आवडते तें मला सांग पाहूं. या कामाची मजकडून थोडी हयगय झाली याची मला क्षमा कर; आणि आतां विलंब न करितां लवकर यांतून एखादा वर पसंत कर, ह्मणजे आठ दहा दिवसांनीं लग्नाचा थाट उडवून देतों. "

असें बापाचें भाषण ऐकून **पद्मनयना** ह्मणाली, " बाबा, माझें लग्न झालें. आतां हें तूं काय करितोस?" बाप ह्मणतो, " छिः वेडे पोरी असें ह्मणूं नये. क्षत्रियांच्या मुली उपवर झाल्या ह्मणजे पुष्कळ नवरे पहातात, ह्मणून शास्त्रोक्त विवाह झाल्याशिवाय तें मनांत आणावयाचें कीं, काय?"

**पद्म०**—बाबा, मानसिक विवाह शास्त्रोक्तापेक्षांही जास्ती प्रबळ आहे. त्याप्रमाणें मीं एका पतीचें पाणिग्रहण केलें, आतां मला दुसरा भ्रतार करण्यास तोंड नाहीं.

**बाप०**—बेटा, तें सर्व खरें; परंतु प्रसंग पडेल तसें वागलें पाहिजेना? तुला **पुष्पशीला**पेक्षां दिढीनें चांगला वर मिळाला, मग काय चिंता आहे?

**प०**—बाबा, अहो त्यांच्या सारखे आणि **धैर्यशील** महाराजांसारखे पुरुष या त्रैलोक्यांत सांपडणें कठिण ! आहाहा ! काय त्यांचें तेज ! काय पराक्रम ! असें असून तूं त्यांची भेट न घेतां त्यांचा विलक्षण अपमान केलास ! हरहर ! बरें सर्व असो, परंतु बाबा, मी जें बोलतें तें नीतिमार्ग उल्लंघन न करण्याकरितां आहे.

वा०— तर काय मी तुला अनीतीची गोष्ट सांगतों !

प०—तर माझा शास्त्रोक्त विवाह झाल्यावर असें झालें असतें तर तूं मला दुसरा भ्रतार करण्यास मोकळीक दिली असतीस काय ?

वा०— पण तसें कोठें झालें आहे ?

प०—पर तर. मीं पूर्वींच सांगितलें आहे कीं, मानसिक विवाह शास्त्रोक्तापेक्षां प्रबळ आहे. मग काय व्हावयाचें राहिलें आहे ?

वा०— तर त्वां मनांत काय संकल्प केला आहे ?

प०— बाबा, खरेंच सांगूं ? पुष्पशीलाखेरीज इतर पुरुष मला तुझ्याप्रमाणें आहेत. असा—

वा०—हा द्वाड कार्टे ! तुला शहाणीं शहाणी मी ह्मणत होतों, परंतु तूं अगदीं मूर्ख होत चालली आहेस ! ( असें म्हणून रागानें उठून तिच्या आईकडे जातो. )

तिच्या आईस हें सर्व वर्तमान समजतांच ती पद्मनयनेजवळ येते आणि ह्मणते.—

आई.—पद्मनयने, हें त्वां काय मांडलें आहे ? आह्मांस पुत्र नाहीं ह्मणून आह्मी रात्रंदिवस दुःख करीत आहों. तितक्यांत तुजकडे पाहून आह्मांस आनंद वाटत होता. ते सारा वेळ ह्मणतात कीं, पद्मनयनेचें लग्न झालें ह्मणजे तिच्या नवऱ्याच्या स्वाधीन सर्व राज्य करून, मी आतां वृद्धापकाळीं परलोकसाधनास लागेन. आणि तुला हें ठाऊक असून तूं भलतें भलतें काय बडबडतेस ? ( हळूच ) अगे, अशा वेळेस मोठ्या पतिव्रतासुद्धां मोठाले गोंधळ करितात; आणि तुझें तर कांहीं बिघडलें नसून तूं विनाकारण कां आपले जीवास दुःख करून घेतेस ?

प०—आई, काय करूं ? पुष्पशील महाराजांखेरीज इतर पुरुषांकडे पहाण्यास देखील माझें मन मला परवानगी देत नाहीं; त्यास मी काय करूं ?

आई.—( डोळ्यांत आंसवें आणून.) परंतु तो परलोकास गेला, आतां काय उपाय आहे बरें?

प०—आई, खरें सांगूं ? मला वाटतें स्यांही त्यांच्यामागें परलोकास जावें आणि तेथें त्यांस वरावें; परंतु दुसरी गोष्ट करूं नये.

आई.—बाई, आतां तुझ्याशीं बोलण्याची पराकाष्ठा झाली. ( असें म्हणून रागानें तीही उठून जाते. ) नंतर तिच्या आईबापांनीं विचार केला कीं, तीस पुष्पशीलाचा फारच नाद लागला आहे, याकरितां तूर्त लग्नाविषयीं कांहीं बोलूंच नये. तिला या गोष्टीचा विसर पडल्यावर एखादी तजवीज करितां येईल.

पद्मनयना अगदीं उदास होऊन तिला अत्यंत दुःख झालें. तीस एक एक क्षण युगाप्रमाणें भासूं लागला. तिला कोणतेंही काम गोड लागेना; व सर्व त्रिभुवन तिला शून्यसें भासूं लागलें. संध्याकाळीं जेवणखाण आटोपल्यावर ती आपल्या महालांत निजावयास गेली, त्या वेळेस तिला मोठा दुःखाचा कड आला. ती एकांतीं सर्व दारें बंद करून पलंगावर बसली, आणि विचार करूं लागली. त्या-समयीं दहा वाजून गेले होते, व सर्व आपआपले ठिकाणीं निजावयास गेले होते. ती ह्मणाली, " पहा शास्त्रामध्यें स्त्रियांनीं एक पति करावा, आणि त्यावर विश्वास ठेवून पतिव्रताधर्मानें वागावें असें स्पष्ट सांगितलें आहे. त्याप्रमाणें मी एक भ्रतार केला. आतां जर मी अन्यास वरीन तर जारकर्माचा दोष मला खचित लागेल. ज्ञानदृष्टीच्या व परमेश्वरनियमानें पाहिलें असतां, दुसरा पति करण्यास मला जागा राहिली नाहीं. लोकदृष्टीनें मात्र त्याचे विरुद्ध दिसतें; परंतु मनास जी गोष्ट पसंत नाहीं ती जनांत युक्त असून काय फळ ? या जगांतील सर्व सुखें प्राप्त होण्यास परमेश्वराची कृपा पाहिजे, आणि जर मी त्याच्या आज्ञेविरुद्ध वर्तेन तर त्याची कृपा मजवर कशी होईल ? इच्छामात्रेंकरून तो सर्व व्यापार करणारा; त्यास माझें संकट निवारणें मोठें कठिण आहे असें नाहीं. असो; परंतु मला दुःसह वैधव्य प्राप्त झालें यांत संशय नाहीं ! आतां जर माझें लग्न झालें व असाच हट्ट घेऊन मी बसलें, तर मोठे वृद्ध शास्त्री माझें मन वळविण्यास मजकडे येतील. आणि अखेरीस मला बळेंच उचलून एखाद्याशीं माझा विवाह करून मला जारकर्मांत टाकतील ! ( रडूं लागते ) हरहर ! नारायणा! काय दुःख या पामरावर एकदम आणिलेंस ? अरे, कोणास हळदीचा डाग तरी लागत असतो, परंतु मजविषयीं तूं फारच निष्ठुर झालास ! आहाहा ! प्राणनाथाचें स्वरूप पाहून त्या दिवशीं मला किती आनंद

त्याप्रमाणें देवीचें देऊळ मोडून टाकावें ह्मणून पुष्पशील राजाकडे गेला; आणि हें देवीचें देऊळ मोडून टाकिलें असतां रयतेस फार सुख होईल असें बोलला. तें ऐकून कांहीं वेळ विचार करून राजा ह्मणाला, " परंतु हें स्थान फार प्राचीन आहे. या करितां तसें केलें असतां एखादें विघ्न उत्पन्न होईल." पुष्पशील ह्मणतो, " विघ्न तें काय व्हावयाचें आहे? ही देवी शास्त्रोक्त नसून अज्ञान लोकांनीं कल्पिलेली आहे; यास्तव तिचें उत्थापन करण्यास कांहीं हरकत नाहीं. आपल्या शास्त्रांत सांगितलेलीं तुळजापूर, माहूर, सप्तशृंग अशीं देवींचीं स्थानें मोडण्यास कोण सांगत आहे? परंतु सर्व लोकांनीं अविचारीपणानें भलतेंच अशास्त्र असें हें देऊळ रयतेस नाडविण्यासाठीं मांडलें आहे तें निःशेष करण्यास कांहीं अडचण नाहीं."

याप्रमाणें पुष्पशील बोलल्यावर, मी प्रधान, प्रतिनिधि, वगैरे लोकांस विचारून मग काय तें सांगेन; असें बोलून त्यानें तत्क्षणीं प्रधान व प्रतिनिधि इत्यादि लोक बोलावून या बाबतींत त्यांची संमति विचारली. त्या वृद्धांनीं तर त्या गोष्टीस अगदींच इनकार केला. आणि असें केल्यास हटकून अनिष्ट उत्पन्न होईल, अशी राजास भीति घातली. ती गोष्ट राजासही पसंत वाटली; परंतु या विप्रांनीं मोठमोठीं संभाषणें करून वक्तृत्वकुशलतेनें राजास कुंठित केलें, आणि मोठ्या हुरुपानें राजाची परवानगी घेतली.

राजाज्ञा होतांच या तिघां विद्वानांनीं आणखी दुसऱ्या दिवशीं मजूर लावून देऊळ पाडण्यास आरंभ केला. तेव्हां ज्यांची ती कुळदेवी होती ते व दुसरे गांवांतील संभावित लोक येऊन असें करूं नका ह्मणून यांची विनवणी करूं लागले. परंतु यांनीं त्याच्याकडे लक्ष्य न देतां देवीस स्थानभ्रष्ट करण्याचें काम सपाट्यानें चालविलें. तेव्हां राजसत्तेपुढें इलाज नाहीं असें जाणून सर्व निघून गेले. सर्व देऊळ जमीनदोस्त झाल्यावर देवीस हात लावण्यास कोणी मजूर धजेनात. तेव्हां त्या तिघां विद्वानांनीं कंबरा बांधून हातांत मोठमोठ्या पहारी घेतल्या आणि स्वतः पुष्कळ मेहनत करून देवीस उलथून टाकिली. तेव्हां दुसरे लोकही येऊन त्यांनीं लोटीत लोटीत तीस लांब नेऊन एक कूप खोल होता ह्मणून त्यांत पुरून टाकिलें.

तिच्या अंगावरील अलंकार व देवळाचा लांकूड फांटा वगैरे सर्व लिलांव करून विकून टाकिलें; आणि त्या देवळावरून एक रुंद रस्ता तयार करून तेथें आठवड्याचा बाजार स्थापन केला व आपले स्मरणार्थ त्या रस्त्यास 'ओन' बाजार असें नांव दिलें.

ह्याप्रमाणें देवीची व्यवस्था होण्याबरोबर जे चोर तिला भजणारे उरले होते त्यांस मोठें भय प्राप्त झालें. त्यांस वाटलें कीं, आतां आपला चरितार्थ चालणार नाहीं. याकरितां कांहीं तरी कळ उत्पन्न करून राजास भयप्रदर्शन करावें, ह्मणजे तो देवीची पुनः स्थापना करील. अशा प्रकारचे विचार त्यांच्या मनांत घोळत होते तोंच एके दिवशीं रात्रीं एका चोरास स्वप्न पडलें. जशी काय कदंबादेवी रागानें येऊन म्हणाली, "हे सद्भक्तांनो, तुह्मी कसेंही करून या राजाची मुलगी पळवून नेऊन ठेवा. यानें माझी फार दुर्दशा केली आहे. परंतु तुह्मी एवढें करा, मी तुह्मास साहाय्य आहें; मग त्या राजाचा सूड मी घेईन." असें स्वप्न पडतांच तो जागा होऊन दुसरे दिवशीं त्यानें धैर्यशीलाच्या सपाट्यांतून पळालेला चोर जो कामाजी रामोशी, त्यास बोलावून हें स्वप्न सांगितलें, व बाकीच्या सर्वांमध्येंही ती गोष्ट प्रकट झाली. नंतर यास काय तजवीज करावी याविषयीं ते विचार करूं लागले.

देवीचा निकाल आल्यावर त्या तिघां विद्वानांस फार आनंद झाला. मनोहर पंडित व श्यामसुंदर हे त्या शहरांत मग शाळा स्थापन करण्याच्या विचारास लागले. पुष्पशीलाचें सर्व ध्यान पद्मनयनेकडे लागून गेलें होतें. आपला विवाह होऊन दोघांचीही भेट एकांतांत केव्हां होईल असें त्यास झालें होतें. तो वारंवार पद्मनयनेच्या महालाकडे जाई, आणि केव्हां तरी तिची आपली एके ठिकाणीं एकांतांत गांठ पडावी ह्मणून यत्न करी; परंतु व्यर्थ. लग्नाचा समारंभ लवकरच होणार होता, सबब तिच्या माउसबहिणी व आणखी दुसऱ्या तिच्या बरोबरीच्या मुली घरीं आल्या होत्या, त्यामुळें तिच्या महालांत नेहेमीं त्यांची गर्दी असे. हें पाहून पुष्पशीलास फार वाईट वाटे; परंतु कांहीं इलाज चालेना. तितक्यांत त्यांच्या समक्षही तो कांहीं विनोदाचीं भाषणें बोलूं लागला कीं नाहीं तोंच मनोहर पंडित व श्यामसुं-

दर यांनी त्यास शोधीत तेथें यावें, मग अर्थात्स त्यास तो महाल सोडून जावें लागे. पद्मनयनेचीही तशीच अवस्था झाली होती. ती पुष्पशीलाचे दिवाणखान्याकडे क्षणोक्षणीं येण्यास पाही; परंतु रात्रंदिवस त्याचे स्नेही त्यापाशीं बसलेलेच असत. यामुळें तिचा निरुपाय होई. पुष्पशीलास पद्मनयनेच्या दासी व मैत्रिणी, आणि पद्मनयनेस पुष्पशीलाचे स्नेही केवळ शत्रुप्रमाणें भासत. एखादे वेळेस पुष्पशील चित्रपाल राजाशीं, अगर दुसऱ्या कोणी घरांतील प्रौढ मनुष्याशीं कांहीं बोलत असला, तर पद्मनयनेस कांहीं काम नसतांही ती तिकडून पुष्कळ वेळां जाई, व पुष्पशीलाकडे चोरून हास्यमुख करून पाही. पुष्पशीलानें पद्मनयनेस कधीं जिन्यांत, अंधारांत, अगर कोपऱ्यांत पाहिलें, की त्यानें लागलेंच तिजकडे धांवून जावें; आणि एखादा शब्द बोलण्यास प्रवृत्त होऊं लागावें तोंच कोणी मनुष्यानें तेथें यावें. त्या वेळेस त्या मनुष्यास पाहून त्यांणीं लज्जायमान होऊन दोघांनीं दोहींकडेस जावें.

पुष्पशीलानें बहुधा आपले स्नेह्यांस झुकांडी देऊन पद्मनयनेच्या महालाखालीं जो सुंदर बाग होती, तींतील चवथऱ्यावर जाऊन बसावें. तांबस मात्र एक पुस्तक पुढें घेऊन उगीच वरवर पहावें, परंतु सारें लक्ष्य पद्मनयनेच्या खिडकीकडे लावावें. तीसही पुष्पशील मजकरितां चवथऱ्यावर येऊन बसतो हें समजलें होतें, याकरितां तिचें लक्ष्यही तिकडेच असे, व तो तेथें आला असें समजतांच ती आपल्या सख्यांतून उठून पुष्पशीलाकडे पहात खिडकींत जाऊन बसे. तिच्या सख्यांस प्रथम ही कशाकरितां खिडकींत जाते हें समजूं नये, परंतु ती कोणीकडे अवलोकन करिते याचा विचार केल्यावर त्यांनीं तें कारण समजावें, आणि तिजवर भाषणें बोलावीं. त्या वेळेस पद्मनयनेस मी फार निर्लज्ज झालें असें वाटून त्याच्याकरितां तिनें पुन्हां आपले जाग्यावर परत यावें. एखादे वेळेस पुष्पशील आपले मित्रांत बसला असतां पद्मनयना जर तिकडून जाऊं लागली, तर तिजकडे पहाण्यांत त्याचें मन इतकें गढावें की, त्यास मी आहें कोठें याचेंही भान राहूं नये. तो ते समयीं चालू गोष्ट विसरून जाई. असें झाल्यावर त्याच्या मित्रांनीं त्याची थट्टा करावी. तेव्हां लज्जित

होऊन पुन्हां म्यानें त्यांकडे वळावें, परंतु मन स्थिर होऊं नये.

याप्रमाणें त्यांची प्रीति अत्यंत वृद्धिंगत झाल्यावर **पुष्पशीलास** या गोष्टीपणाचा त्रास आला. नंतर तो **चित्रपालराजाकडे** गेला, आणि निर्भीड होऊन त्यानें लग्नाची गोष्ट काढिली. राजाचे मनांतही तें कर्तव्य होतेंच, ह्मणून त्यानें तत्क्षणींच ब्राह्मणास बोलावून आणून तिथिनिश्चय केला. आणि **पुष्पशीलास** ह्मणाला, "तुमचे तीर्थरूप वगैरे मंडळी येथें नाहीं, याचें कसें करितां?" **पुष्पशीलानें** विचार केला कीं, **चौशहाणपूर** येथून दहा बारा दिवसांचे रस्त्यावर आहे. तेथें त्यांस हें वर्तमान समजून, येण्यास फार दिवस लागतील. याकरितां त्यांस समजूं न देतां विवाह करून घ्यावा. माझी खातरी आहे कीं, **पद्मनयने**सारखी सुशील व कुलीन राजकन्या वरल्याबद्दल माझ्या बापास किंचितही राग येणार नाहीं. असें मनांत आणून तो राजास म्हणाला, "कांहीं चिंता नाहीं. आतां तिथी थोड्या राहिल्या आहेत, आणि त्यांस खबर पोंचवून आणविण्यास अवकाश राहिला नाहीं; याकरितां तुम्ही कांहीं अनमान करूं नये. मी करीन तें माझे वडिलांस मान्य होईल अशी माझी खातरी आहे." राजानें त्याचा आशय समजून लग्नाची तयारी चालविली.

लग्नाचा दिवस येतांच **पुष्पशीलाचा** व **पद्मनयनेचा** आनंद गगनांत मावेनासा झाला. **चित्रपाल** राजानें त्या दिवशीं पुष्कळ द्रव्य खर्च करून विवाह मोठ्या समारंभानें केला. लग्नाकरितां जो मंडप घातला होता तो अति विस्तीर्ण असून त्याचे स्तंभ रुपेरी नक्षीदार पत्र्यांनीं मढविले होते. किनखाबी छत देऊन त्यास एकाशीं एक टेकून हंड्या लाविल्या होत्या. सभोंवतालीं मशरूचे पडदे लावून मोठमोठे आरसे व नानातऱ्हेच्या तसबिरी लाविल्या होत्या. मध्यभागीं रुपेरी पत्र्यांनीं मढविलेलें एक बोहलें होतें, व त्यावर सोन्याचें पाणी दिलेली मंडपी उभारून तीस मोत्यांच्या झिळमिळ्यांनीं युक्त असा भरजरी चांदवा दिला होता. अशा त्या मंडपांत सकाळच्या आठ वाजतां लग्न लागलें. नंतर बारा वाजतां भोजनाचा थाट झाला. त्यासमयीं **पुष्पशीलास** व **पद्मनयनेस** एका ताटांत बोहल्यावर भोजनास बसविलें होतें. त्यांना एकमेकांस ग्रास घालण्याचा वगैरे सोहळा पा-

हून **पद्मनयनेच्या** मातापितरांस व दुसऱ्या सर्व लोकांस फार आनंद वाटला. भोजन आटोपल्यानंतर नृत्यगायनाचा थाट झाला. संध्याकाळीं दीपोत्सव केला होता. सर्व मंडपास व दरवाज्यांस सुवासिक पुष्पांचे हार बांधिले होते. **पुष्पशीलानें** भरजरी पोषाख करून उत्तम अलंकार धारण केले होते. आठ वाजण्याचे सुमारास राजमहालासमोरील विशाल मैदानांत दारू काम फार अप्रतीम उडविलें. नानातऱ्हेची झाडें, गुबार, निरनिराळ्या रंगांच्या चंद्रज्योति, व नळे सोडले. इंग्लिश राज्यांतील एका युरोपियन कारागिराकडून एक काम करून आणिलें होतें तें सुरू लागण्याबरोबर सर्वांस प्रथम सुर्योदय आल्याप्रमाणें भास झाला. नंतर त्यांतून कित्येक तारे अति देदीप्यमान असे आकाशांत उडून तेथें ते फुटून त्यांतून अगणित लहान लहान तारे उडाले. अखेरीस त्या दारूकामांत, " **पुष्पशील** व **पद्मनयना** हीं निरंतर सुखी राहात " अशीं बाळबोध वर्तुळाकृति अक्षरें सर्वांच्या पाहण्यांत आलीं. तीं पाहून सर्वांनीं मोठ्यांनीं आनंदानें टाळ्या वाजविल्या !

याप्रमाणें सुमार एक तासभर दारू उडाल्यावर, **पद्मनयनेस** व **पुष्पशीलास** एका रंगमहालांत नेलें. तेथें **पद्मनयनेच्या** लग्नास आलेल्या तिच्या मावसबहिणी, व दुसऱ्या तिच्या मैत्रिणी वगैरे पुष्कळ तरुण मुली जमल्या. तेथें पुनः वधुवरांचा पदार्थसयुक्त पंचपक्वान्नांचा एकत्र फराळ झाल्यावर त्या तरुण मुलींनी त्या उभयतांकडून विड्या तोडविल्या. आणि नंतर **पद्मनयनेच्या** मावस बहिणीनें त्यांच्या पदरास गांठ देऊन एकमेकांचें नांव घेण्यास सांगितलें. **श्यामसुंदर** व **मनोहर**पंडित आणि **चित्रपाल** राजा व दुसरे वगैरेंतील आप्तमंडळींही तो चमत्कार पाहण्यास आली. **पद्मनयनेस** तिची आई ह्मणाली, " बेटा, घे नवऱ्याचें नांव घे पाहूं! "

**पद्मनयना**—( किंचित हांसून व लाजून. ) मी नाहीं बाई,— ( असें ह्मणून मान खालीं घालिते. )

**मनो०**—पुष्पशीला, वास्तविक ह्मटलें तर नांव घेण्याचा अधिकार तुझा अगोदर आहे.

**पुष्प०**—(हांसून.)**मनोहर** पंडिता,तूं येथें शास्त्राधिकार काढूं नकोस.

**प० आई**—खरेंच; वरानें अगोदर नांव घेतलें पाहिजे. हं जांवई-बोवा, आतां उशीर करूं नका.

**पुष्प०**—( जरा घोंटाळून. ) पद्म—

**श्याम०**—( मध्येंच वेगानें.) थांब, थांब. असें नांव घेऊं नकोस. कांहीं उखाणा घालून घेतलें पाहिजे. ( सर्व मोठ्यानें हंसतात. )

**प० बाप**—खरोखर माझी इच्छाहीं अशीच आहे.

**पुष्प०**—आपल्याला उखाणा बिखाणा कांहीं येत नाहीं बोवा.

**प० माऊस व०**—येत नाहीं तर,—असें ह्मटल्यानें चालत नाहीं; जांवई बोवांनीं उखाणा घालून नांव घेतलेंच पाहिजे. ( सर्व हंसतात. )

**पुष्प०**—**श्यामसुंदरा**, तूं तरी मला एखादा उखाणा शिकीव. आतां हे सर्वच माझ्या मागें लागले आहेत तस्मात् यांचें ऐकिलें पाहिजे.

**प० मा० व०**—( टाळ्या वाजवून हंसतात. ) आतां ठीक झालें.

**श्याम०**—अरे, मला उखाणा विचारतोस? पण तुला कमी येत असतील काय? आणि जरी येत नसतील तरी तुला नवीन रचतां येणार नाहींत काय?

**पुष्प०**—बरें बोवा; ( किंचित् विचार करून. )

**॥ स्वरूप सुंदर आगळी ॥ आणि पद्मनयना मदनाची पुतळी॥**

( सर्व आनंदानें हंसतात. )

**सर्व मं०**—**पद्मनयने**, हं आतां आटप लवकर.

**पद्म०**—( हांसून. ) मला बाई लाज वाटते.

**पद्म० मा० ब०**—मनाजोगता नवरा मिळाला आतां कसची लाज आहे?

**पद्म०**—( रागानें. ) पुरे गडे; तुझें आपलें भलत्या वेळेस भलतेंच बोलणें !

**प० बाप**—( किंचित् हांसून. ) बरें तें नाहीं; पण आटप आतां, घे लवकर नांव पाहूं.

**प० आई**—तुह्मी सर्वच तिला वेडें करूं नका ! घे, **पद्मनयने**, घे बाई नांव.

**पद्म०**—( विचार करून.) **॥ गौरीला शंकर पावले ॥ आणि मजकरितां पुष्पशील महाराज धांवले. ॥**

**प० आई**—खरेंच गे बाई; अशीच परी आली!

**प० बाप**—चला आटोपा आतां; रात्र पुष्कळ झाली.

( सर्व पुरुष व वृद्ध बायका निघून जातात.)

त्यानंतर तरुण मुली, **पुष्पशील** व **पद्मनयना** यांच्या गांठी सोडून निघून गेल्या; व त्याबरोबर **पद्मनयनाही** घाबऱ्या घाबऱ्या त्यांच्यामागें जाऊं लागली. तिला पाहून तिच्या मावसबहिणी हळूच ह्मणतात, " अग तूं कशाला येतेस? तुला आज या रंगमहालांत निजावयाचें आहे. "

**पद्म०**—( बळेंच. ) मी नाहीं गडे.

**मा० ब०**—( हळूच ) अग असें काय? जा तिकडे.

असें ह्मणून दोघी तिघींनीं तिला बळेंच पुष्पशील बसला होता त्या रंगमहालांत लोटून दिलें, आणि नंतर त्या दारास बाहेरून कडी लाविली.

तो रंगमहाल इंद्रभुवनाप्रमाणें सुशोभित केला होता. त्यामध्यें दोन रत्नखचित छप्परपलंग गुडघाभर उंचीच्या परांच्या गाद्यांनी बिछायत केलेले होते. प्रत्येकाजवळ एक एक नकशीदार सुवर्णपत्र्यांनीं सजविलेले टेबल होते, व त्यावर केवड्यासारख्या पक्क्या पानांच्या गोविंदविड्यांनीं भरलेलीं तबकें होतीं. व अत्तरदाण्या व गुलाबदाण्या होत्या. महालांतील हंड्यांमध्यें व झुंबरांत चंदनी अत्तराचे दीप जळत होते; व मोतिया, गुलाब, गुलछबू, मोगरा, इत्यादि सुवासिक पुष्पांचे मोठमोठे हार बाहेरून त्या महालाच्या खिडक्यांभोंवतीं बांधले होते; यामुळें बाहेरील मंजुळ वायूची झुळूक अति सुगंध येऊं लागली. आपोआप वाजणाऱ्या इंग्लिश वाजास किल्या देऊन ते त्या महालाच्या सभोंवतीं टेविले होते, यामुळें त्यांचा मंजुळ ध्वनि सामसूम समयास सप्तसुरांची समता करणारा सुमनास शांत करूं लागला. तो रंगमहाल हेंच कोणी एक ब्रह्मांड, त्यामध्यें, त्यांतील स्तंभांस वगैरे जोडलेले जे देदीप्यमान हिरे, व लखलखीत दीप, हींच नक्षत्रें भासलीं; व त्या सर्वांचें तेज हरण करणारा **पद्मनयनेचा** मुखचंद्रमा भासला. त्या महालास लाविलेल्या भरजरी पडद्यांची झकाकी, शेंकडों रत्नांची व दीपांची लखाकी, आणि त्या

दंपत्याच्या अंगावरील दागिन्यांची चकाकी, त्या उभयतांच्या मुख-प्रभांनीं फिकी करून टाकिली.

असो. पद्मनयना महालांत येऊन दार बंद होण्याबरोबर, पुष्प-शीलानें तिचा हात धरून तीस पलंगावर बसविलें; नंतर जिव्हेस अमृताप्रमाणें रुचि देणारीं कांहीं सरबतें त्यांनीं प्राशिलीं व क्षित्र-यांच्या चालीप्रमाणें कामोद्दीपक पदार्थ सेवन केले. याप्रमाणें शब्द, रूप, रस आणि गंध या चार इंद्रियांच्या ओतप्रोत सुखनिर्भरांत त्या उभयतांचा आत्मा एकसमयावच्छेदेंकरून आनंदयुक्त झाला असतां, अवशिष्ट राहिलेलें जें पंचम स्पर्शसुख त्यानें तर कमाल करून सो-डली ! त्या अप्रतिम मदनमंजिरीस मन्मथप्रकामोद्भव कुसुमशीलानें आलिंगन देण्याबरोबर, त्रिनयन नयनानें दग्ध होऊन तनुहीन झाले-ला जो मीनकेतन तो त्या नवयौवनान्वित निधानद्वयाचें प्रेमालिंगन अवलोकन करून आनंदयुक्त नर्तन करूं लागला. नंतर सुंदर अ-रविंदकोशांतील मकरंद जसा मिलिंद पान करितो, तद्वत् त्या इंदु-वदनेच्या कुंदरदनयुक्त मंद मंद हास्यमुखाचें चुंबन शांत मनेंकरून करिता झाला.

साक्या.

राग जोगी, ताल धुमाळी.

॥ कुरंगलोचन सदंगभूषण अनगरंगित बाला ॥
॥ स्वकरभुजंगें मदनतरंगें चंदन वेष्टि सुभाला ॥
॥ आलिंगन दिधलें ॥ एकचि देहद्वय झालें ॥ १ ॥
॥ वीणावाणी भुजंगवेणी राणी पंकजनयनी ॥
॥ दिवि इंद्राणीसम ती रमणी तरुणी सुकंजपाणी ॥
॥ तनमन सम देहीं ॥ पतिसम समरस ती होई ॥ २ ॥

पद. ( राग आनंदभैरवी. ताल दीपचंदी. )

चाल—"काय परम रमणीय सर्वांचे" संगीत शाकुंतलांतील.

॥ कंजवदन[1] मनरंजन पावे, स्वंजनसन्नयनीं[2] ॥
॥ दंगमनीं अतिरंग उडाला, गुंगकरी रमवी ॥

---

१ पुष्पशीलाचें विशेषण. २ उत्तम कज्जलयुक्त जीं सुंदर नयनें तींहींकरून. ३ सुंदर.

॥ चंगंमृतनुरति व्यंग दिसे निज अंग तदा लपवी ॥
॥ पंकज कररुचि अंकविराजित. कंकण युतवसनी ॥१॥

होरी. ( राग काफी. ताल दीपचंदी. )

॥पतिसह वरतनु रमली ॥ सुवेली सुखकेली अलबेली बनली॥धृ०॥
॥हिमकरशीतल पदकरचाला ॥ रतिसम अनगत रतली ॥
॥ सुवेली सुखकेली० ॥१॥

याप्रमाणें अत्युत्कट सुखविहारांत पुष्पशील अगदीं निमग्न होऊन गेला. केतकीच्या सुगंध गंधास जसा भुजंग मोहित होऊन गुंग होतो, तसा पुष्पशील त्या कुरंगनयनीनें मदरंगकरून दंग आला. सुपक्व सुरसास्तव षट्पदांची उडी सुंदर तामरसीं पडून सर्व रस सेवन करितात, त्यासारखा त्या भ्रमरद्वयानें परस्परांच्या मुखसारसांतील सुधासम सुरससार अगदीं शोषून घेतला. तथापि स्वांत समाधान होईना. सबब. पुनः पुनः परम प्रीतीनें परस्परांस प्रेमालिंगनें देऊन सकाम प्रमोदासक्त पावले. मस्त हस्ती हस्तिनीशीं त्रस्त न होतां क्रीडा करितो. त्याप्रमाणें पुष्पशील. रतीस्त निरंतर निद्रिस्थ राहून स्वस्थपणें रमत होता. जसा निशाकर आपली प्रिया जी रजनी तीस शरदृतूच्या विशाल रात्रीतराळीं अंतरामध्यें धरून रममाण होतो त्याप्रमाणें नूतन ऋतुमती आणि रुचिर रतिसुखानिर्भर देणारी जी रूपवती रमणी. तिजला सहवासांत घेऊन पुष्पशील विषयोपभोगांत गर्क झाला असतां. बाहेर अर्कोदय केव्हां झाला याचाही तर्क त्याच्या मनांत आला नाहीं.

त्या उभयतांस ती सर्व रात्र निमिषवत भासली. निद्रा कोठें गेली! काल किती क्रमिला गेला! आणि सूर्योदय केव्हां झाला! याचें भान त्यांस राहिलें नाहीं. सृष्टींतील सर्वोत्कृष्ट सर्व प्रकारचें ऐश्वर्य असून रतिसुखाचीही परमावधि आल्यावर. मनुष्याचे सर्व मनोरथ परिपूर्ण होऊन त्याचें चित्त स्थिर होतें. जे महान योगी सर्वेन्द्रियांनीं तृप्त होऊन परमेश्वर स्वरूपाचें निरंतर ध्यान करितात. त्यांचें मन जसें कल्पनारहित, शांत आणि सुस्थिर होतें. त्याप्रमाणें त्या रात्रीस दं-

१ सुरत

पत्याची वृत्ति अति समाधानाप्रत पावली. अशा समयीं जगताचें हित करणें इतकेंच काय तें कर्तव्य राहत असतें.

असो, दिवस उगवल्यावर उभयतांस जोड्यानें न्हाऊं घालण्याचा समारंभ झाला. नंतर मित्रमंडळीसह फराळ व भोजनें होऊन नृत्यगायन झालें. याशिवाय पायघड्या, दारूकाम, व सुस्वर वाजत्रीं, आणि अलगुजें, व इंग्लिश वाद्यें यांच्या हजिऱ्या वारंवार होऊन मनास मोठा आनंद प्राप्त होऊं लागला. इतकेही लग्नसोहळे चालले असत, तथापि पद्मनयना व पुष्पशील यांस ते फिके वाटून, जलदसमुदायाचें सुखदर्शन होण्यास जसा मयूर तिष्ठत असतो किंवा चकोर पक्षी इष्ट जें चंद्रदर्शन त्याकरितां कष्टत असतो त्याप्रमाणें रजनी प्राप्त होऊन प्रीतिसुखाचा सुरस केव्हां प्राप्त होईल म्हणून तीं उभयतां अगदीं उत्कंठित होत असत. रात्रीं एकत्र आलीं ह्मणजे पुनः अवीट प्रेमालिंगनरस रजनीभर सेवन करीत. तथापि पुनरपि अधिकाधिक रतिसुखाची गोडी उत्पन्न होऊन नित्य नूतन प्रसंगच आहे काय? असा भास होई.

याप्रमाणें आठ दिवसपर्यंत अति आनंदभरांत दिवस गेल्यावर एके दिवशीं संध्याकाळचे पांच वाजण्याचा समय झाला होता, त्या वेळेस पद्मनयनेस करमेनासें झालें. तेव्हां ती आपल्या दासीस ह्मणाली, "सुमध्यमे, आतां आपण संध्याकाळपर्यंत काय करावें बरें? हा राहिलेला वेळ लवकर जाण्यास कांहीं चांगली युक्ति काढ पाहूं." दासी ह्मणाली, "बाईसाहेब, आपण नित्याप्रमाणें बागेंत हवा खाण्यास जाऊं चला, ह्मणजे तेथें नानातऱ्हेच्या पदार्थांच्या अवलोकन करण्याच्या नादांत वेळ लवकर जाईल." ती गोष्ट पद्मनयनेस पसंत वाटून, दुसऱ्या सख्या त्या समयीं जवळ नव्हत्या, ह्मणून त्या दोघीच बागेंत गेल्या. नंतर पद्मनयना दासीस ह्मणते, "सुमध्यमे, माझे प्राणनाथ केवळ अमृताचा कलशच आहेत. त्यावर उत्तम प्रकारचें अमृत अशीं स्पष्ट अक्षरें लिहिलीं आहेत. तसा स्वर्गीही दुर्मिळ आहे. तो पुष्कळांनीं अवलोकन केला, परंतु कोणासही प्राप्त झाला नाहीं. तो कलश परमेश्वर कृपेनें माझे स्वाधीन झाला आहे. त्यांतील अमृतानें सेवन करण्यास मला पूर्ण अधिकार मिळाला आहे. पहा,

केवढें भाग्य माझें ! परंतु सुमध्यमे, ते आज माझे महालांत आले ह्मणजे त्यांशीं काय बोलावें ग ? मला वाटतें त्यांचा स्वभाव फार थट्टेखोर आहे, याकरितां मी पहिल्यानें कांहीं निमित्यानें रुसेन, आणि खालीं मान घालीन. नंतर पुनः हळूच वर पाहून किंचित् हास्य दाखवून पुनः तोंड चुकवीन. असें केल्यावर ते माझ्या गळ्यांत हात घालून ' प्राणप्रिये कां रुसलीस, ह्मणून मोठ्या प्रेमानें पुसतील नाहीं बरें ? " ( इतक्यांत चकित होऊन. ) " सुमध्यमे, कोणी रडत आहेसें मला वाटतें. " दासी ह्मणाली :—

" बाईसाहेब, या समयीं जिकडे तिकडे आनंद चालला असतां कोण रडणार आहे ? पहा, सर्व शहरांत मंगलवाद्यें वाजत आहेत; अतिथी तृप्त होऊन आशीर्वाद देताहेत; जागोजागीं नृत्यगायनें चा ललीं आहेत; या बागमध्यें कारंज्यास सहस्रधारी तोट्या लाविल्या आहेत, तेणेंकरून पर्जन्यवृष्टीसारखा आवाज होत आहे; सायंकाळचा समय झाला आहे ह्मणून पक्षी आपआपल्या घरट्यांत जाण्याकरितां शब्द करीत आहेत; पुष्पांतील मकरंद सेवन करून तृप्त पावलेले भ्रमर आनंदानें गुंजारव करीत आहेत; जाई, जुई, मोगरा, शेवंती इत्यादि पुष्पें प्रफुल्लित होऊं लागलीं आहेत; व त्यांवरून सुगंध मंद वायूसीं झुळुक खिडकीवाटे महालांत जात असल्या कारणानें एकसा रखा मंजूळ ध्वनि निघत आहे; मोर नृत्य करिताहेत; त्यांचे पायांतील वाळ्यांचाही मंद ध्वनि परिश्रुत होत आहे; राजहंस पक्षी आपल्या स्त्रियांसह आनंदानें क्रीडत असतां कुलकुल शब्द करीत आहेत; इत्यादि कारणांनीं आपणास रडनाचा भास आला असेल. " ( दोघी कान देऊन ऐकतात. ) " सुमध्यमे, ऐकलेंना आतां ? " दासी ह्मणते, " बाईसाहेब, हा ध्वनि दक्षिण दिशेकडून येत आहे. चला आपण तिकडे जाऊं. " असें ह्मणून दोघी चालूं लागतात. " आतां तर अ-गदीं स्पष्ट समजलें ना ? "

नंतर त्या दोघी बागेच्या दक्षिण भिंतीपाशीं आल्या, त्या वेळेस कोणी स्त्री मोठ्यानें शोक करीत आहे असें त्यांस वाटलें. बागेतील मनोरंजक शोभा अवलोकन करून पद्मनयनेच्या प्रसन्न झालेल्या कोमल अंतःकरणांत तो शोक ऐकून दया उत्पन्न झाली. त्या वेळेस

ही कोण आहे वगैरे पाहावें ह्मणून त्या दोघी मागील दरवाज्यावरील बंगल्यांत जाऊन खिडकींतून खालीं पाहूं लागल्या, तों कोणी अतिशय वृद्ध ह्मातारी मोठ्यानें शोक करीत आहे, व वक्षस्थळ बडवीत आहे, आणि अगदीं अव्यवस्थित पडून दुःखानें विव्हळ झाली आहे असें दिसलें. पद्मनयनेनें तीस हांक मारली आणि विचारलें, " बाई, तुह्मी कां येथें शोक करीत बसलां आहां ? " तिनें उत्तर केलें, " बाईसाहेब, काय सांगू. मला जें दुःख आलें आहे तसें त्रिभुवनांत कोणासही आलें नसेल. " पद्मनयना ह्मणाली. " तुमचें दुःख सांगा पाहूं बरें? मजकडून निवारण्यासारखें असल्यास मी यत्न करीन. " तें ऐकून बाई आनंद पावून ह्मणाली. " बाईसाहेब, काय सांगू. माझी सून आज तीन रोज आलें प्रसूतिवेदनेनें पिडली आहे; तिच्या दोहों जीवांचा उलगडा कोणाच्यानें होत नाहीं. आतां लवकरच ती प्राण सोडील ! ( रडूं लागते. ) माझा रांडेमुंडेचा एकुलता एक मुलगा होता त्याला मरून आज सहा महिने झाले ! परंतु ही सून त्यामागें माझें ह्मातारीचें पोषण. मोलमजुरी करून करीत होती, तीही कशी चालली ! ! हाय हाय ! देवा. आतां मी काय करूं ! ! ! "

असा तिचा शोक ऐकून पद्मनयना ह्मणाली, " गरीब ह्मातारे,मी या गोष्टीस काय करूं बरें. ही गोष्ट ईश्वराधीन आहे.मजकडून कांहीं होण्यासारखें असल्यास सांग. मी करावयास सिद्ध आहे. " ह्मातारी बोलली. " बाईसाहेब. तुमच्या हातून होण्यासारखें आहे ह्मणूनच आपल्या बागेच्या मागें मी शोक करीत बसलें आहें. अशाकरितां कीं, आपण कदाचित बागेंत आल्यास माझा शोक ऐकून मला साहाय्य कराल. " पद्मनयना ह्मणाली. " बोल तर, मी काय करूं ! लवकर बोल. " " बाईसाहेब. एका अवलियानें मला सांगितलें आहे कीं, राजकन्येच्या हातानें अकबरी मोहोरेचें पाणी माझ्या सुनेस पाजिलें असतां ती तात्काळ मोकळी होईल. याकरितां राजकन्या आपण अहां, आणि अकबरी मोहोरही आपल्याजवळ सांपडण्यास अडचण नाहीं; याकरितां देवावर विश्वास ठेवून मोठ्या आशेनें मी येथें येऊन रडत बसलें आहें. आपल्यासारख्या परोपकारी आणि दयाळु मनुष्याची भेट झाली. आतां माझी सून खचित मरणार नाहीं. माझें भरंही

अगदीं जवळ आहे. आपल्या लग्नमहोत्सवामुळें सर्व शहर आनंदयुक्त आहे. आणि ह्या ह्मातारीनें मात्र दुःखार्णवांत बुडावें असें आपणास उचित दिसल्यास मग सर्व उपाय खुंटले असें होईल."

या प्रकारें ती ह्मातारी बोलतांच **पद्मनयनेचें** अंतःकरण कळवळलें! तिच्या दासीच्या बोटांत मोहोरेची अंगठी होतीच. याकरितां तीस वाटलें कीं, आपण असेंच या गरीब बिचाऱ्या ह्मातारीच्या घरीं जाऊन ही ह्मणते त्याप्रमाणें उदक इच्या सुनेस पाजावें. असा विचार करून खालीं उतरून तिणें बागेचा मागील दरवाजा उघडला, आणि दासीसहवर्तमान त्या म्हातारीच्याबरोबर जाण्यास सिद्ध झाली. **पद्मनयना** आपल्याबरोबर येते असें म्हातारीस कळतांच ती अतिनम्रतेनें आभार मानून पुढें चालूं लागली. व **पद्मनयना** आणि तिची दासी अशा तिच्यामागें चालल्या. म्हातारीनें त्यांस आडमार्गानें गांवाच्या अखेरीस एका बोळांत नेऊन, नंतर अटकून, एक अति टेंगणें दार होतें त्या वाटें ती आंत शिरली. **पद्मनयना**, ती अनाथ स्त्री कोणत्या स्थितींत असेल, व माझ्या हातास यश येऊन ती वांचेल कीं नाहीं, इत्यादि विचारांत अगदीं निमग्न होऊन गेली होती. ती इकडे तिकडे न पाहतां म्हातारीच्या मागें मोठ्या जलदीनें चालली होती, यामुळें तिची दासी पुष्कळ अंतरावर आहे तोंच **पद्मनयना** म्हातारीच्यामागें त्या घरांत शिरली. मागाहून दासी आंत जाऊं लागली, इतक्यांत तेथें दडून बसलेल्या एका दुष्टानें बाहेर निघून तरवारीनें त्या अनाथ दासीचीं रस्त्यांतच दोन खांडोळीं करून टाकिलीं, आणि आंतल्या बाजूस एक मुद्दाम खणून ठेविलेली खांच होती तींत तिला नेऊन पुरून टाकिलें. ही गोष्ट **पद्मनयनेस** मुळींच कळली नाहीं. म्हातारीनें **पद्मनयनेस** त्या घराच्या मागीलदारीं एक अंधारांत खोली होती तींत नेलें आणि आपण अटकून बाहेर येऊन खोलीचें दार लावून घेतलें आणि त्यास बाहेरून कडी घातली, व **पद्मनयनेस** आंत कोंडून टाकिलें.

पूर्वीं अजी कुटणी ह्मणून वर्णिली आहे तीच ही ह्मातारी होय. ती महाप्रतापी व पैसेवाली असे. विचित्रपुरींतील सर्व सरकारी कामदार इचे दबेल असत. इला जन्मपर्यंत काळ्यापाण्याची शिक्षा झाल्यावर

तेथूनही ही मोठ्या युक्तीनें पुष्कळ लांच देऊन पळाली. नंतर इनें आपलें स्वरूप बदललें व आपलें नांव मरी असें प्रसिद्ध केलें. पुढें ती विचित्रपुरीच्या राज्यमर्यादेंत अरण्यांत झोंपडी करून बाकी राहिलेल्या चोरांच्या आश्रयानें राहिली होती. **पद्मनयनेस** पळवून न्यावें असें देवीचें स्वप्न पडल्यावर चोरांनीं इचा विचार घेतला, तेव्हां इणें त्या गोष्टीची हमी पतकरून अशा रीतीनें **पद्मनयनेस** अडकवून ठेवून चोरांस पुढची व्यवस्था सांगून ती आपल्या स्थानीं निघून गेली.

---

# भाग ११.

॥ साकी ॥

( राग झोंगी, ताल धुमाळी. )

॥ पंकजनयना दुःखें व्यापुनि त्यागिल हो निज काया ॥
॥ कनवाळू प्रभु सर्व जगाचा अपूर्व दाविल माया ॥
॥ संकट ओढवलें ॥ भूपति ततयेवर आलें. ॥

## वियोग.

---

कामाजी रामोशी—रघुदा, चल गड्या. साता चांन्याच खाटलं दिसूं लागल्या.

राघोजी—( डोळे चोळीत उठून. ) अरं काय म्हणतूस काई ?

का०—उठ बेगी मर्दा, आपलं काम करायाचं न्हाईका ?

रा०—पन गड्या, मला धडगत दिसना. समद्या गांवामंधी मानसं मशाली घेऊन घेऊन हुडकीत हायती. आनी अशा वक्तीं आपण तिला घेऊन चाललु आनी कुणी वळकालं तर मंग ?

का०—अरं तूं लई भेकाड हायस; त्याकरितां म्यां लई नामी हिकमत काढली हाय की पसंत न्हं.

रा०—( मोठ्या उत्सुकतेनं. ) अरं काय सांगत हें तरी काय ? जरा कळू तर दे.

का०—अरं उठ बेगी राव, मंग समद आपच कळलं.

रा०—हं बिल्या; पन जरा बोल मर्दा.

का०—( हळूच त्याच्या कानाशीं. ) अरं बिल्या आपण किनी तिला बळच योका शिडीवर निजवूं या; आनी मंग तोंडामंदी बोळा देऊनशानी शिडीशीं जखडूं या. मंगशानी त्यावर पांघरून घालूनशानी मुर्द्यावानी तूं न मी घेऊनशानि जाऊं या.

रा०—( हर्षानें. ) हाय गड्या; भली हिकमत ! आनी कुनी हटकलं तर आमची म्हातारी मेली हे नी तिला मुठमाती द्यायला नेतूं

म्हुन सांगू. वा राव ! लई नामी हिकमत ! ( दोघे टाळ्या पिटून हंसतात. )

**का०**—पन गड्या, त्या कुनबिनीचं काय केलं?

**रा०**—अर काय केलं म्हून काय पुसतुसया ! मग मायन पद्मनेला आंतमंदी नेलं नि मीं तलवारीन तिच कुटक गलीमंधीच उडवल.

**का०**—(आश्चर्यानें.) हे बिल्या, नि कुनी गलीमंधी बगितलं न्हाई कायरं?

**रा०**—त्या गलीमंधी कोन येऊन बसलाय राव! नी मी ही बिगी बिगी ते समद कुटक जमा करूनशेनी नायकाच्या दगड्यान योक खास खनिवल्ली होती तीमंधी पुरून टाकल नि मागमूस बिगडून दिला.

**का०**—अर वा! भली गम्मत केलीस मर्दा! अर पन त्या कुनबिनीच डागिन कुठ हायती?

**रा०**—अर ते समद हायती; चला राव आतां देवीचा भकस तिला अगुदर देऊं. नी मग समद्यान हिस्स पाडूं.

**का०**—वर पन मरी माय हाय कुठ?आपन गेलं नि तिला कुणी पकडल तर मंग—

**रा०**—अर ती लई वस्ताद हे राव! राजाच्या पोरगीला कोठडीमंधी कोंडूनशेनी राती काहुरमंदीच जी निसटली ती हे,काळटेकडीमंधी दाखल !

**का०**—शाबास! समद्या गांवच मुडास कापून मारूनशेनी आपल्यावरती तिची हीतभर कमान वरच हाय राव! ( हंसतात. )

**रा०**—वर पन, आतां हा गोऱ्या कातड्याच्या पोरगीस कुठ न्यायचर ?

**का०**—( सुस्कारा टाकून. ) कदेवा माय तर सोद्यांनीं उपडलीया ! आतां काय, सदेवा मायकड नऊं चला.

असे बोलून ते दोघे नागव्या तरवारी हातांत घेऊन त्याच रात्रीं सुमारें अक्रा वाजण्याच्या वेळेस **पद्मनयने**ला ज्या खोलींत कोंडलें होतें तेथें आले आणि मसलत केल्याप्रमाणें त्यांनीं त्या अनाथ **पद्मनयने**च्या तोंडांत बोळा घातला, आणि तीस शिडीवर निजवून मुरद्याप्रमाणें बांधून टाकलें. नंतर खांद्यावर घेऊन तिला गांवाबाहेर आडवाटेनें ने-

ले. त्या वेळेस दोनचार शिपायांस व राजाच्या सरदारांस हे भेटले, परंतु त्यांनीं म्हातारीचा मुर्दा आहे असें सांगितल्यावर कोणी जास्त पुसतपास केली नाहीं. याप्रमाणें ते गांवाबाहेर पडतांच रातोरात पद्मनयनेस घेऊन मोठ्या त्वरेनें चालते आले.

इकडे राजवाड्यामध्यें संध्याकाळचे वेळेस दीपोत्सव केला आहे, वाद्यांचा व नृत्यगायनांचा एकच गोंगाट झाला आहे; सर्व मंडपास व दरवाज्यांस सुवासिक पुष्पांचे हार बांधले आहेत; सुगंधी अत्तरांचे दिवे लाविले आहेत; पुष्पशीलानें सरजरी पोषाख करून उत्तम अलंकार धारण केले आहेत; चार वाजल्यापासून आज सूर्य क्षितिजाखालीं कां लवकर जात नाहीं म्हणून तो क्षणोक्षणीं त्याकडे पाहत आहे; सूर्यास्त होतांच रात्रीं प्राप्त होणाऱ्या सुखाची मनांत कल्पना येऊन त्यास अत्यंत आनंद झाला आहे; आजचा दिवस मला कां बरें इतका मोठा भासतो? म्हणून आपले मनाशीं विचारीत आहे; आणि रात्रीचे दहा वाजून प्राणप्रियेची आणि माझी एकांतीं गांठ पडण्याचा समय केव्हां येईल, म्हणून अतिशय उतावळा व उत्कंठित झाला आहे; इतक्यांत पद्मनयना नाहींशी झाली असे विपरीत शब्द त्याच्या कानीं पडले. त्या वेळेस त्यास असा संताप आला कीं, ज्या मनुष्यानें ही खबर सांगितली त्याचा शिरच्छेद करावा. नंतर वाऱ्याच्या धावऱ्या उठून पद्मनयनेच्या महालाकडे गेला. तेथें तिचा बाप आणि दुसरीं पुष्कळ मनुष्यें, पद्मनयना होती केव्हां, नव्हती केव्हां याचा विचार मोठ्या दुःखानें करीत होतीं. तेथें कोणी शंका काढिली कीं, तीस पुष्पशीलाचें फार वेड लागलें आहे याकरितां ती दोघे कोठें तरी घरांत अथवा बागेंत एकांतांत असतील. ती गोष्ट सर्वांस खरी वाटून ते किंचित् शांत होतात, इतक्यांत पुष्पशील तेथें येऊन पोहोंचला. त्याला पाहतांच ते सर्व एकदम बोलले, "अहो, पद्मनयना कोठें आहे?" तो म्हणाला, "मीही येथें शोध काढण्यासच आलों आहें." असें म्हणतांक्षणीं पद्मनयनेच्या बापास रडें कोसळलें. त्या वेळेस पुष्पशीलाचाही कंठ भरून आला. परंतु तो बाह्यात्कारें म्हणाला, "तुम्ही भिऊं नका, ती कोठेंही गेली असली तरी सर्व गांव शोधून तिला घेऊन येऊं. ती बहुधा हवा खाण्यास अगर दुसरे कोठें

देवदर्शनास गेली असेल. घटका दोन घटकांनीं शोध लागेल; तुम्ही शांत व्हा; धैर्य सोडूं नका. चोहोंकडे चौंचे पहावयास लागा म्हणजे कोठें तरी शोध लागेल."

याप्रमाणें **पुष्पशील** बोलल्यावर सर्व लोक शोध करावयास गेले. त्यानेंही बरोबर एक मशाल घेऊन तिच्या दुसऱ्या दासी व मैत्रिणी होत्या त्यांजकडे जाऊन विचारपूस केली. त्यांनीं सांगितलें कीं, **पद्मनयना** आणि **सुमध्यमा** अशा दोघी पांच वाजतां बागेंत हवा खाण्यास गेल्या होत्या. परंतु तेथें गेल्यावर काय झालें हें आम्हांस ठाऊक नाहीं. इतकें ऐकतांच **पुष्पशील** दोन शिपाई बरोबर घेऊन बागेंत गेला, आणि सर्व बाग शोधून मागील दरवाजापाशीं आला. नंतर बारकाईनें पाहूं लागला तों, दरवाज्याला कडी वगैरे कांहीं नसून तो नुसता ओढून घेतला आहे असें दिसलें. त्या ह्या दारावाटे बाहेर गेल्या असतील अशी कल्पना करून तो बाहेर पडला. आणि त्यानें आसपासचीं घरें शोधण्यास आरंभ केला. प्रधान, प्रतिनिधि वगैरे सर्व सरदार व अधिकारी शोध करूं लागले. त्यांनीं जरी मशाली लाविल्या होत्या तथापि अंधाऱ्या रात्रीमुळें त्यांस बरोबर दिसेना. सर्व लोक अतिशय आनंदांत निमग्न असतां एकाएकीं हें वर्तमान गांवांत पसरतांच सर्व लोक हळहळूं लागले, व चोहोंकडे शोध करूं लागले. देवळें, राउळें, विहिरी, आड, व तलाव सर्व शोधिले, परंतु व्यर्थ. **पुष्पशील** तर प्रत्येक घराचा झाडा घेऊं लागला. तो तास दीड तास शोध करी आणि कोणास तरी **पद्मनयना** सांपडली असेल अशी कल्पना करून मोठ्या उत्कंठेनें तिच्या महालाकडे येई; आणि अद्याप ती सांपडली नाहीं अशीं तिच्या दासींचीं भाषणें ऐकून निराश होऊन पुनः शोध करावयास जाई.

या रीतीनें सर्व रात्र गोंधळांत गेल्यावर प्रातःकाळ होतां बरोबर घरांतील सर्व मनुष्यें मोठ्यानें शोक करूं लागलीं. **पद्मनयनेचा** कोणी तरी घात केला अशी सर्वांची खात्री झाली. **पुष्पशीलासही** अत्यंत दुःखाचा उद्गार आला. तो त्यास आंवरून धरी परंतु राहिना. त्यास वाटलें कीं, कोठें तरी जाऊन एकांतांत मोठ्यानें रुदन तरी करावें. नंतर किंचित् विवेक करून "उ-

दोगावांतून प्रारब्ध लगटें " ह्या ह्मणीची आठवण त्यास आली, आणि पुनः त्या बागेमध्यें आला. इकडे तिकडे पाही परंतु कांहीं सुचेनासें होई. मी करितों काय यांचीही त्यास भ्रांति पडे. तो पुन्हा मागील दारानें बाहेर पडला आणि वेड्यासारखा भलत्यासच माझी पद्मनयना पाहिली काय ? ह्मणून विचारूं लागला. असें करितां करितां एका ह्मातान्यानें सांगितलें की, काल मध्याह्नकाळचे वेळेस पद्मनयना व एक दासी अशा दोघीजणी एका ह्मातारीच्या मागें या वाटेनें गेल्या. हें त्याचें भाषण ऐकतांच पुष्पशीलास आनंद वाटून तो त्या मनुष्यास उत्तेजन देऊन त्या कोणीकडे गेल्या हें मला दाखीव असें ह्मणाला. तो बरें ह्मणून ह्मातारी गेली होती त्या मार्गानें जाऊं लागला व पुष्पशील कांहीं शिपायांसहवर्तमान त्याचे मागें चालला. जातां जातां तो ह्मातारीच्या घराच्या दारापाशीं आला. इतक्यांत पुष्पशीलानें बारीक नजर करून पाहिलें तों त्या ठिकाणीं रक्त सांडलेलें आहे असें त्यास दिसलें. त्याच्या स्थितीवरून व जमीनीच्या शोषक शक्तीवरून त्यानें हें काल पांच वाजतांचे सुमारास सांडलें असावें असें सिद्ध केलें. नंतर त्या ह्मातारीच्या घरांत सूक्ष्म दृष्टीनें शोध करितां नुकतीच बुजलेली खांच त्याच्या दृष्टीस पडली. तीवरून त्याच्या मनांत सहाजिक संशय येऊन त्यानें शिपायांकडून ती उकरविली. ती उकरतांच जेव्हां पद्मनयनेच्या दासीचे अवयव अलंकार काढून घेतलेले दृष्टीस पडले, तेव्हां पद्मनयनेचीही अशीच अवस्था आली असेल अशी कल्पना करून तो मोठ्यानें शोक करूं लागला.

हें वर्तमान राजास व लोकांस समजल्याबरोबर ते सर्व एकदम धांवत त्या स्थळीं आले. मग काय विचारावयाचें आहे ! एकच हाहाःकार होऊन गेला. पद्मनयनेच्या बापानें धाडकन जमीनीवर अंग टाकिलें, आणि शोकास आरंभ केला. दुसऱ्या सर्वांचेही डोळ्यांतून अश्रुपात वाहूं लागले. नंतर कांहीं वेळानें सर्वांनीं राजाचें व पुष्पशीलाचें सान्त्वन केलें कीं, महाराज, दासीची अशी अवस्था आली ह्मणून पद्मनयनेची अशीच आली असेल असें ह्मणवत नाहीं; ईश्वरी लीला विचित्र आहे. तुह्मी असाच बारकाईनें शोध करावा ह्मणजे

खरें काय असेल तें कळेल. अगोदर विनाकारण फार शोक करूं नका. असें सान्त्वन झाल्यावर पुष्पशीलानें त्या घराचा व ह्मातारीचा शोध चालविला. तें घर ओसाड होतें व त्याच्या वारसदाराची नक्कल झाली होती, यामुळें घराच्या संबंधानें कोणास पकडतां येईना. नंतर आसपासच्या कांहीं लोकांस धरिलें; परंतु आह्मांस कांहीं माहित नाहीं ह्मणून त्यांनीं कानांवर हात ठेविले. मग तेथून कांहीं अंतरावर रामोशांचीं घरें होतीं त्यांमध्यें मोठा मनुष्य तर कोणीं नव्हताच, परंतु कांहीं बायकापोरें होतीं, त्यांस धरून विचारिलें. त्यांनीं शुद्ध नन्नाचा पाढा वाचण्यास आरंभ केला. प्रत्यंतर व साक्षीपुराव्यावरून, यांस ही गोष्ट माहित असणें अगदीं जरूर आहे असें सिद्ध होई; परंतु त्यांच्या मुखावाटे नकाराशिवाय शब्दच निघेना. पुष्पशीलानें त्यांस अभिवचनें दिलीं, इनाम देऊं केलें, शेवटीं धमक्या दिल्या आणि शिक्षाही दिल्या, परंतु ते खरें सांगेनात. आखेरीस अत्यंत त्रास पावून त्यांतल्या बहुतेकांस फांशीं दिलें, व बाकीचे जे अगदीं निरपराधी दिसले त्यांस सोडिलें.

त्यांच्या साधारण बोलण्याच्या, हकीकतीच्या, आणि दुसऱ्या अनेक गोष्टींच्या धोरणानें पुष्पशीलानें अनुमान केलें कीं, तिला कोणीतरी सोद्यानें अगर चोरानें पळवून नेलें असावें. नंतर तो राजवाड्यांत येऊन गुंग बसला. मनोहर पंडित व श्यामसुंदर हेही शोध करून करून निराश होऊन चिंताक्रांत होत्साते पुष्पशीला शेजारीं येऊन बसले. त्या वेळेस ते तिघे पुढें काय तजवीज करावी ह्मणून विचार करूं लागले. त्यांनीं असें ठरविलें कीं, पद्मनयना कांहीं या गांवांत आतां राहिली नाहीं, याकरितां आपण तिघांनीं तीन दिशांकडे तिच्या शोधार्थ फिरावें. असा निश्चय ठरवून त्यांणीं तें वर्तमान राजास कळविलें. तो ह्मणाला, " पुष्पशीलमहाराज, तुह्मी जाऊं नका. पद्मनयना हरवली आहे, तथापि तुमचे मुखाकडे पाहून मीं आपला प्राण ठेविला आहे. आतां मला पुत्रही तुम्ही व कन्याही तुम्हीच आहां. तुम्ही दूर गेलां म्हणजे मी आपला प्राण ठेवणार नाहीं. " असें राजाचें भाषण ऐकून श्यामसुंदर व मनोहर पंडित म्हणाले, " कांहीं चिंता नाहीं, आम्ही दोघेच जाऊन तिचा शोध क-

रून घेऊन येतों." हें उभयतांचें बोलणें ऐकून **पुष्पशीलास धैर्यशीलाची** आठवण आली. तो म्हणाला, "माझा पुरुषसिंह **धैर्यशील** जर या समयास असता, तर **पद्मनयनेचा** शोध त्यानें तेव्हांच लाविला असता. असो. मित्रहो, कदाचित **पद्मनयनेचा** शोध न लागल्यास **धैर्यशीलाचा** तरी शोध लावा. त्याचा शोध लागला म्हणजे **पद्मनयना** सांपडण्याची शंका नको." याप्रमाणें बोलणें झाल्यावर लागलेंच दुसरे दिवशीं **मनोहर** पंडित व **श्यामसुंदर** पुष्कळ द्रव्य खर्चावयास घेऊन व एक घोडा घेऊन **पद्मनयनेचा** व **धैर्यशीलाचा** शोध लावण्यासाठीं निघाले; व **पुष्पशील** विचित्रपुरींत राजाजवळ राहिला.

इकडे चोरांनीं जें **पद्मनयनेस** रातोरात गांवांतून पळवून नेलें, तें आडमार्गानें विचित्रपुरीपासून सुमारें पंधरा कोसांवर डोंगरांत एक देवी होती तिजपाशीं आणिलें. नंतर त्यांनीं तिला त्या शिडीपासून मुक्त करून तिच्या तोंडांतील बोळा काढिला. तें स्थळ अगदीं डोंगराच्या खोऱ्यांत असून चोहोंकडे त्यास उंच उंच पर्वतांचें वेष्टन होतें. त्या खोऱ्यांत बोरीचीं, बाभळीचीं, व हिवराचीं कांटेरी झाडें एकास एक लागून मोठें भयंकर जंगल झालें होतें. डोंगरावरून जागोजाग करवंदीच्या जाळ्या, व सावर निवडुंगाचे मोठमोठे समुदाय होते. त्यांतून एकसारख्या स्वरानें किर्रर्र असा शब्द करणारे असंख्य किडे रात्रंदिवस ओरडत असत. त्याचा त्या डोंगराच्या संबंधानें प्रतिध्वनि निघून जीवास भीति उत्पन्न करणारा एकच गोंगाट होत असे. एके ठिकाणीं चार पांच बोरीचीं झाडें एकत्र होतीं. त्यांच्याखालीं एका मोठ्या धोंड्यास शेंदूर लावून ती देवी कल्पिली होती. तिच्या सभोंवतींही लहान लहान अनेक दगड शेंदूर माखून बसविले होते. आसपासच्या बोरीच्या झाडांवर शेंदराचे पंजे मारिले होते. देवीच्या डोक्यावर कांटेरी झाडांस अडकविलेल्या पुष्कळ चिंध्या लोंबत होत्या, व उंच एका झाडाच्या खांदीवर एक खारव्याच्या फडक्याची पताक बांधिली होती. आसपास जमीनीवर बकऱ्यांचीं व दुसऱ्या पशूंचीं हाडें, कातडीं व केंस पडले होते; व कांहीं जमीनीच्या भागावर आणि दगडांवर वाळलेल्या रक्ताचे डाग पडले होते. देवीच्या डोक्यावर अबीर, गुलाल

पुष्कळ होता, व भोंवतालीं कागदाचे तुकडे व डोल्यांतील नाड्यांचे तुकडे पडले होते.

अशा त्या देवीजवळ ते भोळे चोर गेले आणि तीस साष्टांगनमस्कार घालून म्हणाले, " जय सदंबे माय, तूं आमच्या विचित्रपुरींतील कदंबेची धाकटी बहीन हैस. तिणें आह्मास सपन दिल्याव रूनशेनी ही राजाची पोरगी लई खटपटीन पकडूनशेनी आनलीया. कदंबा माय तर सोद्यांनीं उपडलीया म्हुनशेनी हाकड आनली बगा. आतां बोल माई बोल. कदंमा मायन हिला छपवा असं सपन दिलं खरं. पन छपवा आणि आपनच बळी जा कां? व्हय व्हय; पन तें बरं नव्हं. मायग, तूंच आतां हिसनी बळी घे नी आम्हास मोकळ कर बुवा. " असें त्या चोरांचें भाषण ऐकतांच मी येथें कशी आलें व पुढें माझें काय होणार तें सर्व पद्मनयनेच्या लक्ष्यांत आलें. तिनें धाडकन् जमिनीवर अंग टाकिलें, आणि अत्यंत करुणस्वरानें शोक करण्यास आरंभ केला:—

### दिंड्या.

राग लोल्यांबरी, ताल दादरा.

॥ धांव वेगें जगदीश जगन्नाथा ! ॥
॥ ठेवितें मी तव पदीं प्रभो माथा ॥
॥ कोण दुसरा तुजवीण असे त्राता ? ॥
॥ येइं दीना संकटीं सोडिं आतां ॥ १ ॥
॥ करायाला सत्कर्म पहा गेलें ॥
॥ दुःखसागर दुःसहचि हे उदेले ॥
॥ कांत विरहें म्यां स्तवन तुझें केलें ॥
॥ कसें नाहीं हें विघ्न तदां आलें! ॥ २ ॥
॥ मुखीं राही तें ग्रास घालण्याचें ॥
॥ ताट नेशी हिसकून अहा! साचें ॥
॥ काय केलें म्यां पाप असें थोर ? ॥
॥ मला वधिशी त्या गुणें वनीं घोर ॥ ३ ॥
॥ कसें मजला निर्मिलें बळी द्याया ? ॥
॥ दाविला कीं सुखलोभ तो मराया ॥

॥ कडवा ती बहु दुष्ट मंदवाही ॥
॥ भक्षितें ही परि मला प्रभा पाही ! ! ॥ ४ ॥
॥ बहु गुणराशी कांत दिला माला ॥
॥ प्राप्त नाहीं सुखलेश परी झाला ! ॥
॥ बळें होतें रुसणार मी तयाशीं ॥
॥ कसें येथें दे दैव अशी फाशी ! ॥ ५ ॥
॥ पिता मजला पाहील बहु ठायीं ॥
॥ प्राणपतिही शोधील मला बाई ॥
॥ कसा आला धांवुनि अंधकारीं ॥
॥ प्राण आतां सोडील विरह भारीं ॥ ६ ॥
॥ वियोगानें होईल दग्ध देही ॥
॥ महाकोशें पाहील कूप डोहीं ॥
॥ तया नाहीं कळणार वर्तमान ॥
॥ कापिल्याचें काननीं असें पान ! ॥ ७ ॥
॥ पुष्प मानस करपल फुलावाणी ॥
॥ आहा ! नेत्रीं वाहील सदा पाणी ॥
॥ अन्न पाणी सोडील वियोगानें ॥
॥ हृदय कोमल फाटेल रुदनानें ॥ ८ ॥
॥ उदासी तो भटकेल वनीं रानीं ॥
॥ श्रुत न याचा करवेल शोक कानीं !! ॥

पुष्पशील आपल्या आननचंद्रानें तें वारंवार वर्णन करीत असे तें मनांत आणून ह्मणतेः—

॥ चंद्र नाहीं दिसणार चकोराला ॥
॥ तोय नाहीं मिळणार चातकाला ॥ ९ ॥
॥ कमलकोशश्री कोवि रसें बोलें ॥
॥ मंदारें तें साम्य करी डोलें ॥
॥ दृष्टि माझी या बाण कशी वाटे ॥

१ माझा मुखचंद्र. २ माझें प्रेमरूप उदक. ३ कुचरूपमाल्या शोभेस कमलकोशश्री ह्मणजे कमलाच्या कळ्यांच्या शोभेची उपमा देत असे तो. ४ प्रीतीनें. ५ कुचतटमास मंदाचें साम्य असा अर्थ. ६ मदनबाण.

॥ कसें झालें निमिषांत सर्व खोटें ॥ १० ॥
॥ भुजंगांचें तें काय म्हणत नेणें ॥
॥ बाई मयुरोंचें नांव सदा घेणें ॥
॥ पद्म पंकज[3] अरविंद मुखीं राही ॥
॥ हरिण हरिहीं[4] गजराज सदा बाई ॥ ११ ॥
॥ जळो माझें लावण्य हा कपाळा ! ॥
॥ रूप विद्रें तें सुखद विश्वपाळा ॥
॥ होय दुःखद मज सर्व हा पसारा ॥
॥ प्रभो आतां मज देइं पदीं थारा ॥ १२ ॥
॥ बहुत शिणलें मी धांव जगत्पाला ॥
॥ शरण आलें मी तारिं दीनबाला ॥
॥ नको पाहुं मम अंत धांव आतां ॥
॥ पाव नमितें तव चरण कृपावंता ॥ १३ ॥

---

## अंजनी गीत.

राग झिंजोटी, ताल धुमाळी.

॥ माझें वेड तया बहु आहे ॥ क्षणोक्षणीं मज चोरुनि पाहे ॥
॥ सुखाचा त्या लेश लाहे ॥ कैंचा हो आतां ॥ १ ॥
॥ माझी त्याची संगत कांहीं ॥ फार दिवस ती झाली नाहीं ॥
॥ तोंचि विघ्न आलें पाहीं ॥ करुं मी गत कैशी ॥ २ ॥
॥ प्राणनाथ तो माझा बाई ॥ टाहो फोडिल अगे आई ॥
॥ जगज्जननी अंबाबाई ॥ त्याला तूं रक्षी ॥ ३ ॥

---

## पद.

संगीत सौभद्र ना० ( वैशाख मास वासंतिक समय शोभला ) या चालीवर.

॥ मज धांव पाव सोडविं तूं जगत्पालका ॥

---

१ वेणीला भुजंगाची उपमा देत असे तें. २ केशसंभारास मयूरपुच्छाची उपमा देत असे तें. ३ नयनास, हस्तास, पदास ज्या कमलांच्या नांवांनीं उपमा देत असे ते शब्द. ४ नेत्रांस हरिणाची, कटीस हरीची ( सिंहाची ) आणि मंद गमनास गज-राजाची उपमा देत असे ते शब्द.

॥ तुजविण मज कवण असे दीन बालका ॥ मज धां० ॥ध्रु०॥
॥ करूं काय गाय सोडोनियां फिरतसे वनीं ॥
॥ रविकिरण शीण फार करि त्रासलें मनीं ॥
॥ पदिं कंटक ते रुतति येइ कंठ दाटुनी ॥
॥ सोडि सोडि मार्ग दावि मारितें हका॥मज धांव पाव०॥१॥
॥ प्रभु सदय कोवि अदय असा आज जाहला ॥
॥ देण्यास काय भक्ष्य असा देह निर्मिला ॥
॥ मम कांत व्यर्थ शोकसागरांत बुडाला ॥
॥ तारि दीन येइ त्वरित जग त्राल्का॥मजधांवपाव०॥२॥
॥ नृपती हि किति आजवरि मजसि बघाया ॥
॥ निशिदीन असत यत्न करित फार झटुनियां ॥
॥ परि लेश मात्र दिव्य शरिर न दिसलें तयां ॥
॥ दैवगती गहनथोर सुखदानवादिकां ॥ मज धांवपाव०॥३॥

---

पद (राग झिंझोटी, ताल दादरा.)

[illegible]

॥ काय घडलें अपराध असे सांग ईश्वरा ॥
॥ पदिं विनवी ही त्यांत दासि जोडुनी करा ॥ ध्रु० ॥
॥ काय झाला मजकडुन विभो घात थोरसा ॥
॥ काय केलें मी दुष्ट कर्म थोर साहसा ॥
॥ अहा ! आणिलें चोरुन कांत राम मानसा ॥
॥ मजसि पाप पामरा ॥ काय० ॥ १ ॥
॥ गृहिं त्यजिनिया सासास पिता जननि कांत ते ॥
॥ पाडस चुकलें हरणीस काननांत अज्ञ तें ॥
॥ वनिं वधिल्याचें कवण त्यास कथिल वृत्त तें ॥
॥ विनवी जोडुनी करा॥काय घडलें अपराध असे०॥२॥

याप्रमाणें तिनें वृक्षपाषाणांसही करुणा आणणारा शोक केला; परंतु त्या दोघां कसाब्यांचे अंतःकरणास दयेचा लेशही आला नाहीं. तेथें नजीकच एक स्वच्छ उदकाचा असा वहात होता त्यांत त्यांणीं दोघें धुऊन त्याहाऱ्या केल्या. आणि पद्मनयनेचें शीर उचलून तिनें

रून देवीवर टाकावें व सर्व दागिने वांटून घ्यावे असा ठराव केला. इतक्यांत कामाजीच्या मनांत सर्व दागिने आपण घेऊन राघोजीस फसवावें असें आलें.

कामाजी वयानें सुमारें साठ वर्षांचा होता. त्याचे केश पांढरे झालेले असून कांहीं दांतही पडले होते. परंतु मोठा कांकट व सुदृढ म्हातारा होता. त्याचा वर्ण गोरा असून तो दिसण्यांत मोठा भव्य व पाणीदार दिसे. हातांपायांस चालून व कष्ट करून घट्टे पडले होते. निशाणावर तीर मारणें, व कड्यावर आणि भिंतीवर चढणें या कामांत तो फार निपूण असे. चोरवाटा तर त्याच्यासारख्या कोणासच माहित नव्हत्या. आपलें स्वकर्म चोरी करण्याचें आणि लबाड्या करण्याचें असें समजून तें काम करण्यास त्याचें मन बिलकूल कमत नसे. त्याचें मुख्य दैवत देवी तिला मात्र तो भजत असे व दुसऱ्या कोणत्याही देवास भीत नसे. राघोजी फार भेकड असे व तो त्या चोरांच्या मंडळीपासून दूर रहात असे. तो भाविक असे, व धाडस कृत्य केवळ लोकांच्या सांगण्यावरून अविचारानें करी.

कामाजीच्या मनांत राघोजीस फसविण्याचा विचार येतांच त्यानें एकदम शेंडी मोकळी सोडून पिसा घालण्यास आरंभ केला. तो मोठ्यानें दांत ओंठ खाऊं लागला; व डोकें हलवून डोळे फिरवूं लागला. तो अंगास आळेपिळे देई, हातांच्या मिठ्या मारी, व झिंगझा, झिंगझा असे श्वासोच्छ्वास मोठ्यानें टाकी घटकेंत भूईवर डोकें टेकी; आणि घटकेंत डावे व उजवे कानावर डोळे. मध्येंच बोटें मोडी, व चुटक्या वाजवी; आणि एखादे वेळेस वाऱ्यासारखें अंग झाडी. अशी त्याची स्थिति पाहून याच्या अंगांत देव आला असें राघोजीस वाटलें. तो त्याच्यापुढें गेला आणि हात जोडून ह्मणाला, "बोल, बोल तूं कोनता देव हायेस." कामाजी अटकत अटकत बोलतो "का—अर मी म—मदेवा व्हय. आ—आनि तूं हा—हा भकस हा—हाकड कास्हून आ—आनितलार." राघोजी म्हणतो, "व्हय बया नें समद खरं. पन कदंबा माय तर गाडली म्हुनशनी तिसा निवेद तुझ्या हाकड आनल्यागा." कामाजी बोलतो, "राघ्या, तूं येथून इचिनरपुरीस जाय बगा, आनी कदंबामायचा निरुप घेऊनशनी पर्ता

ने मरी. " राघोजी म्हणतो." अग माझे बया, कदंबा तर गाडली, मग कुनाच पुसूं! कामाजी रागावून बोलतो, " अर लय लुच्चेपन करूंस न्हय! अर अध्यां रात्री गाडल्या जागीं जाऊनशानी पुस नी माय काय बोलते ते सांगन्यास ये जा. तोवरी काम्या हत बसल जाय."

असें त्याचें भाषण ऐकतांच ' न्हय तर माय ' असें ह्मणून तत्क्षणीं राघोजी विचित्रपुरीकडे जाऊं लागला.

तो डोंगराआड जाऊन दिसेनासा होतांच कामाजीच्या अंगांतील देवी गेली. असें त्याचें आचरण पाहून यास आपली करुणा येऊन यानें अशी हिकमत करून आपल्या सोबत्यास घालविलें, असें पद्म-नयनेस वाटून ती त्यास म्हणाली, " नाइकजी, मला माझ्या घरीं पोंचवाल तर मी तुमचे उपकार जन्मभर विसरणार नाहीं." कामाजी म्हणतो, " बाईसाब, आम्ही त्या देवीचे चाकर आम्हासनी जसा हुकूम तस आर्मी केल्या." ( मोठ्यानें हंसून. ) " राघ्यासनी असी हिकमत करूनशानी दवडल्या. तुला दागिन्याचा हिस्सा देतो न्हय ध आतां खरं! त्यासनी असाच रामुशाकावा दावतो बगा." (पद्मनयनेसवळ येऊन.) " पोरी, काढ तुझ्या अंगावरील डागिने, न्हाय तर आतांच कापून टाकितोया." ( तरवार काढितो.) हें त्याचें भाषण ऐकून पद्मनयना मोठ्यानें किंकाळी फोडून पाषाणासही करुणा येण्यासारख्या स्वरानें रुदन करूं लागली. तिच्या आक्रोशाचा मोठा प्रतिध्वनि निघून सर्व पर्वत व वृक्ष हे तिजबरोबर जसे काय रडत आहेत असें भासलें. ती मोठ्या उत्सुकतेनें कोणी येऊन मला सोडवील अशा आशेनें चोहींकडे पाही. परंतु व्यर्थ. अखेरीस निरुपाय होऊन तिणें आपल्या अंगावरील सर्व अलंकार काढून त्या काळस्वरूप्याच्या ओट्यांत टाकिले; आणि आपले कमळासारखे हात जोडून त्याच्या पायांवर डोकें ठेवून ह्मणाली, " नाइकजी, यापेक्षां शतपट द्रव्य मी तुह्मास देईन, परंतु मला फक्त जीवदान द्या. तुह्मी मला माझ्या बापाच्या ठिकाणीं आहां, व मी अनाथ बालक तुमच्या पदरांत आहें. माझा गाईचा प्राण तुह्मी घेऊं नका, मी तुमच्या पायां पडतें. " असें ह्मणून तिनें गुडघे टेंकून त्यास नमस्कार केला; परंतु

त्या पाषाणहृदयास दया येईना. त्यानें विचार केला कीं, देवीची आज्ञा इला कापून त्याची एवढी मात्र आहे; परंतु इला नेऊन मी ठेवूं कोठें? कोठें जरी इला ठेविलें तथापि कोणत्या तरी रीतीनें तें वर्तमान प्रकट होऊन माझा प्राण जाईल. वास्तविक ह्मटलें ह्मणजे ईस कोठें तरी लपवून ठेवून पुढें देवीचा दृष्टांत होईल त्याप्रमाणें करावें हें बरें. परंतु नको बाबा. मला जें इतकें द्रव्य मिळालें आहे तें खाऊन माझ्या गळ्यासही तेणेंकरून फांस बसेल. सरीनें हिकमत काढली त्याप्रमाणें करावें तर तिला हिस्सा द्यावा लागेल. असो. आतां सत्रा पंधरा विचार उपयोगी नाहींत. ही येथें सदंबादेवी आहेच; ईस बळी द्यावा ह्मणजे झालें. येणेंकरून देवीचा हेतु पूर्ण होऊन माझेंही लोककल्याण होईल.

असा पक्का निश्चय करून तरवार काढून, जसा खाटीक गाईचा गळा कापावयास धांवतो त्याप्रमाणें तो दुष्ट रामोशी पद्मनयनेवर धांवून आला. त्याचें तें उग्र रूप पाहून त्या सुकुमार हरिणीस तो त्या भयंकर अरण्यांत व्याघ्रासारखा दिसला. ती एकदम पुनः मोठ्यानें किंकाळी मारून उठली आणि पळूं लागली. परंतु सिंहाच्या पंजाखालीं सांपडलेली गाय जाते कोठें! ती तशीच मोठ्यानें ओरडत एका मोठ्या दगडा आड आली. त्या दगडा आड काळोजी नांवाचा तिसरा चोर दडून बसला होता तो उठून उभा राहिला, आणि कामाजीकडे मोठ्या क्रोधानें पाहून ह्मणतो:— " शाबास कास्या शाबास! रामोशी कुळामधीं तूं लई इमानी दिसतुसया. तूं लई टकडा हाय नी ठय चोट्टे रंग मांडल्या व्हय! अरे तुझ्या समद्या हिकमती मला समजल्या. रह्यास तेरा दावून तूं समदं डागिनं खानार कायरं. अरे ल्येका! आतां तुझा परानच घेतों बगा! " असें ह्मणून हातांतील तरवार उगारून त्याच्या अंगावर धांवतो.

हा काळोजी सर्व चोरांचा नाईक होता. हा शरीरानें सर्वांपेक्षां अतिबळकट व फारच भयंकर असे. यास ते सर्व चोर अतिशय भीत असत. तो बहुधां घरींच राहात असे व वांटे करण्याच्या वेळेस पुढें येत असे. सदंबा देवीस पद्मनयनेस बळी देऊन सर्व दागिने घेऊन या असें कामाजीस व राघोजीस यानें सांगितलें होतें, परंतु मागाहून

हे कांहीं दगा करतील असा संशय येऊन तो त्यांच्या मागोमाग येऊन दगडाआड बसला होता. असो. तो कामाजीच्या अंगावर धांवतां बरोबर कामाजी पळून गेला. व काळोजी त्याच्या मागें लागला.

---

# भाग १२.

## क्लेश.

मागील भागांत सांगितल्याप्रमाणें ते दिसेनातसे दूर गेल्यावर पद्मनयनेस पुष्कळ धीर आला. नंतर पुढें काय करावें याविषयीं ती विचार करूं लागली. तिच्या मनांत आलें कीं, आतां येथें बसून कांहीं उपयोग नाहीं. याकरितां हळू हळू या डोंगराच्या माथ्यावर जावें ह्मणजे आसपास एखादा गांव असल्यास दिसेल, अगर कोणी शेतकरी किंवा दुसरा मनुष्य भेटेल. मग त्यास कांहीं द्रव्य देऊं करून घराकडे जाण्याची तजवीज करावी. असा बेत करून ती एका बाजूच्या डोंगरावर चढूं लागली व तेथें जरा पाय घसरून पडली.

इकडे काळोजी कामाजीच्या मागें लागून तो सांपडत नाहीं असें पाहून पुन्हां देवीजवळ आला आणि पाहतो तों पद्मनयना कोठें दिसेना; नंतर धूर्ततेनें इकडे तिकडे पाहतो तों वाळलेल्या पानांवर पावलांच्या खुणा दिसत होत्या व तिच्या शेलारीच्या चिंध्या कांटझाडांस अडकल्या होत्या, त्या धोरणानें पद्मनयना गेली होती त्या वाटेनें तिचा शोध करीत तो जाऊं लागला. नंतर दूर डोंगरावर दृष्टि देऊन पाहिलें तों कोणी पडलें आहे असें त्यास दिसलें. त्या वेळेस ही पद्मनयनाच असेल असें समजून तो तिच्या जवळ आला. त्यानें तिजकडे लक्ष्य लावून पाहिल्यावर त्यास कळलें कीं, ही डोंगरावरून पडली आहे. मग त्यानें तत्क्षणीं थोडें पाणी पैदा करून तिच्या तोंडांत घातलें, आणि तिला एका झाडाखालीं नेऊन सावलींत निजविलें. नंतर ही क्षुधेनें व्याकुळ झाली असेल असें समजून त्यानें देवीच्या पूजेस जीं पंचामृतें आणिलीं होतीं त्यांपैकीं दूध आणि साखर एके ठिकाणीं करून तीस पाजलें. त्या वेळेस किंचित् सावध होऊन तिनें डोळे उघडले. तेव्हां ही सावध आहे असें पाहून त्या चोरानें तीस झांकून आणलेल्या पासोडींत बांधून तिची मोट करून डोक्यावर घेतली, आणि मोठ्या सपाट्यानें आडमार्गानें जाऊं लागला.

त्या ठिकाणापासून आणखी सुमारें दहा कोशांवर काळोटकरी

या नांवाची एक अतिशय अडचणींत जागा होती. तेथें त्या काळो-जीनें पद्मनयनेस नेलें, तों रात्रीचे दहा वाजून गेले. ती टेंकडीही चोहोंकडून डोंगरांनीं वेष्टिलेली होती. त्या टेंकडीवर एक गवती झोंपडी होती. त्या झोंपडीच्या आसपास व पुढें छायेकरितां दहा-पांच झाडें लाविलीं होतीं. त्या झोंपडीच्या दारापाशीं तो गेला आ-णि ' सदे दार उघड ', असें ह्मणाला. हे त्याचे शब्द ऐकून, जिनें पद्मनयनेस फसवून नेऊन कोंडलें होतें ती ह्मातारी, बाहेर आली. ती अत्यंत काळी व गेंड आली होती. तिच्या तोंडावर देवीचे वण होते, व सर्व दांत पडून तोंडाचें बोळकें झालें होतें. डोक्याचे केश अर्धे पांढरे असून ते अक्षरा विखुरलेले असत, व अंगावरील कपडे घाणेरडे व उघडे पडलेले असत; परंतु ती जेव्हां पद्मनयनेशीं कपट करण्यास आली होती तेव्हां तिणें आपलें रूप पालटलें होतें. ही काळोजीची आस नव्हती, व इलाही कोणी आप्त नव्हतें. ही एक दोन वेळां सरकारच्या गुन्ह्यांतही सांपडून हिला शिक्षा मिळाली हो-ती, हें मागें सांगितलेंच आहे. ती सर्व मुलुखांत कपटविद्येविषयीं जा-हीर असे, व तिला धरून देईल त्याला इनाम मिळेल असे जाहीर-नामेही लागले होते. त्यामुळें तीस कोणाच्याही दृष्टीस पडण्या-स धैर्य होत नसे. परंतु ती कुटिलमार्गांत अगदीं निपुण व अनु-भवशीर असे, ह्मणून त्या विचित्रपुरींतील दरवडेखोर रामोशांनीं तीस आश्रय देऊन आपणास ससल्ला देण्यास उपयोगीं पडावी ह्मणून तिला जंगलांत एकांत ठिकाणीं झोंपडें बांधून देऊन त्यांत ठेविलें होतें. त्या चोरांस लपणें आलें अगर कांहीं माल छपवणें झाला तर ते तिजकडे येत, आणि पुष्कळ दिवस लपून बसत, अगर माल ति-च्या स्वाधीन करून जात. तें स्थळ त्या विचित्रपुरींतील चोरट्यांशि-वाय दुसरे कोणास माहित नव्हतें; व त्यास एका पुसकट पाऊल-वाटेशिवाय दुसरा रस्ता नव्हता.

अशा त्या स्थळीं व अशा त्या साक्षात् सगेजवळ त्या दुष्ट का-ळोजीनें पद्मनयनेस आणिलें. मग काळोजीस पाहून म्हणाली, का-ळ्या, अरे ही आज कसची शिकार आणिली? आणि इतक्यांत सदं-बा आईला बळी देऊन आलास? काळोजीनें तीस उत्तर न देतां त्या-

लीं बसून चकमक झाडून दिवा लाविला, आणि पद्मनयनेस मोकळें केलें. ती शुष्क झाली होती, व अनिर्वाच्य दुःखानें व्याप्त झाली होती, यामुळें तीस डोळे उघडण्याची देखील शक्ति नव्हती. अशा स्थितींत तीस पाहून सरी ह्मणते, "काळ्या, अरे हें मढें येथें कशास आणिलें ? दागिने काढून घेऊन देवीचा नवस पुरा करावयाचा होता ह्मणजे झालें." काळोजी ह्मणाला, "सरे, तूं ह्मनतीस तें खरं पन अशी मुरद्यावानी मेलेली, देवीस बळी कशी देउं ? म्हूनशेनी ईस हकड आनलीया. आतां खाऊं पिऊं घालूनशेनी मंग बळी देऊं."

असें काळोजी बोलल्यावर तीं दोघें तिची खटपट करूं लागलीं. त्यांनीं तिला कांहीं खाऊं घालून एका अंथरुणावर निजविलें.

याप्रमाणें व्यवस्था झाल्यावर पद्मनयनेस झोंप लागली. पद्मनयना त्या झोंपड्यांत आल्यानंतर पुष्कळ दिवसपर्यंत अगदीं बेशुद्ध पडली होती. कांहीं दिवसांनीं तिच्या अंगांतील ज्वरांश कमी झाल्यावर ती किंचित् सावध होऊन पाहूं लागली. तों जिनें आपणास कपटानें बाहेर काढिलें ती ह्मातारी व तो दुष्ट काळोजी दृष्टीस पडला. ते समयीं मी येथें कशी आलें, व हे घातकी माझा प्राण लवकरच घेतील असें तीस वाटून ती पुनः मूर्च्छित झाली. ती क्षणोंक्षणीं भयभीत होऊन लटलटां कांपे, व धांवा ! धांवा ! सोडवा ! सोडवा ! असे शब्द बरळे; परंतु एखादें जनावर नीच लोक जसें खाण्याकरितां अगर बळी देण्याकरितां आणितात, आणि त्यास तें कळून तें कितीही हात पाय आपटूं लागलें, अथवा करुणाकर स्वरानें ओरडलें, तथापि कोणास त्याची दया येत नाहीं, त्याप्रमाणें पद्मनयनेच्या निर्जीव पदार्थास देखील द्रव आणणाऱ्या विलापानें त्या उभयतांच्या हृदयास पाझर आला नाहीं. ते खुशाल तिच्या शोकाकडे लक्ष्य न देतां मोठ्यानें हंसत व थट्टामस्करी करीत. कधींकधीं ती फारच मोठ्यानें ओरडूं लागली तर ती सरी तीस वाकोल्या दाखवून तिच्यासारखे सूर काढी, व काळ्याकडे पाहून हंसे. तिच्या ओरडण्याचा त्यांस कंटाळा आला ह्मणजे त्या दुष्ट काळ्यानें तीस धमक्या द्याव्या. परंतु पद्मनयना बेशुद्ध ओरडे त्यामुळें तीस धमक्या व समजून तिणें एकसारखें रडूं लागावें.

ती रात्रीबेरात्रीं कदाचित् उठून पळून जाईल म्हणून त्या निर्दयांनीं तिच्या पायास एक दोर बांधून तो एका खांबास अडकविला होता. ती आजारी असतां असें करण्याचें कारण हें कीं, त्या दोघांस वाटे कीं, ही कदाचित् ढोंग करून आजारी पडली असेल, व आपला किंचित् गाफलपणा पाहून इचा पळून जाण्याचा बेत असेल.

कांहीं दिवसांनीं ज्वरांश वगैरे बरा आल्यावर, व पूर्ण विचार करून आपणास येथें कशासाठीं आणिलें, आणि दुष्ट **मरीनें** एवढें भयंकर कपट कशाकरितां आचरिलें हें सर्व तिच्या लक्ष्यांत आल्यावर ती एके दिवशीं **मरीस** म्हणाली, " बये, तुझी सून जी प्रसूतिवेदनेनें अडली होती ती बरी झाली काय ? "

**मरी**—ती मेली.

**पद्म०**—( कळवळून. ) अरेरे ! फार वाईट झालें. तीस मला एकदां तरी दाखवायेचें होतें. बरें, त्वां मला येथें कोंडून ठेविलें आणि आतां इकडे आणिलें याचें कारण काय ?

**मरी**—( रागावून. ) अग रांडे, तुझ्या नवऱ्यानें त्या बिचाऱ्या चमेलीचा नाश केला; आणि माझें असें सर्व दुनयेंत तोंड काळें केलें, त्याचा सूड म्यां घेतला समजलीस ! पण बाई मी काय करूं ! देवाची आज्ञा !

**पद्म०**—पुढें माझी वाट कशी ?

**मरी**—दैवी दृष्टांत दाखवील तशी.

**पद्म०**—पण बये, मला राजमंदिरांतून काढून अशा रानांत आणिलें याचें तुझ्या जीवास कांहीं दुःख वाटत नाहीं ? अग, मी निरपराधी निरपेक्षबुद्धीनें तुजवर उपकार करण्यासाठीं तुजबरोबर आलें; असें असून त्या उपकाराचे आभार त्वां अशा रीतीनें फेडले काय ? तूं मानवी काया मात्र धरून धारण केली आहेस. वस्तुतः तूं काळसर्पीण आहेस. अग, त्वां माझ्या प्राणपतीची आणि माझी ताडातोड केली, तुला महाग वरी देवील अन्न मिळणार नाहीं.

अशा अनेक तऱ्हांनीं **पद्मनयनेनें** तीस दूषणें दिलीं, व उपदेश केला, परंतु त्या दुष्टांच्या मनावर त्याचा किंचितही ठसा उमटेना. तिणें फार उलटापालट केली तरी त्या क्रूरांनीं तीस मारून,

गप्प बसवावें; व ही रिकामी बसते ह्मणून अक्षय वडबड करिते, याकरितां ईस कांहीं तरी काम सांगावें. असें मनांत आणून त्यांणीं तिला दळावयास लावावें. तिच्या पायांत बंदिवानाप्रमाणें बिडी घालून व ह्मातारीनें बरोबर जाऊन तिजकडून पाणी आणवावें व धुणें धुववावें. सुकुमार **पद्मनयने**च्या हातांस तेणेंकरून फोड यावे, व अनवाणी चालल्यानें पायांची रक्तें निघावीं.

ती निरंतर रुदन करी व मोठ्यानें शोक करी. तिला राई इतकें दुःख आलें असतां सर्व जगतास भीति वाटे तिजवरून आतां दुःखाचे पर्वत चाललेले पाहून वनांतील पशुपक्षीही रुदन करीत. तीस त्या समयीं पंचमहाभूतेंही प्रतिकूळ झालीं; व आपापला सूड, तिच्या सौंदर्याचा हेवा करून उगवूं लागलीं. वायु धूळ व कचरा आणून तिच्या हरणीसारख्या डोळ्यांत टाकूं लागला; व पृथ्वीनें आपला पृष्ठभाग खडे व कांटे यांनीं युक्त करून तिच्या कोमल पायांचीं रक्तें काढिलीं. उदक कूपांत भरून तिच्या डोक्यावर बसूं लागलें. सूर्यानें आपलें प्रखर तेज प्रकट करून तिचें सर्वांग होरपळून टाकिलें. व तिच्या मुखावर काळी कळा आणिली !

अशा प्रकारची सर्व प्रतिकूलता पाहून व त्या ह्मातारीचा त्रास दुःसह होऊन, तिला मरण लवकर येईल तर बरें असें वाटलें. त्यापुढें त्या काळस्वरूप्यांच्या हातून सुटण्याची आशा तिला राहिली नाहीं, परंतु मरण तरी येतें कसें हा विचार पडला. अंगावरील अलंकार वगैरे सर्व काढिलेले, सबब हिरकणी मिळण्यासही मार्ग नाहीं. आडविहीर बघावी तर ह्मातारी निरंतर पाठीशीं असे. विषप्रयोग करावा तर तें आणून देण्यास कोणी नाहीं. अन्नपाणी वर्ज करावें तर ते दुष्ट बळेंच तिजला पायसें पाजून कांहीं न खाल्ल्यास निदान दूध तरी पाजीत. अशा रीतीनें जीव जाण्याचा कांहीं एक मार्ग तिला दिसनासा झाला.

शेवटीं तिनें निश्चय केला कीं, या उभयतांस अतिशय वाईट शिव्या देण्यास आरंभ करावा म्हणजे यांस त्रास होऊन ते माझा प्राण लवकर घेतील. असें मनांत आणून ती तसें करूं लागली. व तेणेंकरून ते उभयतां यमदूत तीस बसतां उठतां लाथाबुक्क्या मारूं लाग-

ऊन निजविलें; आणि आपण त्याजवळ बसली. तो अत्यंत विव्हळत आणि पाणी मागत पडला.

रात्रीं बारावर दोन वाजण्याचा सुमार झाला. काळोजीस वायूचा झटका होऊन तो बेशुद्ध होऊन भलतें भलतें बडबडूं लागला व मरी-लाही डोळा किंचित लागला. अशी संधि पाहून पद्मनयनेनें विचार केला कीं, या वेळेस आपण येथून निघून जावें. कारण, हा दुष्ट कदाचित बरा झाला तर, मला पुनः त्रास देईल; मेला तरी पाठीमागें ही म्हातारी माझा परिणाम चांगला करणार नाहीं. असें मनांत आणून हलकेच दार उघडून ती बाहेर पडली. इतक्यांत झोंपडींतल्या दिव्याची वात उंदरानें नेली. ती त्यांतील कुडाच्या भिंतीवर जातांच झोंपडीस आग लागून ती भडभडां जळूं लागली. त्या वेळेस मरी जागी होऊन घाबऱ्या घाबऱ्या जीव घेऊन बाहेर पडली. तों त्या आगीच्या उजेडानें पद्मनयना दूर जंगलांत चालली आहे, असें तिनें पाहिलें. ती तत्क्षणींच, जसा सिंह हरिण धरण्यास जातो तशी पद्मनयनेच्या मागें धांवली, आणि तिनें तिची वेणी धरून ओढून तिला जमिनीवर पाडलें. आणि वरून क्रोधाच्या आवेशानें दांतओंठ खाऊन पुष्कळ लाथा बुक्या मारल्या. नंतर तशीच ओढीत आणून तिला एका झाडाशीं बांधून टाकिलें. ती इतकें कृत्य करीपर्यंत सर्व झोंपडी जळून खाक झाली. व काळोजी बेशुद्ध होता सबब तोही जळून मेला.

---

पुस्तक पहिलें समाप्त.

# विचित्रपुरी.

## पुस्तक दुसरें.

---

## भाग १.

श्लोक.

योनी पिशाच वदतीं बध कल्पनेची ॥
भीतीत जे जन तिला वह त्रास जांची ॥
ज्ञानें परी जनकळा कळली जयाला ॥
तो जिंकतो जग पळांत न भी कशाला ॥

## श्राद्धभट आणि पिशाच.

**मनोहरपंडित** व **श्यामसुंदर** हे दोघे **पद्मनयनेच्या** व **धैर्यशी**लाचा शोध करण्याकरितां निघाले, व कांहीं दिवस बरोबर फिरून नंतर दोघे दोहीं दिशांस गेले. **श्यामसुंदर** इंग्रज सरकारच्या मुलुखांत गेला. व **मनोहरपंडित** नेटिव लोकांच्या राज्यांत शोध करूं लागला. **मनोहरपंडितानें** कल्पना केली की, **पद्मनयनेचें** स्वरूप पाहण्याकरितां पुष्कळ मांडलिक राजे व संस्थानिक **विचित्रपुरीच्या** आसपास सर्व स्थानें पसंत होते; त्यापैकीं कोणीं कदाचित तीस कांहीं युक्तीनें पळविलें असेल. याकरितां तो प्रत्येक राज्यांतील व संस्थानांतील राजधानींत जाऊन. मोठ्या बारकाईनें शोध करूं लागला. असें चालले असतां तो **अमलपूर** शहरास आला. **मनोहरपंडितास** अनायासेंकरून मोठमोठीं शहरें व निरनिराळ्या लोकरीति दिसूं लागल्या; तेणेंकरून त्यास आनंद वाटून. आपण ज्या हेतूनें आपलें शहर सोडिलें, तो हेतु या कामानें पूर्ण होत आहे; याकरितां लोकसुधारणा करण्यासही होईल तितका चालतां चालतां यत्न करीत जावा असें त्यास वाटलें. तो **अमलपुरांत** आल्यावर त्यानें आपलें

विन्हाड **श्यामभट** नांवाच्या एका भिक्षुक ब्राह्मणाचे घरीं घेतलें आणि धर्मादाय म्हणून आपल्या भोजनखर्चाबद्दल आणि घरभा-ड्याबद्दल त्यास द्रव्य पोंचवूं लागला. तो दिवसभर शोध करीत शहरांत फिरे; आणि संध्याकाळीं त्या भिक्षुकाशीं व त्याच्या मुलांशीं, त्या मुलुखांतील चाली व लोकसमजुती कशा आहेत याविषयीं संभाषण करी. एके दिवशीं बोलतां बोलतां या मुलुखांत भुतें फार आहेत, असें त्या मुलांच्या बोलण्यांत आलें. त्यावर हें सर्व खोटें आहे वगैरे **मनोहरपंडित** बोलल्यानंतर ते ह्मणाले कीं, तुह्मी या शहरच्या राजाचे बागेंत जाऊन एक रात्र बसा ह्मणजे तुह्मास समजेल. त्या वेळेस यांची याविषयीं खातरी करून द्यावी, असें **मनोहरपंडिताचे** मनांत आलें; परंतु आपण असल्या प्रकारचीं वेडें लोकांच्या डोक्यांतून काढण्याच्या खटपटींत आतांच गुंतलों तर **पद्म-नयनेचा** शोध लावण्याचें काम तसेंच राहील, असें त्यास वाटून त्यानें तो वाद सोडून दिला.

**मनोहरपंडितानें**, मीही भिक्षुक आहें असें **श्यामभटास** सांगितलें, आणि त्याच्या बापाची व त्या भिक्षुकाची कांहीं ओळखही निघाली. नंतर परस्परांचीं आडनांवें वगैरे विचारतां, ते उभयतां एक शाखेचे आहेत असें ठरलें. **श्यामभट** वे० सं० व आजेवी होता, यामुळें लोकांत त्याची प्रतिष्ठा असून त्याची भिक्षुकी चांगली चा-लत असे.

एके दिवशीं त्यास सात आठ श्राद्धांचीं आमंत्रणें मोठ्या आग्र-हानें व श्रीमंतांचे घरचीं आलीं. त्यांपैकीं एक श्राद्ध तर **श्यामभ-टाच्या** यजमानाच्या घरचेंच होतें. तेथें पांच ब्राह्मण जरूर पा-हिजे होते. गांवांत लग्नें व अनुष्ठानें चाललीं होतीं, सबब ब्राह्मण मिळण्याची मोठी मुष्किल पडली. याकरितां **श्यामभटानें मनो-हरपंडितास** आमंत्रण घेण्याचा आग्रह केला. तो पुष्कळ नको नको ह्मणाला, परंतु **श्यामभटानें** बळेंच त्याच्या गळ्यांत एक आमं-त्रण बांधलें. **श्यामभटानें** निवडक ठिकाणीं आपलीं मुलें वगैरे पा-ठविण्याची तजवीज करून, **मनोहरपंडितास** आपल्या बरोबर यज-मानाचे घरीं नेण्याचा बेत केला. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं **श्याम-**

भटानें स्नान करून, मनोहरपंडितास स्नानास उठविलें. त्या बिचाऱ्यास त्या आमंत्रणाचें मोठें संकट पडलें. जरी त्याचा बाप राजोपाध्याय होता, तथापि त्याचा सर्व जन्म इंग्रजी शिकण्यांत गेला होता, सबब त्यास त्या भिक्षुकीसंबंधी कांहीं माहिती नव्हती. स्नानसंध्यादि नित्यकर्मेंही त्यास पुरतीं समजत नसत, परंतु धूर्तपणानें लोकांचें पाहून तो सर्व साधून नेत असे.

त्यानें स्नानास आरंभ केल्यावर, श्यामभट बारीक नजरेनें त्याकडे पाहूं लागला. कारण, मनोहरपंडित रोज शेंडी न भिजवितां खांद्यावरून स्नान करितो हें त्यास ठाऊक होतें. मनोहरपंडितानें त्या दिवशींही नित्याप्रमाणेंच स्नान केलें, असें दृष्टीस पडतांच श्यामभटास फार राग आला; आणि तो ह्मणाला: "आज तुह्मास श्राद्धाचें जेवावयास जावयाचें असून तुह्मी खांद्यावरून स्नान केलें याची शंका तुह्मास वाटली नाहीं काय?" मनोहरपंडितानें डोक्यावरून स्नान केलें आणि तो सुकाळ्यानें घरांत गेला, व नित्याप्रमाणें आपला पीतांबर नेसून केसांची गांठी उकलून रुमाल ल्यावूं लागला. इतक्यांत तो भिक्षुक पुनः आंत आला; आणि मनोहरपंडिताकडे मोठमोठे डोळे करून त्यानें अंगारा मागितला; एक मूठभर भस्म आणून तें त्याच्या हातावर टाकिलें, आणि त्यास धुतलेलें धोतर नेसावयास दिलें. तें सर्व निमूटपणें सहन करून तो पाटावर ओठ हालवीत पुष्कळ वेळ बसला. मनोहरपंडितास वाटलें कीं, हा भिक्षुक फार तामसी आहे; यानें आपल्या दोन तीन चुका माफ केल्या आहेत, यास्तव आतां जरकरितां चूक आली तर हा अंगावर हातच टाकील. या भीतीस्तव त्यानें पुष्कळ वेळ पळ्यापळ्या वाजविल्या, व संध्येचें पाण्यानें ताम्हन भरून टाकिलें.

नंतर बोलावणें आल्यावर ते उभयतां जाऊं लागले. श्यामभट तोंडानें मंत्र ह्मणत, व रस्त्यांत कांहीं चिंधी अगर पान पडलेलें दिसलें ह्मणजे टुणकन उडी मारून पलीकडे जाई. तें पाहून मनोहरपंडितही ओठ हालवीत तशाच मासल्याच्या उड्या मारीत चालला. यजमानाचे घरीं गेल्यावर ते दोघे जाऊन पाटावर बसले, तों इतक्यांत आणखी तीन ब्राह्मण आले; नंतर श्राद्धास आरंभ झाला. मनो-

रपंडितास संस्कृत चांगलें येत होतें ह्मणून त्यास त्या श्राद्धसंकल्पाचा अक्षरशः अर्थ समजे. परंतु जेव्हां सत्य अपसव्याचा प्रपाठ चालला, तेव्हां त्यास अतिशय हसूं येऊं लागलें. तें पाहून श्यामभट त्याकडे डोळे वटारूं लागला. प्रथमारंभींचा संकल्प झाल्यावर देवस्थानीं दोन व पितरस्थानीं तीन असे ब्राह्मणांचे दोन विभाग पाडिले. मनोहरपंडितास प्रथम देवस्थानीं स्थापन केलें होतें, सबब सर्व कृत्याचा आरंभ त्याजपासून होऊं लागला. त्यानें एक दोन वेळां ह्मटलें कीं, मला या कामाची चांगलीशी माहिती नाहीं, याकरितां कोणी माहितगार ब्राह्मणाची पूजा प्रथम करून नंतर मजकडे येत जा. ह्मणजे त्याचें पाहून मीही तसेंच करीत जाईन. परंतु त्यांनीं तें न एकतां याची निर्भत्सना मात्र केली. मनोहरपंडितास तसा प्रसंग पूर्वीं कधींच आला नव्हता, यामुळे तो प्रत्येक वेळेस चुके, व श्यामभट अगदीं हलकट मनुष्याप्रमाणें त्याच्या अंगावर कडकडून, यजमानास आपली शेंडी दाखवी.

याप्रमाणें अतिशय अपमान व जाच सोसून मनोहरपंडित अगदीं त्रासला. त्यास वाटलें कीं, आपला बोज राखून श्यामभट सर्व कृत्य करून श्राद्ध शेवटास नेईल; व तेणेंकरून आपल्या वेळाचा किंचित् खर्चमात्र होऊन बिचारे ब्राह्मणांची अडचण दूर होईल ह्मणून म्यां हें आमंत्रण पत्करिलें. परंतु काय चमत्कार पहा ! अत्यंत निःस्पृहत्व परोपकारबुद्धीनें हें कृत्य मी करावयास आलों असून हा दांभिक मला आपल्या अगदीं अज्ञान विद्यार्थ्याप्रमाणें वागवूं लागला ही मोठी दुःखाची गोष्ट आहे. असो. आतां यास कायदेशीर जबाब दिल्याशिवाय आपली योग्यता राहणार नाहीं. असा विचार करून तो यजमानास ह्मणाला, " महाराज, जर मी या वेळेस येथून उठून गेल्यामुळें आपलें श्राद्ध बिघडत असेल तर, दुसरे मजकडे या; मी आपला खर्च भरून देईन; व शिवाय दंडाबद्दलही कांहीं मागितल्यास देईन; परंतु मला येथें बसवत नाहीं, याकरितां मी जातों याची मला माफी करा. मी श्यामभटाच्या निःस्पृहत्व आमंत्रण घेतलें हा अतिशय मूर्खपणा केला. "

इतकें बोलून मनोहरपंडित उठून जाऊं लागला. तें पाहून श्याम-

भट अत्यंत क्रोधायमान होऊन डोळे फाडून व दांत खाऊन ह्मणाला, " मूर्खा, श्राद्धीं क्षण घेऊन उठलास तुला लाज वाटते काय ? " असें बोलून त्या स्नानाच्यास राग न आंवरून त्यानें उठून एकदम मनोहरपंडिताच्या अंगावर हात टाकिला. ते समयीं मनोहरपंडिताच्या क्रोधाग्नीवर तेल पडल्यासारखें होऊन, " थेरड्या, माझी योग्यता नसमजतां मला तूं अनाथाच्या पोरासारखें समजतोस काय ? " असें बोलून त्यानें श्यामभटाच्या थोबाडांत एशी लगाविली कीं, तेणेंकरून त्याचा घोळाणा फुटून सर्व तोंड रक्तबंबाळ होऊन गेलें. इतकें कृत्य होत आहे तोंच सर्व ब्राह्मण हां ! हां ! हां ! ह्मणून एकदाच उठले; व घरांतील सर्व मनुष्यें धावत आलीं. मग काय विचारावयाचें आहे! सर्व मोठमोठ्यानें ओरडून, कोणी श्यामभटास रागें भरूं लागले, व कोणी मनोहरपंडितावर रागावले. असा एकच गोंगाट झाल्यावर रस्त्यांतून पोलिस शिपाई जात होते ते आंत आले; आणि त्यांणीं त्या सर्व मनुष्यास पकडून फौजदाराकडे नेलें. मनोहरपंडितानें श्राद्धाचें आमंत्रण घेतल्यामुळें त्या श्राद्धाचा विचका होऊन त्यापासून एक मोठा तंटाच उत्पन्न झाला.

न्याय करणारा फौजदार यजमानाच्या ओळखीचा होता, सबब यजमानानें त्यापुढें श्यामभटास नेऊन उभें केलें. श्यामभट दीनवाणें तोंड करून " माझ्या स्नानाचरणीं अन्न त्या सुधारलेल्या नास्तिकानें घेतलीं याविषयीं सरकारमर्जीनुरूप तजवीज व्हावी, " असें ह्मणून डोळ्यांतून पाणी गाळूं लागला. यजमानानेंही श्यामभटाचा कांहीं अपराध नाहीं, व असल्यास त्याचा विचक्षणा त्याच्या वृद्धपणाकडे पाहून व विद्वत्तेकडे लक्ष्य देऊन मनास आणूं नये, असें सांगून व पुष्कळ लांच देऊन त्यानें आपल्या उपाध्यायास सोडविलें. नंतर सर्व अपराध मनोहरपंडिताचा आहे असें ठरवून त्या अविचारी न्यायाधीशानें मनोहरपंडितास एक महिना कैदेची शिक्षा दिली.

याप्रमाणें कैदेंत गेल्यावर त्याच दिवशीं मनोहरपंडितास वाटलें कीं, मी येथें पद्मनयनेचा शोध करावयास आलों असून हें विनाकारण विघ्न उत्पन्न झालें, आतां काय करावें? शेवटीं पुष्कळ विचार केल्यावर त्याच्या मनांत आलें कीं, येथील राजाची भेट घेण्याचा

अगर त्यावर एखादा उपकार करण्याचा उपाय योजिला पाहिजे. त्याची कृपा संपादिल्यावर सांप्रतचें विघ्न नाहींसें होऊन आपण कोण आहों हें त्यास कळेल; दुसरें, त्याचा परिचय झाल्यानें पद्मनयनेचा शोध लावण्याचाही कांहीं मार्ग निघेल. कारण, मनोहरपंडितानें विचित्रपुरींतून निघण्याच्या वेळेस आसपास कोणकोणते मांडलिक राजे पद्मनयनेस पाहण्याकरितां जमले होते, याचा शोध केला होता. त्यावरून अमलपुरचा राजाही त्यांत होता, अशी त्यास बातमी लागली होती. आणि त्याच धोरणानें तो अमलपुरास आला होता. मनोहरपंडितास वाटलें कीं, या राजाच्या स्नेहानें, यानेंच पद्मनयना आणिली असल्यास तिचा शोध लागेल, अगर दुसरे कोणी राजानें पळविली असल्यासही याच्या द्वारानें त्याविषयीं खबर लागण्याचा संभव आहे.

नंतर त्या राजावर उपकार कोणत्या रीतीनें करावा याविषयीं तो विचार करूं लागला. त्यास आठवण झाली कीं, श्यामभट्टाचीं पोरें या राजाचे बागेत एक समंध आहे, असें ह्मणत होतीं. याचा निर्णय आपण करावा ह्मणजे राजास आनंद होऊन आपले दोन्ही तिन्ही हेतु शेवटास जातील. नंतर त्यानें त्या बागेविषयीं व समंधाविषयीं एका वृद्ध साळसूद शिपायास विचारलें. तेव्हां तो ह्मणाला; " हा बाग तयार होऊन सुमारें पांच वर्षे झालीं. यांत सर्व प्रकारचीं फळझाडें अत्यंत शोभायमान व सुवासिक फुलझाडें आहेत. त्याच्या तीन बाजूंस दोन दोन पुरुष उंचीचा मजबूत कोट आहे. चवथे बाजूस एक विस्तीर्ण नदी आहे. तिची बागेच्या अंगची दरड पाच सहा पुरुष एकसारखी तुटलेली असून तिच्या खालींच मोठमोठे डोहो आहेत. याकरितां त्या चवथ्या बाजूस भिंत मुळींच नाहीं. बागेंत मोठमोठ्या विहिरी आहेत. व मध्यभागीं हवा खाण्याकरितां एक चवथरा फरसबंदी बांधला आहे. संध्याकाळचे वेळेस त्यांत जाऊन पाहिलें असतां सर्व फुलझाडें व फळझाडें फळपुष्पांनीं लवलीं आहेत असें दिसतें. परंतु प्रातःकाळीं गेलें असतां एकही फूल व फळ दृष्टीस पडत नाहीं. तीं तो ब्रह्मसमंध तोडून नेतो. राजानें पुष्कळ पंचाक्षरी व इलमी आणिले आणि हजारों रुपये खर्च केले,

परंतु तो निघत नाहीं. त्या समंधाचा राजासही अतिशय धाक आहे. जरकरितां एखादे दिवशीं झाडाला मोट लावून पाणी न दिलें, तर रात्रीं तो मोठ्यानें राजास हाक मारतो. आणि त्याचे वाड्यावर धोंडे मारतो. याकरितां कधीं कधीं राजा आपलीं खासगी कामेंही बंद ठेवून, बागेची टापटीप ठेवतो. बागेंत जो कांहीं माल होईल तो तयार करून, त्या समंधानें एक जागा मागून ठेविली आहे तेथें ठेवावा लागतो. तसें करण्यांत किंचितही चूक पडल्यास तो, ' तुला मारून टाकीन ' अशी राजास मध्यरात्रीं धमकी देतो, त्यामुळें राजा अगदीं त्रासून गेला आहे. तो समंध निघत नाहीं अशी राजाची खातरी होऊन तो निरुपाय झाला आहे. जर कोणी इलमी त्यास काढील तर राजा त्यास दोन हजार रुपये इनाम देण्यास कबूल आहे. कोणी पंचाक्षरी अगर इलमी तेथें जाऊन रात्रीचा बसला तर त्यास प्रथम मोठा नाग दृष्टीस पडतो, तेवढ्यालाच भिऊन बहुतेक पळतात. कोणी धैर्य धरून असाच उभा राहिला म्हणजे एकदम तो विशाळ रूपानें प्रकट होतो. त्याची ती आकृति पहातांच कित्येक पंचाक्षरी तेथेंच मरण पावले आहेत. कांहींस तो समंध लागून ते कुजून मरण पावले आहेत. कांहींस चांगला जाणता भेटल्यानें ते मात्र बरे झाले आहेत. जाणते म्हणतात कीं, पूर्वजन्मीं राजाकडे ह्या समंधाचें कर्ज येणें होतें, तें वसूल होईपर्यंत तो निघणार नाहीं. बागेचें उत्पन्न सालीना पांच हजार रुपये आहे, मग त्या बिचाऱ्याचे राजाकडे किती रुपये असतील ते असोत."

असे त्या शिपायाचे तोंडानें सर्व वर्तमान ऐकून मनोहरपंडितास अतिशय आश्चर्य व भीति वाटली. शाळेमध्यें गुरुमुखानें या सृष्टींत भूत नाहीं अशी याची खातरी झाली होती. तशांत धैर्यशीलाच्या धाडस कृत्यानें त्या समजुतीचें पक्कें दृढीकरण झालें होतें. त्यामुळें त्यानें कल्पना केली कीं, कांहीं सृष्टिव्यापार साहजिक होत असून हे लोक त्याला भीत असतील. याकरितां एक रात्र आपण तेथें जाऊन बसावें आणि न भितां युक्तीनें खरें काय आहे याचा शोध करावा. असा विचार करून तत्क्षणीं त्यानें राजास अर्ज लिहिला. त्यांत मजकूर कीं, आपले बागेंतल्या भुताचा निर्णय मी करितों; याकरितां

मला एक दिवस रात्रीं तेथें बसण्यास परवानगी द्यावी. असा अर्ज लिहून एका शिपायास थोडें द्रव्य देऊन तो राजाकडे पोंचविण्यास सांगितलें. तो अर्ज पाहतांच राजास फार आनंद झाला. त्यास वाटलें होतें कीं, कोणाचे हातून तरी हें अरिष्ट टळो. त्यानें हजारों रुपये लावून तो बाग ऐषआरामाकरितां तयार केला असून त्यापासून एक क्षणभरही सुख न मिळतां त्यास उलटा त्रास उत्पन्न झाला होता. त्यानें तत्क्षणीं मनोहरपंडितास बोलावून नेलें. आणि त्यास सांगितलें कीं, तूं ममंध काढितों एवढीं अक्षरें उच्चारलीस इतक्या-वरूनच तुला बंदमुक्त करून तुझा गुन्हा माफ केला आहे. आतां तूं तें भूत काढण्यास मनापासून यत्न कर. जर कदाचित् तुला यश मिळालें तर मी दोन हजार रुपये बक्षीस देईन. मनोहरपंडितानेंही पुष्कळ दमाच्या गोष्टी सांगून आज रात्रींच तुमचा संशय फेडून टा-कितों, वगैरे बोलून राजाचा निरोप घेतला. त्यास मी बंदमुक्त झालों याबद्दल पुष्कळ आनंद झाला. तो राजवाड्याबाहेर पडतांबरोबर पुष्क-ळ भाविक लोक त्याजपाशीं आले, आणि तुह्मी या भरीस पडूं नका ह्मणून त्यांनीं सांगितलें. परंतु मनोहरपंडितानें त्यांचें बोलणें मनास आणिलें नाहीं. संध्याकाळ होतांच मनोहरपंडित बरोबर एक घड्याळ व सारीरात्र पुरे असें तेल व कंदील घेऊन त्या बागेंत जाऊन बसला.

मनोहरपंडित हा शरीरानें लहान बांध्याचा असून अशक्त होता. स्वभावानेंही मूळचा अत्यंत भेकड होता. परंतु दुसऱ्याच्या सांगण्या-वरून त्यानें अंगांत बळेंच धैर्य आणिलें होतें. त्यानें प्रज्वलित दिवा कंदिलांत लाविला; आणि त्या बागेंतील चउथऱ्यावर तो स्वस्थ एक बूक वाचीत बसला. अमावास्या नुकतीच होऊन गेली होती, यामुळें थोडकेच वेळानें चंद्र मावळून जिकडे तिकडे अति निबिड अंधार प-डला. तशांत बागेमध्यें अतिशय दाट झाडें होतीं यामुळें, नक्षत्रांच्या उजेडानें सुद्धां कांहीं दिसण्याचा संभव नव्हता. रात्रीचे बारा वाजले ह्मणजे कांहीं तरी होईल अशी त्यास धास्ती होती; सबब तो वारंवार घड्याळाकडे पाही. सुमारें अक्रा वाजावयाचा अंमल झाला तेव्हां गांवांतून जे लोकांचे शब्द ऐकूं येत होते ते बंद होऊन सर्व सामसूम झालें. त्या वेळेस मनोहरपंडितास भीति उत्पन्न झाली. त्यास वाटे

कीं, इकडून कोणी येईल काय? तिकडून कोणी येईल काय? मागून येऊन कोणी मला धप्पा मारील काय? अगर कोणी हा दिवा विझवील काय? इत्यादि कल्पनांनीं त्याचें मन अगदीं व्यग्र झालें; इतक्यांत वाळलेल्या पानांवरून एखादा कीटक पळत जाई, त्याचा तो भयंकर आवाज कानीं पडतांच हा अत्यंत भिऊन जाई, परंतु तो कीटक असें त्यास अखेरीस समजून त्यानें चित्त स्थिर होई. असें दोन चार वेळां झाल्यावर त्यानें कल्पना केली कीं, याच खडबडीला भिऊन पंचाक्षरी पळून जात असतील.

ऐन बारा वाजावयाची वेळ होतांच कोठेंसा एक दगड लागून तो फुटून विझला आणि लागलीच ज्या कोंपऱ्याविषयीं लोक सांगत होते त्याच कोंपऱ्यांत मोठा जाळ झाला. तो पाहतांच मनोहरपंतांचें काळीज धडधडां उडूं लागलें! ते समयीं मनोहरपंडितानें विचार केला कीं, गंधक आणि दुसरे कांहीं पदार्थ पृथ्वीमध्यें एकत्र होऊन जाळ झाला असेल. इतक्यांत गगनचुंबित पिशाच्याची आकृति दृष्टीस पडली. ती पाहतांच याची जी अवस्था झाली ती सांगतां येत नाहीं!! यानें पलायन करण्याचा बेत केला, परंतु पुन्हा विचार केला कीं, पळून गेलें असतां दचका पोटांत राहून त्यापासून आजारी पडण्याचा प्रसंग प्राप्त होईल. याकरितां वातावरणामध्यें कांहीं फरफार होऊन ही आकृति दिसली असावी, असें अनुमान करून धैर्य धरून तो तिजकडे एकसारखा पाहूं लागला. कांहीं वेळानें तें पिशाच लहान रूप धारण करून याजकडे येऊं लागलें. तेव्हां तो अगदींच घाबरला! परंतु त्यानें मनाचा निग्रह केला कीं, जें होईल तें होवो, ही जागा कांहीं सोडावयाची नाहीं. प्रतिक्षणीं हा समंध माझ्या मानेवर बसेल असें त्यास वाटे. समंधानेंही हा निग्रही आहे जाणून किंचित् पड घेतली. मग कांहीं वेळ सर्व चेष्टा बंद झाल्या, आणि दुसऱ्याच एका कोंपऱ्यांत तो उत्पन्न झाला, आणि "खाईन, खाईन" असे शब्द मोठ्या सपाट्यानें ओरडला. तथापि हा भिऊन पळत नाहीं असें पाहून समंध पुनः गुप्त झाला. थोडा वेळ गेल्यावर पुनः जाळ झालें व गगनचुंबित आकृति दिसली. ती घटकेंत पांढरी, घटकेंत काळी अशी दिसे व याजकडे येऊं लागे.

परंतु ती फिरून आपोआप मागें जाई. असें पाहून मनोहरपंडितास वाटलें कीं, हें पिशाच मला भितें खचित; याला माझे अंगावर चालून येण्याची हिम्मत होत नाहीं. याकरितां आपण जेथें जाळ होता-हेत, व ही जगड्वाळ आकृति दिसत आहे तेथें जाऊन पहावें. असा विचार करून भीत भीत त्या जागेजवळ गेला. तो अगदीं भेदरला आहे असें भूताचे लक्ष्यांत येतांच त्यानें मनोहरपंडिताचे पाठीशीं आपलें स्वरूप एकदम प्रकट केलें, आणि त्यास वरचेवर उचलून व एका कांबळ्यांत त्याची मोट बांधून, त्या स्थळापासून तीन कोशांवर जंगलांत एका खाड्यांत नेऊन टाकिलें!

दुसरे दिवशीं प्रातःकाळ होतांच राजा, बरोबर शिपाई वगैरे घेऊन मनोहरपंडिताचा समाचार घेण्यास आला तों तेथें मनोहरपंडित दिसला नाहीं; सबब दुसरे पंचाक्षऱ्याप्रमाणें हाही पळाला असेल, अशी कल्पना करून त्याचे विऱ्हाडीं शोध घेण्यास शिपाई पाठविले, तों तो तेथेंही नाहीं. असें झाल्यावर सर्वांनीं कल्पना केली कीं, समंधानें त्यास भस्म केलें असेल, अगर कोठें डोहांत अथवा विहिरींत फेंकून दिलें असेल. नंतर सर्व बोलूं लागले कीं, भूत फार भयंकर आहे. मोठमोठे पंचाक्षरी त्यापुढें थकले, तर असल्या इंग्रजी शिकलेल्या पाखांड्याचें तेथें काय चालणार आहे! असें ह्मणून गरीब ब्राह्मण विनाकारण प्राणास मुकला असें हळहळत राजा व दुसरे शिपाई वगैरे लोक आपापले घरीं निघून गेले.

# भाग २.

## सेशनचा मोकद्दमा.

मनोहरपंडितास त्या पिशाच्यानें उचलून ज्या खड्ड्यांत टाकिलें होतें तो खड्डा अगदीं जंगलांत होता. त्याच्या आसपास तीन चार कोस गांव नव्हता. भोंवतालीं करवंदीचीं व बोरीचीं वगैरे पुष्कळ झाडें होतीं. मोठमोठाले डोंगर कडे तुटलेले आसपास होते, व तिकडे मनुष्यांची येण्याजाण्याची रहदारी नव्हती. त्या खांचेंत मनोहरपंडित सहा दिवस होईपर्यंत पडला होता. नंतर कांहीं गुराखी गुरें चारीत चारीत त्याच्या आसपास आले व एकजण बोरें तोडण्याकरितां त्या खड्ड्याच्या नजीक आला. त्यानें ती मनोहरपंडिताची मोट पाहून आपल्या सोबत्यांस बोलावून आणिलें. त्यांनीं काय आहे तें पाहण्याकरितां मोट सोडून मनोहरपंडितास मोकळें केलें, आणि पाहतात तों मनोहरपंडित अगदीं मूर्छित झालेला दिसला; त्यास मुळींच कांहीं भान नव्हतें. त्या वेळेस त्या कुणब्यांस त्याची दया येऊन त्यांनीं त्यास आपल्या घरीं नेलें. तेथें गेल्यावर मनोहरपंडित घटके घटकेनें दचकून लटलटां कांपे आणि "आले, आले! धरिलें, धरिलें!" असें म्हणें म्हणें बेशुद्ध होऊन बडबडे. त्यावरून ते कुणबी समजले कीं, यास भूत लागलें आहे. नंतर त्यांनीं एक प्रसिद्ध जाणता पंचाक्षरी त्याच्या अंगांतील भूत काढण्यासाठीं आणिला. त्यानें डोळ्यावर शेंदरानें पट्टे ओढिले होते. डोक्यास जटा व कपाळीं भस्म लाविलें होतें. गळ्यासही पुष्कळ भस्म माखलें होतें. दंडावर एक लोखंडी भारदस्त कडें घातलें होतें. असा तो हातांत एक वेताची छडी घेऊन मनोहरपंडिताजवळ आला. त्यानें लिंबें, डाळिंबें, उद, एक बकरें, एक कोंबडें, आणि एक मोहोरभर दहींभात इतकें सामान मागविलें. पंचाक्षरी बोवांच्या मुद्रेवरून, व त्यांच्या मोठमोठ्या गप्पांवरून, मनोहरपंडितास व दुसऱ्या लोकांस वाटलें कीं, उद्यां सकाळपावेतों भूत नाहींसें होऊन तो बरा होईल. त्यानें प्रथम छडी हातांत घे-

ऊन मनोहरपंडिताकडून अपधाकानें बोलविलें कीं, मी अमलपुरीचे राजाचे बागेंतील पिशाच आहे. हें झाड धिटाईनें माझा अपमान करून मजपुढें आलें, याकरितां मीं यास धरिलें आहे. त्यावर पंचाक्षरी ह्मणाला, " आतां तूं या झाडाला सोडतोस कीं नाहीं? कां या बाटलींत कोंबून तुला या खांचेंत पुरून टाकूं ? " पिशाच घाबरून ह्मणतें, "नको नको, मी सोडतों. " पंचाक्षरी ह्मणतो. " वाहा मारुतीची शपथ, नाहीं तर काढलीच पहा बाटली, " ( एक बाटली काढितो. ) ती पाहतांच पिशाच्यानें शपथ वाहिली. नंतर पंचाक्षऱ्यानें त्याजवरून, ते आणलेले पदार्थ ओंवाळून बकरें व कोंबडें त्याचे नांवानें मारलें, निंबें कापलीं व तोंडानें मंत्र वगैरे ह्मणून मनोहरपंडिताची खातरी केली कीं, आतां आपल्या अंगांतून भूत खचित् गेलें.

असें झाल्यावर त्याच्या पोटांतील भीति व धास्ती जाऊन तो शुद्धीवर आला. त्या गोष्टीनंतर सुमारें एक आठवड्यानें त्याचा आजार बरा होऊन, तो पहिल्याप्रमाणें झाला. इतके दिवस पथ्य वगैरे घेण्यास, व पंचाक्षऱ्यास बक्षीस देण्यास, आणि त्यांचे सामानास मिळून जो खर्च झाला तितका फेडण्यास, व त्या कुणब्याचे आभार मानून त्यास खुष करण्यास, मनोहरपंडितास आपल्या बोटांतील एक अंगठी मोडावी लागली. त्याचे बरोबर आणिलेलें द्रव्य आणि सामान सर्व अमलपुरीस राहिलें होतें. त्या संबंधाची याचे मनांत इतकी भीति बसली कीं, अमलपुरी हें नांव कोणीं उच्चारलें तर मनोहरपंडिताचे अंगास कांटा येई; यामुळें तिकडे जाण्यास याचें धैर्य होईना. शेवटीं आपण रस्त्यानें भिक्षा मागत जाऊं, परंतु अमलपुरीकडे पुनः जाणें नको, असा निश्चय त्यानें केला. नंतर त्यानें त्या कुणब्याचें गांव सोडून, पद्मनयनेस आणि धैर्यशीलास शोधण्याच्या उद्योगास आरंभ केला. त्यास किंचित् धैर्यशीलाचा शोध लागल्यावरून त्यानें तें नेटिव संस्थान सोडलें, आणि तो इंग्लिशसरकारचे प्रांतांत आला. तो पायीं दररोज पांच सहा कोशांची मजल करी. त्यानें बेत केला कीं, याप्रमाणें आणखी एक महिनाभर आपले स्नेह्याकरितां दुःख भोगूं. आणि तितक्यांत जर शोध न लागला तर विचित्रपुरीस माघारे जाऊं.

असा तो फिरत असतां एके दिवशीं मध्याह्नकाळीं एका अति लहान खेड्यांत रात्रीं मुक्कामास उतरला. त्या गांवांत सर्व गवती घरें होतीं. गांवच्या मध्यभागीं एक मारुतीचें देऊळ होतें. तेथें मुसाफरांस उतरण्यास जागा होती. गांवामध्यें वाण्याचें दुकान वगैरे कांहीं नव्हतें. मनोहरपंडित त्या मारुतीच्या देवळांत जाऊन उतरला. व त्यास फराळास तेथें कांहीं न मिळाल्यामुळें तो उपाशींच निजून राहिला. त्या देवळांत ढेकूण व चिलटें फार झालीं होतीं. व आसपासच्या जाग्यांत कोठें उंदीर मेलेला होता त्याची अत्यंत दुर्गंधि सुटली होती. त्यामुळें मनोहरपंडितास झोंप येईना. याशिवाय दुसरे मुसाफर तेथें उतरले होते. त्यांच्याशीं वेळ जाण्यासाठीं तो गोष्टी बोलूं लागला. दुसरे मुसाफर आडाणी जातीचे होते; त्यास त्या चिलटांत आणि ढेकणांत निजण्याची सवय होती. सबब ते त्या पाणीस न जुमानून स्वस्थ झोंपी गेले. तो दिवस उन्हाळ्याचा होता. त्यामुळें देवळांत गरमीही फार होऊं लागली; व त्या दिवशीं पौर्णिमा होती म्हणून बाहेर चांदणें स्वच्छ पडलें होतें. याकरितां तो उठला आणि बाहेर चांदण्यांत येऊन बसला. येथें येतांच वाटेच्या श्रमामुळें त्यास झोंप येऊं लागली म्हणून पुन्हां देवळांत जाऊन अंथरुणावर निजला. अंथरुणावर गेले म्हणजे त्यास झोंप येत नसे म्हणून बाहेर येऊन बसावें आणि बाहेर झोंप येऊं लागली म्हणजे पुनः आंत जाऊन निजावें. असें दोन तीन वेळां झालें. आणि प्रत्येक वेळेस ते दुसरे मुसाफर कोण आलें म्हणून याच्या चालण्यानें जागे होऊन याकडे पहात.

सुमारें दोन प्रहर रात्र आली. त्या वेळेस मनोहरपंडित बाहेरील ओट्यावर चांदण्यांत बसला असतां, एका घरामागून लपत छपत एक स्त्री बाहेर पडली. ती थबकत थबकत आडून आडून येऊन मनोहरपंडिताचे समोरच्या गवती घराचे एके बाजूस गेली, आणि त्या घरा वरील गवताशीं कांहीं खडबड करून मागच्या पायीं आल्या मार्गानें निघून गेली. तिणें मनोहरपंडितास मुळींच पाहिलें नाहीं. मनोहरपंडितानें मात्र तें सर्व कृत्य अवलोकिलें; परंतु तेथें जाऊन तिणें काय केलें हें त्यास कळलें नाहीं.

तो तेथें बसण्यास कंटाळून आंत जाऊन पडावें या उद्देशानें उठला

आणि त्या समोरच्या घराजवळ जाऊन पाठमोरा लघवी करीत बसला. इतक्यांत तें घर एकाएकीं पेटून एकच भडका झाला, आणि आंतील कुणबी मोठ्यानें ओरडत बाहेर पडले. तें अरिष्ट पाहून मनोहरपंडित धावऱ्या धावऱ्या उठून देवळांत पळूं लागला. इतक्यांत एका कुणब्यानें त्याचे पाठींत लाथ मारून त्यास पकडलें. आणि आगलाव्या चोर धरलारे धरला, ह्मणून मोठ्यानें आरोळी ठोकली. त्या वेळेस दुसरे लोक धांवत येऊन त्यांनीं मनोहरपंडितास पक्कें धरून ठेविलें. त्या दिवशीं वारा मोठा सुटला होता त्यामुळें एकून एक घर पेटून सर्व गांव जळून खाक झाला. त्या कुणब्याचें पुष्कळ नुकसान झालें. एक गाय, दोन ह्मशी, चार बैल, एक ह्मातारी आणि मुलगें, यांस बाहेर पडण्यास रस्ता न सांपडल्यामुळें तीं आंतल्या आंत जळून मरण पावलीं.

दुसरे दिवशीं सर्व लोक मनोहरपंडितावर दांत खाऊं लागले. कित्येक शीघ्रकोपी होते त्यांनीं तर त्यास ताडन करण्यास आरंभ केला. तो कोणासही अन्याय न वाटतां सर्वच मोठ्या रागानें त्यास मारूं लागले. नंतर चौकशी करूं लागले तों देवळांतील मुशाफरांनीं साक्ष भरली कीं, त्याच्या रात्रीच्या सर्व हावभावांवरून हा याच कामीं गुंतला होता अशी आमची खात्री आहे. याप्रमाणें साक्षीमुद्यानिशीं पुरावा झाल्यावर, पाटलानें तत्क्षणीं खटला तयार करून साक्षीदारांसह फौजदाराकडे रवाना केला. त्यानें पुरावा पुरता आहे असें पाहून म्याजिस्ट्रेटाकडे पाठविला. याप्रमाणें फिरत फिरत अखेरीस ( मनोहरपंडित ) फांशीच्या शिक्षेस योग्य आहे असें ठरून तो मोकद्दमा सेशन कामिट झाला. ते समयीं मनोहरपंडितास अतिशय दुःख होऊन तो परमेश्वराची प्रार्थना करूं लागलाः—

पद

( सं० सी० लमाला जातों मी द्वारका पुरा या चा० )

॥ देवा हें संकट मज आणिलें कसें ॥
॥ पडलों मी दैवहीन लोक हे असे ॥ ध्रु० ॥
॥ नसतां अन्याय लेश ॥ व्यर्थचि हे बहुत क्लेश ॥
॥ ज्ञाता तूं सकल ईश ॥ दिसती मज कालपाश ॥
॥ कोठें मम धैर्यशील जाउनी बसे ॥ देवा हें० ॥१॥

असो शेवटीं कोर्टांतील जज्जानें साक्षीदारांच्या जबान्या व फिर्यादीशीं सर्व कारणें लक्ष्यांत आणून विचार केला कीं, कैदी गुन्ह्यास अगदीं नाकबूल आहे, याकरितां यास उलटे सुलटे प्रश्न घालून खऱ्याचा निर्णय करावा. सबब त्यानें कैदीस बोलाविलें. मनोहरपंडितानें लज्जेमुळें मुख आच्छादन केलें होतें. त्याच्या सर्व शरीरास काळिमा आली होती, व सर्व अंग लटलटां कांपत होतें. त्याच्यानें सभेच्या अगर ज्यूरींतील कोणत्याही गृहस्थाच्या मुखाकडे पाहवेना. आपला मरणकाळ समीप आला असें त्यास वाटून तो अत्यंत खिन्न होत्साता अधोवदन करून स्तब्ध उभा राहिला. त्याचे मनामध्यें जज्जापुढें पदर पसरून व गुडघे टेकून आपली खरी हकीकत सांगावी असें आलें; परंतु मागील सर्व न्यायाधीशांसमोर त्यानें तसें करण्याचा यत्न केला असतां, त्यापासून कांहीं फायदा न होतां, उलटें यास शिपायांनीं मारून क्लेश मात्र दिले होते. यामुळें त्याच्यानें तसें करवेना. इतक्यांत जज्जानें त्यास सवाल केला, "त्वां आग लाविली कीं नाहीं?" कैदी ह्मणाला, "मी नाहीं लाविली महाराज, आणि ईश्वराच्या न्यायानें हें अगदीं सत्य आहे." जज्ज ह्मणाला, "तर हे साक्षीदार सांगतात हें कसें?" त्या वेळेस तो सर्व खरें वर्तमान सांगूं लागला.

जरी जज्जानें त्याचें मुखावलोकन केलें नव्हतें, तथापि त्याचें भाषण ऐकतांच त्यास अतिशय आनंद झाला. तो मध्येंच मनोहरपंडितास थांबवून ह्मणाला, "तुझें मूळचें वस्तीचें गांव कोणतें तें सांग पाहूं!" मनोहरपंडित ह्मणाला, "चांशहाणपूर महाराज." "बरें, तुझ्या पित्याचें व स्नेह्यांचीं नांवें सांग." असें जज्जानें विचारल्यावर मनोहरपंडितानें सर्व सांगितलें. तें ऐकतांच जज्जाच्या अंगावर रोमांच उभे राहून त्याचे डोळ्यांवाटे अश्रुधारा चालल्या. तो तत्क्षणीं उठला आणि मनोहरपंडिताच्या तोंडावरील पदर चांगला एका बाजूस सारून त्याचें मुख वर करून ह्मणाला, "मनोहरपंडिता, अरे तूं असल्या महत्संकटांत पडला आहेस काय?" तें ऐकून मनोहरपंडित जज्जाचे तोंडाकडे पाहून ह्मणतो, "अहाहा! परमेश्वरा, माझ्या निरपराध्याचें संकट निवारण करण्यासाठीं धैर्यशीलाच्या रूपानें तूंच येथें

प्रकट आला आहेस काय ? " त्या उभयतांच्या नेत्रांवाटे अश्रुधारा चालल्या. बारा वर्षे लोहपिष्ट भक्षण केलेल्यास भगवंताची चतुर्भुज मूर्ति पाहून जो आनंद होतो, व जशी त्याचे मनाची स्थिति होते तशी मनोहरपंडिताची झाली. त्यानें धैर्यशीलास साष्टांग नमस्कार घातला, आणि तो ईश्वराची स्तुति करूं लागला. धैर्यशीलानें प्रथम मनोहरपंडितास विचारलें कीं, पुष्पशीलाची व श्यामसुंदराची अवस्था कशी आहे ? त्यावर ते सर्व खुशाल आहेत, व पद्मनयना चोरीस गेल्यामुळें आह्मी दोघे तिचा शोध लावण्याकरितां फिरत असतां हें विनाकारण संकट मजवर उत्पन्न झालें. इत्यादि मनोहरपंडिताचें भाषण ऐकतांच आपले सर्व स्नेही खुशाल आहेत असें वाटून धैर्यशीलास अतिशय आनंद झाला.

नंतर कायद्याप्रमाणें मनोहरपंडिताची जबानी घेतली. त्यानें लिहून दिलें कीं, मी चिलटांच्या त्रासामुळें आंतबाहेर जात होतों, यावरून साक्षीदारांनीं मींच आग लाविली अशी कल्पना केली आहे. आणि एका दुष्ट स्त्रीनें आग लाविली असून, आग लागण्याच्या समयास मी सहजगत्या तेथें लघवीस बसलों होतों इतकें त्या घराच्या मालकानें पाहिल्यावरून हा मोकद्दमा खरा असें सर्वांस वाटलें आहे. इत्यादि त्याची जबानी झाल्यावर ज्यूरींतील पंचांसही वाटलें कीं, हा मुशाफर मार्गक्रमण करीत असतां त्या खेड्यांत उतरला असून, यास त्यापासून कांहीं एक फायदा नसतां यानें आग लाविली हें ह्मणणें अगदीं गैरशिस्त आहे; परंतु एवढ्याच प्रमाणावरून कैदीस सोडण्यापेक्षां ज्या स्त्रीनें आग लाविली तिचा युक्तीनें शोध लाविला, अगर तशा संबंधाचा कांहीं पुरावा सांपडला तर ही गोष्ट कायदेशीर व सर्वमान्य होईल.

नंतर त्या स्त्रीनें तरी काय उद्देशानें आग लाविली असावी, याविषयीं ते सर्व विचार करूं लागले. मोकद्दम्याच्या तारखेवरून त्या दिवशीं पूर्णिमा व शनिवार होता. आणि मनोहरपंडिताच्या सांगण्यावरून तिणें ऐन दोनप्रहर रात्रीं आग लाविली असें सिद्ध झालें. याप्रमाणें पुरावा होतांच आग लावण्याचें कारण पंचांच्या लक्ष्यांत आलें. ते जज्जास ह्मणाले, महाराज, या देशांत शनिवारीं,

आदित्यवारीं अगर मंगळवारीं अमावास्या किंवा पूर्णिमा आल्यास, दोनप्रहर दिवसास अगर रात्रीं दुसऱ्याचे घरास आग लाविली असतां मुलगा होतो. अशा वेड्या समजुतीनें वंध्या स्त्रिया दुसऱ्यांचीं घरें जाळीत असतात. त्याप्रमाणेंच हेंही कृत्य झालें असावें. इतकें बोलणें झाल्यावर मोकद्दमा फैसल करण्याची तारीख दुसरी नेमून कचेरी बरखास्त झाली.

मनोहरपंडितास पहातांबरोबर धैर्यशीलाचे विचार पुनः आपल्या मित्राकडे, शहराकडे आणि राज्याकडे लागले. विचित्रपुरी सोडल्यापासून तो शुद्ध भ्रमिष्टासारखा झाला होता. जरी तो मोठ्या हुद्यानें सरकारी काम करी, तथापि त्यास आपल्या मित्रांची आठवण झाली म्हणजे सर्व शून्यवत् भासे तो पगार आला म्हणजे गरीबगुरीबांस वांटून टाकी. व कोणत्याही सुखोपभोगाकडे लक्ष्य देत नसे. परंतु ह्या दिवसापासून त्याची वृत्ति आनंदमय होऊन तो ऐहिक सुखाकडे लक्ष्य देऊं लागला.

पुढें मनोहरपंडितावरचा आरोप चालविण्यास कायदेशीर पुरावा काय करावा म्हणून धैर्यशीलास मोठें संकट पडलें. एके दिवशीं आदित्यवारीं चारावर दोन वाजण्याचे सुमारास धैर्यशील, ज्या वाड्यांत उतरला होता, त्या वाड्यांतील चौकाच्या बाजूकडील खिडकीस वाळ्याचा पडदा लावून त्याचे जवळच खिडकीच्या तोंडाशीं पुस्तक वाचीत बसला असता. तेव्हां चौकामध्यें एक सरोदा म्हणजे जोशी आला. त्यानें पायघोळ अंगरखा घातला होता; शिपाईगिरी पागोटें बांधून त्यावर एक हातरुमाल बांधला होता; तो मोठाल्या कांठाचा जुना रेशीमकांठी धोतरजोडा दुहेरी नेसला होता; त्यानें डोळ्यांवर शेंदराचे पट्टे मारले होते, व कुंकाचा भव्य मळवट कपाळावर भरला होता. बायकांचीं जुनीं लुगडीं, चोळ्या, अंगरखे, बंड्या, टोप्या व धोतरें एकास एक बांधून तीं शालजोडीसारखीं डावे हातावर घेतलीं होतीं. तो चौकांत येताच बोलूं लागला, " या वाड्याचें यंदां भाग्य उघडेल; या वास्त्यांत लक्ष्मी वास करील; मागील चार साल जरा खरतर होतीं, पण आतां यजमानाचें नशीब खुलणार आहे. मालकाचें तपलें भरेल व दोंद मोठें होईल. " असें त्याचें भाषण ऐकून धैर्यशीलास

तुम्ही आल्या लंके, प्रबळ भय, चिंता; सुख पळे,
निदानीं हा झाला कळस, विधिचा लेख न टळे. ॥ ३२
रमानाथा! लावी विघड पतिसीं योग करणें,
जिवा शीवा ऐक्यें निरसि ममता देह करणें, ।
नये जन्मा ऐसी उचित उभयां मुक्ति बरवी
कृपासिंधू! द्यावी अचलसुख सायुज्य[1] पदवी." ॥ ३३
म्हणे राम, 'पुत्री! असि प्रेमवाणी तुझ्या ग्लानिनें चित्त खेदासि आणी, ।
रणांतूनी कोणी जिता नाहिं गेला, शिरा आणिलें, हा कसा तर्क केला?' ॥ ३४
म्हणे सुंदरी, 'रामचंद्रा! दयाळा! पतीची भुजा ये घरा, लोकपाळा! ।
तिनें लेहुनी दाविल्या सर्व गोष्टी, म्हणूनि प्रभू! पाहिले पाय दृष्टी. ॥ ३५
दावी काढुनि पत्रहस्त पतिचें, आश्चर्य वाटे मना,
तैं रामा! म्हणती अचेतन करें केलें कसें लेखना?' ।
बोले राम तया, 'अपार महिमा पातिव्रताचा असे,
सत्वें जी प्रति पावला भुज घरीं तैं लेख मिथ्या नसे.' ॥ ३६
बोले सुग्रिव वर्णिल्या श्रुतिमुखें त्या थोरथोरांस ती,
'केला लेख असा अचेतन करें, संदेह[2] पावे मती, ।
त्याची ती प्रचिती जरी पतिशिरा हे हासवी या स्थळीं,
मानूं लेख खरा' म्हणे 'रघुपते! फेडा मनाचा मळी.' ॥ ३७
सेनापती कथितसे ऋषभा खुणेनें, तैं आणिलें लुळत लोंबत शीर तेणें; ।
झोंट्या[3] सलंब रुधिरें[4] भिजल्या समग्रा, दाढी मिशा संवन पिंगटवर्ण उग्रा. ॥ ३८
धगागी जसी आगिटी वामचक्षु, निवाला दुजा राम भेटी मुमुक्षू, ।
महाभ्यासुरा दंतदाढा[5] कराळा[6], बिभित्सा मुखा त्या धरी जीभ लाळा. ॥ ३९
केशीं धरी ऋषभ त्या फिरवीत आणी, तो आपटी तिजपुढें, धरणी दणाणी; ।
मोहें सती उचलि पल्लव ते पुसाया, 'मी वाचलें' म्हणतसे 'मुख हें पहाया.' ॥ ४०
नेत्रींहुनी टपटपा जलबिंदु आले, चोळी भिजूनि हृदयीं कुच तिंव्र झाले; ।
बोले सगद्गद लघू, जन वक्र पाहे, जेव्हां करीत जगदीश अवकृपा हे. ॥ ४१

---

१. चार मुक्तींतील शेवटची मुक्ति. ह्या मुक्ति अशा:–सलोकता, समीपता, स्वरूपता व सायुज्यता. उपास्य देवतेच्या लोकीं राहणें ती सलोकता; उपास्य देवतेच्या संनिध राहणें ती समीपता; उपास्य देवतेचें व आपलें स्वरूप व गुण सारखे होणें ती सरूपता आणि उपास्य देवतेमध्यें (ब्रह्मीं) मिळून लीन होणें ती सायुज्यता. २. मळमळ, संशयवृत्ति. ३. केंसाचे पिंजारे. झोंटी=डोईचे लांब केश. ४. रक्तानें. ५. दाट. ६. भयंकर, उग्र.

'अद्यापि बंधन घरीं सुरलोकपाळां, नामें प्रताप उठवी थरकांप काळा; ।
त्या मस्तका करिति मर्कट हेळना हे, कर्मे कसे घडुनि आणिलि वेळ बा! हे!' ॥ ४२
पुसोनी शिरातें सती घेत देवी मही मांडुनी उत्तरीं नीट ठेवी, ।
म्हणे, 'भेटिची फार होती असोसी, तुम्हांवेगळी ते घटी कोण सोसी? ॥ ४३
प्राणेश्वरा! न पुसतां मज वीरवेशा, गेलां कसे कटकिं जी! करुनी विदेशा? ।
जीतां मशीं परम आदर भाव माया त्याचा अभाव, मिळतां दुसरी रमाया. ॥ ४४
हीन स्वभाव पुरुषा तरुणी परावी, देखूनियां भलति लालुच ते करावी; ।
आहे घरीं इहुनि सुंदर नाठवीती, संगें तिच्या घडिभरी मन वाढवीती. ॥ ४५
मी नाठवे, सति गळीं पडतां विरश्री, लाजों नका, संमुख नीट करा मुखश्री; ।
आलिंगितां घरनिधी पतिला उबारा झाला म्हणोनि करि शीतल मंद वारा. ॥ ४६
जीता विनोद रसहास्य किजे पतीनें, मी रूसल्या समजवां बहुतां रितीनें; ।
तो मोह आजि कवण्या उदकीं बुडाला? कीं या शिरासकट तोहि शरें उडाला. ॥ ४७
अत्यंत मी अवगुणी अपराधरासी, दासत्व पैं चरणिंची करणार दासी; ।
सोडोनि मौन्य रुसणें पतिहास्यभावें, माझें सतीपण किजे सकळांसि ठावें. ॥ ४८
पाहे रघूत्तम सभा बहु वानरांची यानें नभीं पसरलीं सकळां सुरांची; ।
दोहींकडे पिशुन पाहति सत्व माझें, येऊं न द्या जिवलगा! अपमान वोझें. ॥ ४९
सौमित्रि दे समरिं अक्षय मोक्षसिद्धी, गेल्या लया सकळ संस्मृति द्वंद्वबुद्धी; ।
आनंदमग्न पडिलां मुखिं मौन्य मुद्रा, माझी कशी गतिपुढें करुणासमुद्रा! ५०
आजन्म इच्छित दिले मज लाडकोडें कां आजि मौन्य पडलें? नकळेचि कोडें; ।
मी किंकरी पदरजीं, न करा उपेक्षा, स्वामीविना कवण ते पुरवी अपेक्षा? ॥ ५१
हांसे न शीर करुणा करितां विलोकी बोले विनोद चडतां पति स्वर्गलोकीं ।
येऊनि बंधु अखया अतिकाय माने ते भेटले सकळही धडनाककाने. ॥ ५२

---

१. हव्यास, प्रबळ इच्छा. २. या श्लोकाचें वृत्त 'वसंततिलक'. याचें लक्षण:–'अभिज्ञातं तभजजैरंतासक्तगुरुद्वयम् । चतुर्दशाक्षरं वृत्तं **वसंततिलकं** विदुः ॥ २९ ॥ [सुवृत्ततिलकम्–प्रथमविन्यासः], **वसंततिलक**स्यामे साकारे प्रथमाक्षरे । ओजसा जायते कांतिः सविकासविलासिनी ॥ २० ॥ आकारेऽपि कृते पूर्वं बंधेऽल्पपदपेशले । **वसंततिलकं** धत्ते निर्मेथि रमणीयताम् ॥ २१ ॥ [सुवृत्ततिलकम्–द्वितीयो विन्यासः] **वसंततिलकं** भाति संकरे वीररौद्रयोः । कुर्यात्सर्गस्य पर्यंते मालिनीं द्रुततालवत् ॥ १९ ॥' [सुवृत्ततिलकम्–तृतीयो विन्यासः]. ३. सैन्यांत. ४. वीरश्री हीच सती गळ्यांत पडतां. येथें वृत्तसुखार्थ 'वीरश्री' शब्दांतील प्रथमाक्षर लघु केलें आहे. ५. संमुख. ६. सुप्रसिद्ध. ७. वाहनें. ८. नीच, दुष्ट. ९. भेदबुद्धि. १०. इच्छा. ११. अक्ष. (रावणपुत्र.)

**गो०**—( झटकन उठून पुन्हां बाहेर येतो. ) नको नको बाबा, असें अघटित कर्म नको, त्यापेक्षां पोर नाहीं आलें तरी बेहत्तर आहे. दुसऱ्याच्या तळतळाटानें देव आमचें काय बरें करणार आहे ! !

**रा०**—( नवऱ्यावर रागावून. ) तुमचें भलतेंच ! जन्मापासून देवाला भिऊन भिऊन वागलां त्यानें काय तुमचें बरें केलें ?

**गो०**—( तिच्या पुढें हात करून. ) अग, तुला कांहीं समजतें का ? हे देवऋषि लोक आपलें पोट भरण्याकरितां कांहीं तरी सांगतात, त्यावर कसचा तूं विश्वास ठेवितेस ? एक सच्चिदानंद परमेश्वर आहे त्यावर भरंवसा ठेवावा, मग जें होणार तें होईल.

**रा०**—( जोशाकडे पाहून. ) यांनीं असेंच करकरून सगळें घालविलें. कांहीं उपाय करूं देऊं नये, कांहीं नेम करूं देऊं नये; अक्षय देवावर भरंवसा ठेवा ! देवावर भरंवसा ठेवा ! गेला मेला चुलींत तो देव ! ! ! ( असें बोलून रागानें तोंड फिरवून जाते. )

**गो०**—( रागावून जोशाजवळ येतो. ) दाखीवर या गोष्टीला प्रमाण काय तें दाखीव. नाहीं तर लिहून दे की, असें करून पुत्र न झाल्यास अमुक रुपये दंड देईन.

**जो०**—(उठून जाऊं लागतो.) न का होईना तुह्मास पोर, सातजन्म वांझोटे राहिलां तर मला काय रडू यावयाचें आहे ! ' ज्याचें करावें बरें तो ह्मणतो माझें कर मरें ! '

**रा०**—खरेंच बाबा, तूं कशाला लटकें सांगशील. तुला त्यांत काय मिळावयाचें आहे ! यांची ह्मातारपणीं बुद्धि चळून चालली आहे!

**गो०**—( त्रासानें. ) जाळा ! लोकांचीं घरें जाळा ! काय पाहिजे तें करा ! ( इकडे तिकडे फिरूं लागतो. )

**जो०**—( पुनः येऊन बसतो. ) बया, म्यां तुला एकदां बहीण ह्मटल्यावर दुसरी गोष्ट नाहीं. या गोष्टीस प्रमाण असल्याशिवाय मी बोलतों ? झुंसार गांवचा राघोजी डांगऱ्या, त्याला साठ वर्षांचें वय होईपर्यंत पोर होईना. त्याच्या बायकोनें हजारों उपाय केले, पण म्यां तिला सांगितल्यावरून तिनें हाच उपाय केला, तों लागलाच पोटांत गर्भ राहिला. आतां तो मुलगा चौपांचां वर्षांचा असेल. तसेंच मानाजी मुकणे, नानासाहेब वांकनीस, रामदेवराव देशमुख,

गो०--अरे, जा जा ! आतां शहाणा झालास. लागला बेटा हळूहळू पाय पसरायाला !

जो०—( राधाबाईकडे पाहून. ) बया, एवढी आस राहिली. तो विठोबा तुझें कल्याण करील. पुढल्या वर्षी तुझा मुलगा तान्हा पहायास मी येथें येईन. एक पिंगळ्याची वाणी खरी, कीं जोशाची खरी. मी पिंगळा बोलतों, तो शंभुमहादेव तुझें काम फत्ते करील. मीं मागितलें तेवढें करून तर पहा. जा, एका फाटक्या वस्त्राकडे नको पाहूं. मला जोशाला दिलें तर भगवान् तुझें बरें करील.

राधा०--( एक जुनें लुगडें आणून त्यास देते. ) जा, आतां. आज वर्षाभरां खचित् ये बरें. ( जोशी चालता होतो. )

याप्रमाणें त्यानें आपण धैर्यशीलानें अक्षरशः ऐकलें. अपृतजी पाटलाच्या बायकोनें अंगारगांवास आग लाविली असें जेव्हां जोशी बोलला, त्याच वेळेस धैर्यशीलानें दोन शिपायांस बोलावून सांगितलें कीं, तुह्मी दरवाज्यापाशीं जाऊन बसा, आणि जोशी बाहेर पडूं लागला ह्मणजे त्यास कैद करा. ते हुकुमाप्रमाणें दरवाजापाशीं बसल्यावर अर्ध घटकेनें जोशी बाहेर आला. त्याला त्या शिपायांनीं तत्क्षणीं कैद करून पोलिसचौकीत ठेविलें. मनोहरपंडितावरचा आरोप उडविण्यास हा साक्षीनिशीं जबरदस्त पुरावा सांपडला. नंतर धैर्यशीलानें अपृतजी पाटील, व त्याची बायको निसंताई या उभयतांस कैद करून आणिलें. व गांवांतील मुख्य मुख्य लोक बोलाविले. नंतर नेमलेल्या तारखेस मोकद्दमा पुन्हा सुरू केल्यावर प्रथमतः गोविंदभटास धर्माप्रमाणें शपथ घालून विचारलें. त्यानें जोशी बोललेला कच्चा मजकूर जबानींत लिहून दिला. त्यानंतर राधाबाईची जबानी आली. तिनें किंचित् उडवाउडव मांडली होती; परंतु धैर्यशीलानें मुद्याच्या गोष्टी विचारल्यावर तीसही सर्व कबूल करणें प्राप्त पडलें. पुढें अपृतजीस व निसंताईस ही गोष्ट विचारतां आह्मांस कांहीं माहित नाहीं, व जोशीही आह्मीं पाहिला नाहीं असा साफ जबाब त्यांनीं दिला. जोशाची जबानी घेतां त्यानेंही मला कांहीं माहित नाहीं असें लिहून दिलें; परंतु इतकें मात्र कबूल केलें कीं, राधाबाईचा भाव मजवर बसावा ह्मणून म्यां हवीं तीं नांवें

घेतली. त्यांत अपूनजींनींही घेतलें; परंतु वास्तविक रीतीनें अंगारगां-
वहि स्या अजून पाहिला नाहीं. असें तो बोलला.

अशी जोशाची जबानी होतांना ज्यूरीच्या लक्ष्यांत आलें कीं, हा महाठक आहे. कारण, जर यानें अंगारगांव मुळींच पाहिला नाहीं तर यास पोलिसपाटलाचा भाऊ अपूनजी यास मुलगा होत नाहीं ही गोष्ट समजली कशी ! नंतर अंगारगांवांतील बोलावलेल्या संभावित गृहस्थांस हा जोशी कधीं तुमच्या गांवांत आला होता कीं नाहीं, तें विचारलें. त्यांनीं सांगितलें कीं, आग लागण्याच्या अगोदर हाच सरोदा दोन तीन रोज आमचे गांवांत फिरत होता, असें पुष्कळांनीं पाहिलें आहे. आणि आतां हा खोटें बोलत आहे. याप्रमाणें त्या जोशाची जबानी उघडीस येतांच त्यांच दुष्टपणाविषयीं ज्यूरीची खातरी आली. इतक्यांत अपूनजींच्याच बायकोनें आग लाविली असें स्पष्ट सिद्ध होण्यास एक कारण आलें. एक सरकारी समन्स पोंचविणारा शिपाई पोलिसांनें साक्षीकरितां ज्यूरीपुढें आणिला आणि तो म्हणाला, " सरकार, अंगारगांव जळाला त्या दिवशीं मी त्या गांवांत समन्स पोंचविण्यास गेलों असतां रात्र आली म्हणून तेथें राहिलों होतों. दोन घटका रात्रीच्या सुमारास मी आणि पोलिसपाटील ( जो सभ्यमंडळींत उभा होता ) असे दोघे मळ्यांतून गांवाकडे येत होतों. तेव्हां डोक्यावर पांघरूण, निरगुडें व दुसरें लांकडी सामान यांचें एक मोठें ओझें घेऊन अपूनजी जात होता तो आम्हांस भेटला. आम्हीं त्यास हें सामान कोठें चालविलें म्हणून विचारलें; तेव्हां तो म्हणाला कीं, उन्हाळा येत चालला आहे, गांवांत आगीवाऱ्याचें भय, म्हणून खळ्यांत नेऊन ठेवितों. पुढें, रात्रीं जेव्हां आग लागली असें मीं ऐकिलें त्याच वेळेस अपूनजींचा मला संशय आला. परंतु, चोर आग लावतांना धरिला असें जेव्हां सर्व बोलूं लागले, तेव्हां ती गोष्ट सोडून मी आपले उद्योगास गेलों. आज मिस्तीस सरोद्याच्या संबंधानें सरकारास अपूनजीचा संशय आला असें समजल्यावरून गरीब मुशाफरावर विनाकारण कुभांड रचलें आहे, अशी माझी खातरी आली. याकरितां माहित असलेली हकीकत स्या पोलिसास कळविली होती व त्यांच्या आज्ञेवरून आज सरकारास

जाहीर व्हावी म्हणून बोललों याची मला माफी असावी." असें बोलून तो आपले जागेवर जाऊन उभा राहिला.

या रीतीनें पुरावे झाल्यावर अमृतजान व निमंताईस उलट सुलट प्रश्न घातले. त्यांच्याही बोलण्यांत पूर्वापर संबंध राहीना. असें पाहून मनोहरपंडिताकडे कांहीं अपराध नाहीं सबब त्यास बंधमुक्त केलें. व निमंताईस जन्मपर्यंत काळेंपाणी. अमृतजान पांच वर्षे सक्त मजूरीनिशीं कैद. व मंगाद्यास दहा वर्षे कैद, याप्रमाणें शिक्षा ठरवून त्या खटल्याचा निकाल केला.

मनोहरपंडिताची मुक्तता होतांच धैर्यशीलास फार आनंद झाला. बिन्हाडीं गेल्यावर ते परस्परांस भेटले. व एकमेकांचीं वर्तमानें पुसू लागले. मनोहरपंडितानें धैर्यशीलास मागें आलेली कच्ची हकीकत सांगितली. ती ऐकून धैर्यशीलास फार वाईट वाटलें. आपल्या दोघां स्नेह्यांच्या स्त्रिया दुष्ट व दुर्वर्तनी निघाल्या सबब त्या नाहींशा झाल्या हें कांहीं अंशीं बरें झालें; परंतु स्नेह्यांच्या विरहीं पद्मनयना हरवली ही गोष्ट त्यास फार दुःखदायक वाटली. नंतर तुला ही एकदम सरकारी जागा कशी मिळाली तें मला सांग. असें मनोहरपंडितानें विचारल्यावर धैर्यशील बोलूं लागला. त्यानें दंगाड्याचें व आपणास चोर म्हणून धरल्याचें वगैरे सर्व सच्चें वर्तमान सांगितलें आणि ह्मणाला, "पुष्पशील निघून गेल्या हें वर्तमान पद्मनयनेस मी सांगतांच ती मूर्छित पडली. असें पाहतांच म्यां विचित्रपुरी सोडली. तुमच्या सर्वांच्या वियोगदुःखानें विरक्त होऊन पुढें काय करावें म्हणून विचार करीत चाललों. एक वेळस असें मनांत येई कीं, जहाजांत बसून विलायत, चीन, अमेरिका, इत्यादि देश फिरावे; परंतु जवळ पैसा थोडा, यामुळें तसें करवेना. नंतर पुनः कलकत्त्यास जाऊन आपले स्कूलफेलोज व शिक्षक यांच्या सहवासांत कांहीं दिवस तुमचा विसर पडेपर्यंत काळक्षेप करावा; असें मनांत आणून मी कलकत्त्यास गेलों. तेथें जाण्याच्या पूर्वींच नवीन खालसा झालेल्या मुलुखांत कांहीं म्याजिस्ट्रेटांच्या वगैरे जागा भरण्याकरितां सरकारानें असा हुकूम केला होता कीं, यूनिव्हर्सिटीच्या परीक्षेंत एल्‌एल्‌. बी. पास झालेल्या उमेदवारांस त्या जागा द्याव्या, त्यांमध्यें उत्तम कुळांत जन्म आलेले असतील. ह्मणजे,

संस्थानिकाचे अगर गव्हरनर बादशहाच्या संबंधाचे ते असतील त्यांस अगोदर राहाव्या. असें होतें. कारण असल्या लोकसमेच्या व जबाबदारीच्या जागेविषयीं असल्या कुलीनमनुष्यांवर सरकार जास्ती विश्वास ठेवूं शकतें.

मी तेथें गेल्यावर प्रथम आपले प्रोफेसर पिटी यांस जाऊन सहज भेटलों. त्यांनीं मला हें वर्तमान सांगितलें. ते ह्मणाले कीं, पुष्पशील व धैर्यशील या दोघांस अगर त्यांपैकीं एकास तरी या जागेवर नेमावें असें सरकारचें ह्मणणें आहे. परंतु त्यांस नसतां आपल्या स्वतःच्या मळ्याला बंदोबस्त करण्याकरितां निघून गेला आहां असें मीं सांगितलें. त्यावरून सरकार तुमच्या नावानें लिहून पाठविणार होतें. इतकें बोलून नंतर त्यांनीं मला नेऊन गव्हरनर साहेबांस भेटविलें. पिटीसाहेबांनींही हुशार, बुद्धिमान् व विश्वासु आहे वगैरे माझी पुष्कळ शिफारस केली. त्यावरून गव्हरनरसाहेबांनीं त्याचवेळेस मला या जागेवर नेमिलें. या जागेवरून मी फक्त तीन महिन्यांची हक्काची रजा घेऊन गेलों आहे. व तो पुरा होईपर्यंत मला तूर्त आफिसर नेमलें आहे; व मीं जर चांगल्या रीतीनें काम केलें तर मला पुढें मुकररची दुसरी एखादी जागा देण्यांत येईल. असें ते बोलले आहेत. त्यांनीं मला हें काम लक्ष्य लावून करा असें बजाविलें आहे. कारण, माझ्या उदाहरणावरून पुढें नेटिव लोकांस अशा जागा मिळण्याचा मार्ग मोकळा होणार आहे.

याप्रमाणें धैर्यशीलाचें बोलणें संपल्यावर मनोहरपंडितानें भुताची हकीकत सांगितली. आणि ह्मणाला. तूं भूत नाहीं असें ह्मणशील तर ह्मण. परंतु मला पक्का अनुभव आल्यावरून माझी त्याविषयीं खातरी झाली आहे. तें ऐकून धैर्यशील खिंकारून त्यास ह्मणाला कीं, छि: भोळ्या. असें ह्मणूं नकोस. तुला त्यांतलें वर्म अद्याप समजलें नाहीं. तें ऐकून मनोहरपंडित ह्मणाला. "तुला एखादें भूत लागलें पाहिजे आणि अर्धरात्रीं तबेल्यांत बांधून तीन कोस जंगलांत फेंकून दिलें पाहिजे म्हणजे कळेल कसें काय आहे तें!" या रीतीनें दोघांचा पुष्कळ वादविवाद होऊन शेवटीं धैर्यशीलानें कबूल केलें कीं, हे बदलीचे दिवस पुरे झाल्यावर आपण अमलगांवास जाऊं, आणि तें भूत कसें काय आहे तें पाहूं.

# भाग ३.

## पिशाचाचें थोतांड आणि पद्मनयनेचा शोध

धैर्यशीलाच्या बदलीची मुदत भरतांच तो साहेब रजेवरून येऊन त्यानें आपल्या कामाचा चार्ज घेतला व धैर्यशीलास मोकळें केलें. पुढें अशाच प्रकारच्या जबाबदारीच्या जागा करून हिंदुलोकांस मोठमोठाल्या जागा मिळण्यास मार्ग मोकळा करावा असें धैर्यशीलास वाटलें. परंतु पुष्पशीलास भेटण्याविषयीं त्याचें मन फार उतावळें झालें होतें. तो ह्मणाला, " प्रथम त्या प्रिय राजपुत्रास भेटून त्याच्या सल्लयानें मग अशीं परोपकाराचीं कृत्यें करण्याचा यत्न करूं."

नंतर ते विचित्रपुरीस जाऊं लागले. त्यांचा रस्ता अमलपुरावरूनच होता, व त्यांचा मुक्कामही तेथेंच आला. तेथील राजास मनोहरपंडित व धैर्यशील हे मग बरोबरीच्या नात्यानें भेटले. तेसमयीं राजानें मनोहरपंडितास पिशाचाची हकीकत विचारली. मनोहरपंडितानें सर्व यथास्थित सांगितल्यावर तो राजास ह्मणाला, "हे आमचे स्नेही आतां त्या पिशाचाची खोड मोडण्यास आले आहेत." तें ऐकून राजा ह्मणाला, " जळो तें पिशाच, त्याचें नांव नको आतां, तें माझ्या जन्माला पुरणार आहे. मला असें वाटतें तें एखादे वेळेस माझा प्राण घेईल यांत संशय नाहीं ! "

हें राजाचें व मनोहरपंडिताचें भाषण ऐकून धैर्यशीलास वाईट वाटलें, व त्याच्या मनांत त्या पिशाचाची भीति पक्की बिंबली आहे असें त्यास भासलें. नंतर किंचित् विचार करून तें काय प्रकरण आहे याचा शोध आपण मौजेखातर एक रात्र करावा असा बेत धैर्यशीलानें केला. नंतर तो राजास कळवून ते बिऱ्हाडीं आले.

संध्याकाळ होतांच धैर्यशीलानें चिलखत अंगांत घातलें, व ढाल तरवार बरोबर घेऊन पिस्तुलाचा सरंजाम सर्व घेतला. एक सारी रात्र पुरे असा कंदील घेतला व मोठ्या उत्सुकतेनें त्या पिशाचाचे चमत्कार केव्हां दृष्टीस पडतील अशा विचारानें तो जागत जाऊं लागला.

तेव्हां पूर्वकाळीं लोकांनीं या कृत्यास तुह्मी शिरूं नका असें सांगितलें. मनोहरपंडितही आग्रहास लागला कीं, खचित तूं या भरीस पडूं नकोस सें अनेक वेळ असो. आपणास त्याशीं काय करावयाचें आहे ? विनाकारण कां आपणावर प्राणान्त संकटें ओढून घ्यावीं? परंतु या भाषणानीं धैर्यशीलाचा धीर न होतां त्यास उलटें अधिक उत्तेजन आलें. या लोकहितावह कृत्यास मला साहाय्य हो. अशी परमेश्वराची प्रार्थना करून तो रात्रीं दहा वाजण्याचे सुमारास त्या बागेंत एकटा जाऊन बसला. कारण, दोघे तिघे गेल्यास पिशाच दृष्टीस पडत नाहीं अशी वदंता होती.

चालीप्रमाणें बारा वाजण्याचा सुमार होतांच विवक्षित कोंपऱ्यांत प्रथम मोठमोठे जाळ होऊं लागले. ते दृष्टीस पडतांच धैर्यशीलास आवेश येऊन त्यानें त्या जाळावर एक गोळी मारली. पिस्तुलाचा आवाज होतांच सर्व चेष्टा दोन तीन घटका बंद पडल्या. त्या वेळेस, 'धाकामुळें भूत पळतें.' ही म्हण खरी आहे, असें धैर्यशीलास वाटलें. इतक्यांत पुनः एक वेळ जाळ आला आणि लागलीच विशाळ आकृति दृष्टीस पडली. तेव्हांही धैर्यशीलानें गोळी चालवली; परंतु तिचें कांहीं न होतां ती अधिक जोरानें धैर्यशीलाकडे येऊं लागली. दिव्याच्या तेजामुळें पुढील पदार्थ चांगला दिसेना. याकरितां त्यानें दिवा मंद केला, आणि त्याआडून पाहूं लागला. तों ती आकृति किंचित मागें सरून एकदम गुप्त झाली. आणि लहान लहान आकृति दृष्टिगोचर झाल्याप्रमाणें वाटून, इकडून तिकडे जोरानें पाय आपटीत कोणी फिरतें आहे, असा भास झाला.

इतकें झालें तथापि धैर्यशील बिलकुल घाबरला नाहीं व भ्याला नाहीं. तो स्वभावतःच धैर्यवान असे. लोकांच्या समजुतीकरितां जीव मुठींत धरून आलेला नव्हता. जों जों अधिक अधिक चेष्टा होत तों तों त्याचें पारिपत्य करण्याविषयीं त्यास जास्त उत्तेजन येऊं लागलें. तो जाग्यावरून उठला व जेथें पाउलें वाजत होतीं व ज्वाळा निघत होत्या त्या जागीं मनुष्य किंवा कोणी पशु असावा असा तर्क करून त्यास गोळी मारण्याकरितां हळूच त्याच्यामागें फिरूं लागला; परंतु त्या ज्वाळा व आकृति चंचल होत्या यामुळें गोळी मारण्याचा

इलाज चालेना. एखादे वेळेस धैर्यशीलास भास होऊन त्यानें गोळी मारावी, परंतु ती एखादे आडास लागावी. असें कांहीं वेळ चालल्यावर सर्व बंद होऊन पिशाच एका कोपऱ्यांत जाऊन बोललें. " अरे, तूं माझ्या समंधाच्या मागें किमर्थ लागलास? येथून लवकर निघून जा; नाहीं तर तुला क्षणांत भक्षून टाकीन. " असे ते मानवी शब्द ऐकून सर्व कल्पना नष्ट होऊन, हा मनुष्य आहे, अशी धैर्यशीलाची खातरी झाली. नंतर तो ह्मणालाः " अरे दुष्टा, तूं लोकांस फसवून आजपर्यंत काळ काढलास, परंतु आज तुझ्या सखाऱ्या गणाग पक्क्या गुरूचा चेला आला आहे संभाळ. " याप्रमाणें धैर्यशीलाचें भाषण ऐकून समंध अगदी कोपायमान होऊन त्यानें मोठ्यानें किंकाळी मारली, आणि दांत खात मनोहरपंडितासारखी याची अवस्था करावी असा विचार करून तो धैर्यशीलाच्या मागें त्यास उचलण्यासाठीं आला. धैर्यशीलास त्याची चाहुल लागतांच त्यानें तोंड फिरविलें आणि तरवार उपसून दोन पुढें करून त्याचे अंगावर त्यास शिव्या देत रागानें गेला. हें पाहतांच समंध पळूं लागला. तेव्हां धैर्यशीलानें त्वरा करून त्याचे पाठीवर एक तरवारीचा घाव मारला तोही सहन करून तो जीव घेऊन पुढें जाऊं लागला. इतक्यांत धैर्यशीलानें दुसरा वार मारून त्यास गतप्राण करून पाडलें. त्या वेळेस धैर्यशीलास पुष्कळ आनंद होऊन त्यानें परमेश्वराचे आभार मानले, आणि तो पुनः चवथऱ्यावर येऊन स्वस्थ बसला. पुढें पहाटेच्या चार वाजतोंपर्यंत कांहीं एक झालें नाहीं; परंतु पहाटेच्या प्रहरीं खोल नदीच्या बाजूकडून आरोळ्या व शब्द ऐकूं आले ते असे.—" गोमाजी, अरे गोमाजी, अरे पूजेची वेळ झाली आहे. लवकर ये. " ते ऐकून धैर्यशीलानें कल्पना केली कीं, मी ज्यास मारलें तो गोमाजी असावा, व हा हांका मारणारा कोणी ह्मातारा मनुष्य आहे असें त्याच्या स्वरावरून अनुमान होतें. नंतर या ह्मातान्यापासून आपणास कांहीं त्रास होईल असें वाटून धैर्यशील ह्मणाला, " गोमाजीची गठडी केली तशी तुझी करितों, इकडे ये. " इतकें बोलल्यावर पहांटपर्यंत कांहीं एक प्रकार झाला नाहीं.

दिवस उगवतांबरोबर राजा, मनोहरपंडित व आणखी पुष्कळ

लोक धैर्यशीलाची काय अवस्था झाली हें पाहवयास आले. त्यांनीं धैर्यशीलास चवथऱ्यावर वीरासन घालून तरवार फिरवीत मोठ्या आनंदानें बसला आहे असें पाहिलें. सर्व फुलझाडें पुष्पांनीं भरून गेलीं आहेत व फळझाडांवर उत्तम प्रकारचीं फळें लागलीं आहेत असें दृष्टीस पडलें. हा चमत्कार पाहून व धैर्यशीलाचा प्रफुल्लित मुखेंदु अवलोकन करून त्या सर्वांस समजलें कीं, यानें त्या त्रासदायक समंधाचा नाश केला आहे. नंतर ते सर्व धैर्यशीलाजवळ गेले, आणि रात्रीची हकीकत कशी झाली ती आम्हांस सांगा म्हणून त्याची विनंति करूं लागले. धैर्यशीलानें रात्रीं झालेली हकीकत सांगितल्यावर ज्या ठिकाणीं पिशाचास मारलें होतें, त्या ठिकाणीं त्याचें प्रेत दाखविण्याकरितां सर्वांस नेलें. जरी तें छिन्नविछिन्न तुकडे झालेलें पडलें होतें, तथापि त्यास पाहून पुष्कळ लोक भयानें पळूं लागले. त्यानें एका काळ्या कपड्यानें गणवेषीप्रमाणें सर्व तोंड झांकून टाकिलें होतें. डोळ्यांस व नाकास मात्र मोठालीं भोकें ठेविलीं होतीं. डोळ्यांचे भोंकांभोंवतीं मोठाले पांढऱ्या रंगाचे पट्टे मारले होते. तोंडावर व नाकाच्या छिद्राभोंवतींही पांढरे पट्टे असून रात्रीं चमकणारी बेगड लाविली होती. अंगांत एक पांढरी बंडी हाताचे पंजे उघडे न ठेवितां घातलेली होती. पायांत पांढरा पायजमा होता. व हातांत, सर्व अंग झांकतां यावें एवढा एक काळा कांबळा होता.

धैर्यशीलानें त्याच्या अंगावरील व तोंडावरील कपडा फाडून काढला तेव्हां त्यांस समजलें कीं, हा कोणी एक मनुष्यच आहे, व तो असल्या प्रकारचें पेहराव घेऊन बागेचें उत्पन्न आपणास मिळण्याकरितां लोकांस भेवडावीत होता. नंतर जाळ कशाचा होत होता, व विशाल आकृति कोठून दिसत होती याविषयीं जिज्ञासा त्यांचे मनांत उत्पन्न झाली. तेव्हां ते सर्व ज्या कोपऱ्यांत जाळ होत होता तेथें गेले, तेव्हां त्यांस असें दिसलें कीं, एका झाडाच्या आधारानें मनुष्याचे उंचीइतका एक तट्टया उभा केला आहे. त्याचे आड एक जळकी गोवरी व गंधकांत भिजविलेल्या सनकाड्या आहेत. एक तेलांत भिजवलेला मोठा कांकडा व राळेनें भरलेलें एक मडकें पडलें आहे. ह्या चिन्हांवरून त्यांनीं सहज कल्पना केली कीं, या तट्टयाचे आड उभा राहून तो

मनुष्य रात्र उडवीत असेल व तेणेंकरून रात्रीं एकल्या मनुष्यास तें भयंकर दिसत असेल यांत संशय नाहीं. नंतर जवळच्या एका झाडाकडे नजर करून पहातात तों त्याचे आड दोन अडीच पुरुष उंचीची वेळूच्या लांकडाची एक चौकट उभी केली आहे असें दिसलें. त्या चौकटीच्या वरचे बाजूस हाताच्या आकृतीचीं दोन लांकडें आडवीं बांधलीं होतीं, व वरच्या बाजूस कामठ्या बांधून तोंडासारखी आकृति केली होती. तसें एका बाजूनें काळें कपड्यानें अच्छादिलें होतें व दुसऱ्या बाजूनें पांढरे फडक्यानें अच्छादिलें होतें. अशी ती चौकट पाहतांच सर्व गोष्टींविषयीं त्यांची शंका निवारण झाली. त्यांनीं अनुमान केलें कीं, ही चौकट ज्या वेळेस तो झाडाच्या आडून काढून मैदानांत आणीत असेल त्या वेळेस भयभीत झालेला पाहणारा, पिशाच दीर्घ रूपानें प्रकट झालें असें मानीत असेल, व त्यानें ती आकृति झाडाआड ठेविली ह्मणजे तें गुप्त झालें असा भास होत असेल, आणि अंधारे रात्रीं पांढरें व चांदण्या रात्रीं काळें अंग दाखवीत असेल, हेंही लक्ष्यांत आलें.

याप्रमाणें त्यांची सर्व गोष्टींविषयीं खातरी आल्यावर धैर्यशील ह्मणाला:" पहा या दुष्ट मनुष्यानें तुह्माला कसें ठकविलें तें! या रीतीनें धूर्त व चोरटे लोक भोळे लोकांस भलभलते भास करून आपलीं कार्यें साधीत असतात. लबाड लोक पिशाचाचा भास करितात याचा थोडा विचार करा. भुतें अंधारे रात्रीं फार व चांदण्या रात्रीं कमी असतात. तसेंच तीं एकट्या मनुष्याचे दृष्टीस त्वरित पडतात व बहुत मनुष्यांस क्वचित् दिसतात असें ह्मणतात. याच गोष्टीवरून स्पष्ट होतें कीं, भुताचा भास करणारा मनुष्य आहे. आपली कपटविद्या उघडीस येईल म्हणून चांदण्यारात्रीं व समाजांत तो पिशाच स्वरूप एकाएकीं प्रकट करीत नाहीं. कदाचित् पिशाचाचा भास करणारा मनुष्य आहे असें वाटलें, तर बेधडक हत्यारबंद त्याचे अंगावर न भितां जावें; कारण, भुतांचा भास करणार जवळ हत्यार बाळगीत नसतात. ते जर हत्यारानें लोकांस घायाळ करिते तर ते मनुष्य आहेत असें लोकांस समजून पिशाच्याविषयींचें वेड नाहीसें होतें. परंतु तें वेड जितकें वृद्धिंगत होईल तितकें त्यांस इष्ट असतें, सबब ते विनहत्यारी असतात.

व पुरुषांसही बागकाम फार सवडीविनाय. हे प्रकार प्राचीनकाळीं फार होते. हल्लीं इंग्रजसरकारच्या राज्यांत चोरांचीं बंडें मोडल्यामुळें ही ठकविद्या पुष्कळ अशी नाहींशी झाली आहे; तथापि पूर्वापर दंतकथा ऐकत आल्या आहेत त्यावरून भेकडपणानें पुष्कळ लोक आडांसुद्धांस दुरून पाहून भितात."

याप्रमाणें धैर्यशीलानें आपण ऐकून सर्वांस ही कल्पना खरी वाटली. नंतर धैर्यशील पुनः म्हणाला, रात्रीं एक मनुष्य ओरडला त्यावरून मला वाटतें कीं, तो या मारेकऱ्या मनुष्यांना संबंधी असावा; व त्यानें घर अगर ठिकाण जवळून आसपास कोठें तरी असावें, त्याचा शोध करूं चला. त्याचा ठिकाण लागल्यास आणखी पुष्कळ गोष्टींचा खुलासा होईल. असें धैर्यशील बोलल्याप्रमाणें ते सर्व शोध करीत चालले. चोरांच्या किल्ल्या बाजूस सर्वत्र उंच कडे आहे यावरून व रात्रीं ज्या बाजूनें शब्द एक आला होता त्यावरून धैर्यशीलानें कल्पना केली कीं, चोरांचा जाण्याचा मार्ग नदीच्या बाजूकडून आहे. धैर्यशील नदीच्या बाजूकडे जाऊं लागला असें पाहून सर्व लोकही त्यामागें गेले. तो त्या नदीकडे कड्याकडे लक्ष लावून पाहूं लागला तेव्हां त्यास असें समजलें कीं, त्या कड्याच्या जागोजागीं मोठमोठ्या मजबूत झाडांच्या मुळ्या लोंबल्या आहेत व त्या मुळ्यांखालीं एक एक पाय ठेवण्यापुरता लहान कोनाडा आहे. त्यावरून चोरांचा येण्याचा मार्ग हाच आहे असें धैर्यशीलास वाटून तो त्या मुळ्यांस धरून व कोनाड्यांत पाय ठेवून खालीं उतरूं लागला. तें पाहून मनोहरपंडित व राजा हे उभयतां म्हणाले कीं, खालीं मोठा डोह आहे; याकरितां तुमचा मध्यें वगैरे सुटला तर मध्यें प्राणास मुकाल. परंतु, धैर्यशीलानें त्यांचें बोलण्याकडे विशेष लक्ष न देतां त्या कड्याचे तळीं जाऊन त्या विस्तीर्ण डोहाच्या कडेवर थोडी जागा होती तेथें जाऊन तो उभा राहिला. व सर्वांस खालीं बोलावूं लागला. त्या वेळेस सर्वांसही खालीं जावेंसें वाटून राजानें एक दोर आणविला. आणि तो एका झाडास घट्ट बांधून खालीं टाकिला; नंतर त्याच्या, मुळ्यांच्या आणि कोनाड्यांच्या आश्रयानें ते सर्व लोक खालीं उतरले.

त्या सर्वांनीं मग बारीक नजर करून पाहिलें, तेव्हां त्यास असें दि-

सलें कीं, एक बारीक पाऊलवाट त्या कड्याच्या पायथ्यानेंच दूर त्या कड्यास पावसाच्या पाण्यानें एक मोठी खोंगळी पडली होती तींत गेली आहे. नंतर ते सर्व त्या पाऊलवाटेनें जाऊं लागले. खोंगळींत गेल्यावर तेथें गोमुखीच्या आकाराप्रमाणें कृत्रिम जागा कोरलेली आहे असें दिसलें. तें स्थळ दुसऱ्या कोणत्याही ठिकाणावरून दिसण्यासारखें नव्हतें. त्याचे समोरचे बाजूसही लहानसा कडाच तुटलेला होता व त्याचे माथ्यावर अतिशय कांटेरी झुडपें होतीं. आणि दोहोंमध्यें अति भयंकर डोह होता. अशी ती एकांत व भयप्रद जागा पाहून हें त्या पिशाचरूप मनुष्यांचें घर असावें असें धैर्यशीलास वाटलें. पुढें जे लोक होते त्यांस उत्कंठा प्राप्त होऊन ते त्या गोमुखाकृति जागेच्या आडवे भागांत गेले. तों तेथें एक लहानसा दरवाजा दिसला. ते त्या दरवाज्याजवळ जाऊन आंत डोकावतांक्षणींच अतिशय भयभीत होऊन धांवत धांवत मंडळीच्या समाजांत आले. ते इतके घाबरले कीं, आंत काय आहे हें त्यांच्यानें सांगवेना देखील. त्यांची ती दशा पाहून धैर्यशीलाशिवाय दुसरे कोणाच्यानेंही तिकडे जाववेना. धैर्यशील मोठ्या धिटाईनें दाराशीं गेला. आणि आंत पाहूं लागला तों त्यास असें दिसलें कीं, कदंबेसारखी आंत कोणी देवी आहे. ती कदंबेपेक्षां भयंकर होती. तिच्या डोक्यावर दोन स्त्रिया टांगल्या होत्या, त्यांस अगदीं फाटकीं काळीं लुगडीं नेसविलीं होतीं. त्यांचे केश मोकळे सोडले होते. व कपाळांवर कुंकवाचे मळवट भरले होते.

धैर्यशील पुष्कळ वेळ दाराशीं उभा राहून पाहूं लागला, तें पाहून सर्व लोकही दाराशीं आले. मनोहरपंडित व राजा हे उभयतां तर तो भयंकर देखावा पाहून अगदीं घाबरून गेले, व सर्व लोक आल्या मार्गानें ' राम राम ' म्हणत जाऊं लागले. मनोहरपंडित धैर्यशीलास म्हणाला, " धैर्यशीला, या जाग्यांतून लवकर चल बाबा, माझ्यानें येथें उभें देखील राहवत नाहीं. " असें म्हणून तो व राजा एक एक पाऊल मागें टाकूं लागले. तें पाहून सर्वांस हांक मारून धैर्यशील म्हणाला: "अरेरे! तुम्ही अगदीं निर्दय अहां! या अनाथ टांगलेल्या प्राण्यांची तुम्हांस करुणा येत नाहीं काय? " तें ऐकून पुनः मागें वळून ते सर्व म्हणाले: " अहो, प्रेतांची दया येऊन काय उपयोग! "

इतक्यांत त्या टांगलेल्या प्राण्यांतून एकानें किंचित मान हालविली व दुसऱ्यानें ' अं ' असा शब्द केला. तें पाहून धैर्यशीलास फार आनंद झाला. तो ह्मणाला, "अहा, बिचारे अजून जीवंत आहेत. धांवा धांवा; जलदी करा आणि त्या अनाथांस बंदमुक्त करा." दुसरे लोक ह्मणाले, "आह्मी असल्या ठिकाणीं आंत जाण्यास धजत नसतों; जाणूनसवरून आपला जीव धोक्यांत कोण घालतो? तें तुमचेंच काम." धैर्यशील ह्मणाला: "कांहीं चिंता नाहीं. मी आंत जातों."

तो आंत जाण्याची तयारी करूं लागला, तेव्हां सर्व लोक दारच्या तोंडाशीं जमा झाले. धैर्यशीलानें दारच्या आंत दोन तीन पावलें टाकिलीं इतक्यांत मनुष्याचे अवयव आणि वाघाचें तोंड असा भयंकर प्राणी एका कोपऱ्यांतून मोठ्या क्रोधानें धैर्यशीलाचे अंगावर " आऊ " असा मोठा शब्द करून धांवून आला. त्या वेळेस काय विचारावयाचें आहे? एवढा धैर्यवान धैर्यशील, परंतु अतिशय भयभीत होऊन मागें सरला, आणि बाहेर येऊन धाडकन मंडळीच्या समाजांत उताणा जमीनीवर आपटला! तें पाहून जो तो आपला जीव घेऊन पळूं लागला!! त्या वेळेस त्या सर्व लोकांस कोठें पळतां येईना, टेंकडीवर अटकून चढतां येईना; जरा अपाऱ्यानें चाललें तर डोहांत पडण्याचें भय. कोठें लपण्यासही जागा नाहीं. अशी अवस्था प्राप्त होतांच आपल्या पुण्यनिधीची वेळ आली असें समजून ते एकमेकांच्या आड तरच्या तेथेंच दडूं लागले. ते प्रतिक्षणीं समजत होते कीं, आंतील प्राणी येऊन तो सर्वांस मारून टाकील. इतक्यांत धैर्यशील सांवरून उठला आणि हातातरवार पुढें करून दारापाशींच पुनः जाऊन बसला. त्याचे मनांत कीं, तो आंतील प्राणी बाहेर आल्यास होईल तितका यत्न करून त्यास मारून टाकावें, अगर घायाळ तरी करावें. याबद्दल आपला प्राण गेला तरी बेहतर, परंतु हे बाकीचे लोक तरी वांचतील. असा त्याचा निग्रह पाहून बाकीचे लोकांस पुष्कळ दम आला. मग ते दुरून काय होतें तें मुकाट्यानें पाहूं लागले. धैर्यशीलानें विचार केला कीं, ही जागा मनुष्यांनीं केलेली दिसते, व हे प्राणी मनुष्यांनेंच उलटे टांगले आहेत. या देवीची पूजा करणारेही मनुष्यच असतील, तस्मात आपले अंगावर आलेला हिंसक प्राणी

नमून मनुष्य आहे यांत संशय नाहीं. इतक्यांत दुसरे लोक ह्मणाले. "अहो धैर्यशील महाराज, एक वेळ मारली म्हणून पिशाचयोनि खोटी असा निश्चय करूं नका. तें कोणत्या ठिकाणीं कोणत्या रूपानें प्रकट होईल याचा नेम नाहीं. वाटेंत तुम्ही एक मनुष्य मारला खरा. परंतु कांहीं तरी बाधा आहे यांत संशय नाहीं."

धैर्यशील उभा राहिला, आणि ज्या कोपऱ्यांत तो प्राणी असावा असें त्यास वाटलें त्या कोपऱ्यांत पिस्तुलानें गोळ्या मारूं लागला. बाहेरूनही त्यास पुष्कळ शिव्या दिल्या. परंतु तो आहे किंवा नाहीं याचा देखील शोध लागेना. त्या वेळेस पुनः धैर्यशीलानें ढाल पुढें करून तिच्या मागें तरवार धरून तो आंत हळू हळू जाऊं लागला, तें त्या आंतील प्राण्याच्या दृष्टीस पडतांच तो झटकन् देवीकडे धांवत गेला, आणि तेथील एक तरवार घेऊन मोठ्या क्रोधानें धैर्यशीलाचे अंगावर चालून आला. त्यानें अतिशय जोरानें एक तरवारीचा घाव धैर्यशीलाच्या अंगावर मारला. तो घाव त्यानें मोठ्या चलाखीनें ढाली-वर घेतला, आणि तत्क्षणींच खालून त्याचे पोटांत आपली तरवार खु-पसली. त्या वेदनेनें तो मागें सरून भिंतीवर आपटला. इतक्यांत धै-र्यशीलानें दुसरा वार करून त्यास गतप्राण केलें; आणि तत्क्षणीं त्या-चा हात धरून बाहेर ओढीत आणलें. तो मेला असें पाहून सर्व लो-क त्याभोंवतीं जमले. त्याचे तोंडास वाघाचा कृत्रिम मुखवटा होता तो धैर्यशीलानें एका बाजूला केला; त्याचे अंगांत वाघाच्या कातड्याचा अंगरखा होता तोही फाडून टाकिला. त्या वेळेस एक म्हातारा म-नुष्य आहे असें समजलें. धैर्यशील म्हणालाः "हाच म्हातारा म-नुष्य रात्रीं गोमाजी म्हणून हांका मारीत होता. यांचा या देवीवर मोठा भाव आहे असें दिसतें. ते बहुधां या देवीच्या पोषणाकरितां दे-खील असे प्रकार करीत असतील. हें ठिकाण या चोरांचें द्रव्य ठे-वण्याचें व मुख्य देवस्थान आहे असें वाटतें. हें कोणास समजूं नये म्हणून हा म्हातारा व्याघ्ररूपानें बसला होता. कदाचित् कोणी आलें तर वाघाची गुहा अगर कोणी पिशाच आहे असें वाटून त्यानें पळून जावें अशी तजवीज त्यांनीं केली होती."

"असो. आतां त्वरा करून हे टांगलेले अनाथ प्राणी सोडून

बाहेर आणूं चला. " इतकें झालें तरी आंत जावयास कोणाची छाती होईना. नंतर पुनः धैर्यशील उठला आणि आंत जाऊन सर्व कोंपऱ्यांत व अंधारांत तरवार ठोंकून कोणी नाहीं अशी त्यानें खातरी करून घेतली. नंतर चोरांचीं पांघरुणें आंत होतीं तीं बाहेर फेंकून त्यांचें अंथरूण करविलें आणि गुहेंतील ते दोन्ही अनाथ प्राणी सोडून आणून त्यावर निजविले. त्यांच्या अंगावर बारीक पांघरूण घालून पाहतात तों त्यांचा श्वासोच्छ्वास चालू आहे. त्यांच्या नाड्याही वाहताहेत. परंतु भुकेनें आणि तहानेनें ते अगदीं मरणोन्मुख झाले आहेत, असें दिसलें. त्या वेळेस धैर्यशीलानें देवळांत जाऊन देवीपुढें दुधानें भरलेला प्याला नैवेद्याकरितां ठेविला होता तो बाहेर आणिला. आणि त्यांतील दूध तो त्या उभयतांचे तोंडांत थोडथोडें घालूं लागला. तें पोटांत जातांच त्यांस किंचित आवांका येऊन ते अंग हालवूं लागले व अधिक दूध घालण्याकरितां तोंड उघडूं लागले. तें पाहून त्या सर्वांस आनंद होऊन कित्येक देवळांत गेले. आणि राजाच्या बागेंतील फळें देवीपुढें पुष्कळ पडलीं होतीं तीं त्यांनीं बाहेर आणलीं. नंतर नारिंगाचा रस व अंजिरांचे लहान लहान तुकडे व दुसऱ्या पुष्कळ फळांचे गीर काढून त्यांच्या पोटांत घातले. तेणेंकरून ते दोन्ही प्राणी सुख पावून किंचित डोळेही उघडूं लागले. त्यांच्या तोंडांस ओंगळ रंग लाविला होता त्यामुळें ते फार भयंकर दिसत. याकरितां धैर्यशीलानें पाणी आणवून त्यांचीं तोंडें धुववून स्वच्छ करविलीं. त्यांपैकीं एका चेहऱ्याचा गौरवर्ण, त्याची वर्तुळाकृति ठेवण. विशाळ भाळ, हरिणीसारखे डोळे व चांपेकळीप्रमाणें सरळ नाक दृष्टीस पडतांच धैर्यशीलाचे नेत्र भरून आले. तो मनोहरपंडितास मोठ्यानें हांक मारून ह्मणाला. " मनोहरपंडिता, अरे ही स्त्री कोण आहे हें तुझ्या लक्ष्यांत अजून आलें नाहीं काय ? " मनोहरपंडित त्या मुखाकडे न्याहाळून ह्मणाला, " अरे ! ही आपली पद्मनयना आहे. हरहर ! हरहर ! नारायणा ! कायरे ही दशा या राजकन्येची आली ! ! ! अहाहा ! जिचा मुखचंद्रमा दृष्टीस पडण्याकरितां या विचित्रपुरी सभोंवतीं मोठमोठे राजेरजवाडे व सरदार कित्येक दिवस खर्च करीत पडले होते; जिच्या सुकुमार पायांस जमीन फार निबर लागे. याकरितां चित्रपाळराजानें सर्व घरभर

गाद्या अंथरल्या होत्या; जिच्या मुखाकडे मातापितरांनीं पाहून अतिशय आनंद पावून आपलीच दृष्टि लागेल अशी कल्पना करून त्यांनीं प्रत्यहीं तिची दृष्ट काढावी; त्या पद्मनयनेची अशी अवस्था झाली काय? अरेरे! दैवाची गति विचित्र आहे!!" धैर्यशील म्हणाला, "काय, मनोहरपंडिता, जीकरितां मित्र पुष्पशील मयूराप्रमाणें झुरत आहे व एकएक क्षण युगाप्रमाणें घालवीत आहे; जीकरितां तूं अनिर्वाच्य संकटें भोगिलींस ती हीच काय रे पद्मनयना? खचित् नसेल. अरे असल्या संकटांत ती कोठून पडणार?" तीस हांका मारतो: 'पद्मनयने, हे पद्मनयने, तूंच आहेस काय?' हे शब्द कानीं पडतांच पद्मनयनेनें डोळे उघडले आणि मीच पद्मनयना आहे असें खुणांनीं दर्शवून कांहीं बोलण्यास पाहूं लागली, परंतु शरीरांत बिलकुल आवांका नव्हता ह्मणून पुनः तिनें डोळे मिटले. तें पाहून धैर्यशीलाचा ऊर दाटून येऊन तो ह्मणतो:—

पद.

( राग जोगी. )

॥ राजसुता हे अशा स्थितीला, पावे कशी हीं ॥
॥ मित्रा, दुःखें शशिवदनाहे, मरणोन्मुख पाहीं ॥ धृ० ॥
॥ दैवाची ही कशि गत झाली, ईशा जगपाला ॥
॥ दुःख इचें हें मज बघवेना, टोचतसे भाला ॥ १ ॥

नंतर राजानें व इतर लोकांनीं देवीच्या देवळांतील सर्व जिनगी बाहेर काढली. आणि वर जाण्यास सोईवार मार्ग पाहूं लागले. तें स्थल नदीच्या पृष्ठभागापासून दोन आडीच पुरुष उंच होतें, याकरितां आतां सुमारें तितकेंच मात्र चढणें राहिलें आहे असें त्यांस वाटलें. ती बाकी राहिलेली दरडही त्या चोरांनीं भिंतीसारखी करून ठेविली होती. ते इकडे तिकडे पाहूं लागले तों एका कोपऱ्यांत एक घोरपड कमरेस दोर बांधलेली पडली होती ती त्यांच्या दृष्टीस पडली. ती घेऊन त्यांनीं वरील जमीनीवर झोंकली आणि तिच्या दोरावरून दोन तीन शिपाई वर चढून गेले. त्यांस आढळलें कीं, त्या ठिकाणाहून एक पाऊलवाट घोर जंगलांत गेली आहे व शहरच्या बाजूकडे निवडुंगाचीं मोठमोठीं कुपणें लागलीं आहेत. असें पाहून त्यांनीं

# भाग ४.

## श्लोक.

प्रसंगीं अज्ञानें मनुज लघु देवास भजती ॥
जगाचा जो कर्त्ता प्रभु सदय त्यातें न नमती ॥
सुनीतीनें वागे दुषिति जन सार्तेचि बहुधा ॥
मनःपूतें शास्त्रें तुर्पात वधि काढोनि विबुधा ॥

## लोकापवाद.

---

उन्हाळा प्राप्त होऊन वसंत ऋतुस आरंभ झाला आहे. सूर्याची किरणें लंबरूपानें पडूं लागल्यामुळें जिकडे तिकडे अतिप्रखर उष्णता होऊन गेली आहे. नद्या, तलाव, विहिरी, आड, इत्यादिकांचें पाणी आटून गेलें आहे. अरण्यांतील पशु तृषार्त होत्साते उदकाच्या शोधार्थ लक्षा लहा करीत भटकत फिरताहेत. कित्येकास वेळेस जीवन न सांपडून ते प्राण टाकताहेत. प्रवास करणाऱ्या वाटसरांसही पाणी न मिळून ते व्याकुळ होऊन झाडांखालीं पडताहेत. कित्येकांस उन्हाच्या झळया लागून ते तत्काळ प्राण सोडताहेत. **विचित्रपुरांत** आदले वर्षी पर्जन्य कमी पडल्यामुळें एकच आकांत होऊन गेला. सर्व ठिकाणचें उदक आटून लोक पाणी पाणी करूं लागले. गांवांतील उदक आटल्यामुळें सर्वांचा मार्ग नदीवर पडला. नदीचा प्रवाहही बंद होऊन जागजागीं डबकें मात्र राहिलीं, त्यांतच सर्वांनीं स्नानें व पांघुरणें धुणें चालू लागलें. जनावरांस दुसरें पाणीच नव्हतें, या कारणानें तीं त्यांत पाणी प्यावयास जात, व मळ-मूत्रादि व्यापार करीत. म्हशीच कळपही त्या डबक्यांत बसत, व कोणी हरकत करीना यामुळें शेतकरी लोक त्यांतच अंघोळी भिजत घालीत. असे नानाविध प्रकार चालल्यामुळें तें पाणी अगदीं खराब होऊन इतकें दाट झालें कीं, तें हातांतून गळण्याची देखील मुष्कील; त्याची दुर्गंधीही पर्स गांवभर पसरे, ज्यांस शरीरबळ अगर द्रव्यबळ

त्यांस मात्र त्या नदीचें एक दोन कोशांवरील डोहाचें स्वच्छ पाणी प्यावयास मिळे. परंतु अशक्त, गरीब, दीन, तरी, तापडी, मुशाफर इत्यादिकांस निरुपाय होऊन तें घाणेरडें पाणी पिणें भाग पडे.

विचित्रपुरी हें शहर अति विस्तीर्ण होतें; व त्यांत वस्तीही फार दाट होती. रस्ते अगदीं लहान व त्यांतच शौचकूपाचीं तोंडें होतीं. त्यांची दुरुस्ती नसल्या कारणानें ते नेहमीं फुटून रस्त्यांतून वाहत असत. मोऱ्यांचें पाणी जाण्यासही सोय नव्हती. सबब पुष्कळ घरांतील पाणी रस्त्यांतून वाही. बहुतेक घरांस ओल व चौकांत सर्व व्यापार व्हावयाचे म्हणून हवा अति खराब होऊन जाई. घरांत स्वच्छ हवा येण्यास मुळींच सोय नसे; व ज्या कांहीं खिडक्या होत्या त्या रस्त्याचे बाजूस असत, त्यामुळें स्वच्छ हवा न येतां उलटी दुष्ट हवा येत असे.

सकाळचे दहा वाजल्यापासून दुपारचे दोन वाजत तोंपर्यंत अशी उष्णता होई कीं, लोकांच्यानें बाहेर तोंड काढवत नसे. रात्रंदिवस अंगाची आग होई, व निर्मळ आणि थंड पाण्याशिवाय दुसरे पदार्थावर इच्छा होईना. उन्हाच्या झळया घरांतही येत; तेणेंकरून लोक अगदीं बेजार होऊन जात. घरेंदारें व सर्व पदार्थ इतके तापून जात कीं, त्यांस किंचित विस्तवाचा स्पर्श झाला म्हणजे ते तात्काळ पेट घेत. यामुळें गांवांत आगीचा अत्यंत प्रळय होऊन गेला. दररोज एक दोन घरांस आग लागे. ती विझविण्यास पाणी मिळूं नये, याकरितां ती आपोआप विझत तोंपर्यंत जळूं देणें भाग पडे. त्यामुळें पुष्कळ घरें पडून लोकांचें लाखों रुपयांचें नुकसान होऊं लागलें. मागील वर्षांतील पर्जन्याच्या कमताईमुळें महर्गताही अतिशय झाली होती. लोकांस पैसा देऊन देखील वेळेस दाणा मिळनासा झाला. कित्येक गोरगरिबांस तर अन्नावांचून आठ आठ रोज उपास पडूं लागले, व कित्येक अन्नअन्न, पाणीपाणी करून प्राण सोडूं लागले!

असल्या संकटांत लोक निमग्न असतां पटकीचा रोग एकाएकीं उत्पन्न झाला. तो दिवसानुदिवस इतक्या झपाट्यानें वृद्धिंगत होत चालला कीं, एका पंधरवड्यांत त्या विचित्रपुरींतील एक हजार मनुष्यें मरण पावलीं! मग काय विचारावयाचें आहे! असे भयंकर प्रकार

एकदांच चोहोंकडून प्राप्त आल्यावर सर्व लोकांच्या कंबरा बसून गेल्या. दहा दहा मनुष्यांचे ग्रास भडाभड कुलों लागूं लागलीं. कोणावर केव्हां प्रसंग येईल याचा भरंवसा राहिला नाहीं. आतां आपण बोलतों, पण घटकेमगनें काय होईल याचा भरंवसा राहिला नाहीं. बाहेर गेलों तर घरीं काय झालें असेल अशी सर्वांस धास्ती उत्पन्न होई. एन जवान व धट्टेकट्टे पुरुष मरूं लागले. त्यांत बहुतेक ज्या जातींत पुनर्विवाहाची चाल नाहीं अशा जातींतील मरत, तेणेंकरून त्यांच्या तरुण व बालविधवांस पाहून व त्यांचा विलाप ऐकून सर्वांस हें जग शून्यवत् भासूं लागलें ! कोठें कोठें वाड्यांतील सर्व तरुण मनुष्यें मरत व एक म्हातारा अथवा म्हातारी मात्र उरे. त्यांस तो शोक सहन न होऊन ते आत्महत्या करीत. ज्यास त्यास असें वाटे कीं, आपणास दुःख व शोक दृष्टीस न पडतां मरण आलें तर मिळविली! असा एकच आकांत होऊन गेला ! ! !

दररोज माणसें मरण्याचा फारच तडाका चालला तेणेंकरून सर्पणही इतकें महाग झालें कीं, गरीबगुरीबांस तर भिनाशिजलेलीं धान्यें खाण्याचे प्रसंग आले. तेणेंकरून त्यांच्या प्रकृति बिघडून तो महारोग अधिकाधिक वाढण्यास एक कारण झालें. याप्रमाणें जेव्हां त्या शहारांत गोंधळ माजला तेव्हां तेथील मोठमोठे वैदिक, शास्त्री, भिक्षुक व वृद्ध वृद्ध ब्राह्मण एके ठिकाणीं जमून, हीं अरिष्टें याच वर्षी एकदांच उत्पन्न होण्याचें कारण काय ह्मणून विचार करूं लागले. त्यांच्या लक्ष्यांत तेव्हांच आलें कीं, यंदा राजानें कदंबा देवीचा छळ केला आहे म्हणून असे प्रकार झाले. त्या वेळेस एक वृद्ध ह्मणाला, " आज बारा चवदा वर्षे झालीं, तितक्यामध्यें अशी गोष्ट कधींच घडली नाहीं. आमचा आजा सांगत होता कीं, त्याचे पणजाचे वेळेस ही देवी त्या ठिकाणीं स्वयंभू निघाली. त्या वेळेस तेथें कोरें आली होती. ती एका रामोशाच्या स्वप्नांत गेली, तेव्हां त्यानें तिला देऊळ वगैरे बांधलें. या गोष्टीस निदान पांच सातशें वर्षे झालीं असतील, आणि त्यापूर्वी ती तेथें किती वर्षे होती याचा थांगच नाहीं. अशी फार प्राचीन काळची देवी राजानें विचार न करितां एकदम स्थानभ्रष्ट केली. तेव्हां तिचा हा कोप आहे यांत

संशय नाहीं. परंतु पहा, देव तरी गरीबांमागें लागतो. त्या राजाचें देवीच्यानें कांहीं होत नाहीं !" दुसरा मनुष्य म्हणाला, "अहो, असें कां म्हणतां ? पद्मनयना हरवण्याचें कारण काय ? देवीच्या कोपाशिवाय दुसरी गोष्टच नाहीं."

याप्रमाणें त्यांचीं भाषणें झाल्यावर ते विचार करूं लागले कीं, आतां पुढें कसें करावें ? तेव्हां त्यांनीं अशी युक्ति काढली कीं, सर्व गांवांतील संभावित लोकांस ही गोष्ट कळवून नंतर देवीची पुनः स्थापना करण्याविषयीं राजास अर्ज करावा. तें सर्वांस मान्य होऊन ते सावकारलोकांकडे गेले. त्यांनींही सांगितलें कीं, आमचे मनांत-सुद्धां ही गोष्ट आली होती; परंतु राजाच्या भीतिस्तव आम्ही कोणाशीं बोललों नाहीं. सांप्रत हा मजकूर आबालवृद्धांचे तोंडीं झाला आहे, तस्मात् राजास असक्यानें लोप व्हावयाचा असें होणार नाहीं. नंतर सावकार व मोठमोठे मानकरी, प्रधान, प्रतिनिधि वगैरे सर्व लोक मिळून त्यांनीं राजास हा मजकूर निवेदन केला, आणि अखेरीस असें सुचविलें कीं, जर कर्देवीची स्थापना पुनः न होईल तर आम्ही हें शहर सोडून जाऊं.

ज्या वेळेस देवीस पुरून टाकिलें त्याच वेळेस चित्रपाल राजाचे अंगास कांटा आला होता. त्या दिवसापासून त्याला धाकच होता कीं, पुरातन देवीची दुर्दशा केल्या कीं कांहीं तरी अरिष्ट उत्पन्न होईल. त्यावर जेव्हां पद्मनयना हरवली, तेव्हां तो देवीच्याच कोपाचा परिणाम असें त्यास वाटलें; परंतु आपणच केलें म्हणून त्यास बोलतां आलें नाहीं. मोठमोठे सरदार व श्रीमंत लोक जेव्हां देवीचे हाल केल्याबद्दल राजास दूषण देऊं लागले, व एकच गोंगाट झाला, तेव्हां राजाही भयभीत झाला. त्याचे मनांत ती गोष्ट अगदीं बिंबून गेली. तो उठून उभा राहिला आणि डोळ्यांस आंसवें आणून म्हणाला, "हे जन हो, तुम्ही म्हणतां तें सर्व खरें आहे. मी मूर्ख म्हणून त्या इंग्रजी शिकलेल्या नवियाच्या नादीं लागून हें अघोर कृत्य केलें. परंतु आतां मला पश्चात्ताप झाला आहे, याकरितां उद्यां सकाळीं मी देवीची पुनः स्थापना करितों. तुम्ही काळजी करूं नका." असें म्हणून त्यानें नाकदोऱ्या काढल्या. नंतर सर्व आपआपल्या घरीं गेले.

दुसरे दिवशीं ज्या ठिकाणीं देवीस पुरलें होतें त्या ठिकाणीं तिचें दर्शन घेण्याकरितां हजारों लोक जमले. राजा स्वतः व दुसरे मोटमोटे लोक स्नान करून सोंवळ्यानें तेथें आले, त्यांनीं पुजेचा सर्व सरंजाम व पूजा सांगण्यास ब्राह्मण आणिले. ज्या टिकाणीं देवी पुरली होती त्या जागेची प्रथम पूजा करून नंतर खणण्यास आरंभ केला. त्या वेळेस "कदंबा मातकी जय" असें सर्व एकदांच ओरडले, व क्षणोंक्षणीं तसा शब्द करूं लागले. देवी केव्हां निघेल याकडे सर्वांचें लक्ष्य लागलें. आंतील लोकांनीं 'देवी सांपडली' असे शब्द उच्चारतांच मंगलवाद्यें वाजूं लागलीं. सर्व लोक मोठ्यानें जयघोष करूं लागले, व अबीर, गुलाल, पुष्पें, पंचामृतें त्या खांचेंतच टाकूं लागले. नंतर जे श्रीमंत लोक सदृढ होते ते व पुष्कळ ब्राह्मण कंबरा बांधून आंत उतरले आणि त्यांनीं मोठ्या प्रयासानें देवीस बाहेर काढलें.

देवी बाहेर निघतांबरोबर एकच जयजयकार झाला. वाद्यें मोठ्या जोरानें वाजूं लागलीं. राजानें तीस पाहतांक्षणीं साष्टांग नमस्कार घातला. आपले हातानें आपल्या तोंडांत मारून घेतल्या, कान पिरगळले, जिभेस चिमटा घेतला आणि सद्गदित होऊन ह्मणाला, "मातुश्री, या बालकाकडून अन्याय झाला तो पोटीं घालावा." असें बोलून नाक घांसलें आणि पुजेस आरंभ केला. त्या देवीस एका मोठ्या दगडावर बसविलें, आणि पुष्कळ पाण्यानें तीस धुऊन स्वच्छ केलें. नंतर दह्यादुधाच्या कावडी भरून आणल्या होत्या त्या तिजवर ओतून यथासांग पूजा केली. पूजन झाल्यावर तीस एका रथांत बसविलें. देवीची सेवा करण्यास सर्व उत्सुक होते, सबब रथाचे दोर ओढण्यास श्रीमंत लोकही लागले. राजा तिजवर चवरी वारूं लागला. पुढें नानाविध वाद्यें लाविलीं. व सर्व लोक जयघोष करीत आनंदानें रथाबरोबर चालले. याप्रमाणें सर्व गांवांत तिला मिरवून पूर्वीं देऊळ होतें तेथें आणिलें. त्या टिकाणीं तिचें पूर्वीचें सिंहासन एका कोंपऱ्यांत पडलें होतें तें आणून ठेविलें होतेंच त्यावर तिची स्थापना केली. नंतर गांवांतील सर्व कारखाने बंद करून देऊळ बांधण्यास आरंभ केला. कारागीर लोकही बिनपैशानें काम करूं लागले. मोटमोठे लोकही स्वतः कामगारांबरोबर कामें करूं लागले.

कोणी लाकडें दिलीं, कोणी दगड दिले, याप्रमाणें चोहोंकडून मदत होऊन पंधरा दिवसांत देऊळ कामापुरतें तयार झालें. नंतर लागलेंच सप्तशतीचा पाठ करण्यास ब्राह्मण बसविले. जपसंख्या पूर्ण झाल्यावर हवन केलें. देवीचे प्रियभक्त जे रामोशी त्यांस बोलाविलें, त्यांकडून तिचे आवडते भक्ष्य मांस देवविले, व रुधिरानें अभिषेक केला. देवीस उंच उंच वस्त्रालंकार अर्पण करून नंतर बळी काढिला. याप्रमाणें जितके भक्ति दाखविण्याचे प्रकार होते तितके केले; परंतु गांवांतील अरिष्ट कमी न होतां तें उलटें वृद्धिंगत होत चाललें.

हे सर्व प्रकार व भोळेपणा पाहून पुष्पशीलास फार वाईट वाटलें. परंतु त्यानें विचार केला कीं, हे सर्व त्या भिणेभावांत निमग्न झाले आहेत व यांच डोक्यांत ती कल्पना बिंबली आहे, याकरितां या वेळेस हे प्रकार पोकळ आहेत असें जर सांगितलें तर आपणासच मूर्ख ठरवितील. तितक्यांतही तो कांहीं खटपट करता, परंतु पद्मनयनेच्या विरहामुळें त्यास कांहीं सुचेना. त्यानें रात्रंदिवस पद्मनयनेचा निदिध्यास घेतला. तो वारंवार तिच्या स्वरूपाची आठवण करून मनामध्यें झुरे. एके दिवशीं तो रात्रीं बिछान्यावर एकांतीं निजला असतां विचार करूं लागला, " मनोहरपंडितास व श्यामसुंदरासही जाऊन पुष्कळ दिवस झाले, आतां पद्मनयना भेटण्याची आशा उरली नाहीं. अहाहा ! ती चोरून मजकडे पाहून हंसे, तिचें मुख किती शोभायमान दिसे ! त्या दिवशीं रात्रीं तिणें मला खिडकींतून मंजुळ स्वरानें हाक मारिली ' पुष्पशील महाराज, आपण अहां काय!' अहाहा ! किती गोड ते शब्द लागले ! ते अद्याप माझ्या कानांत गुदगुल्या करिताहेत ! नंतर जें घट्ट आलिंगन तिणें मला दिलें त्याचें तर माझ्यानें वर्णन करवत नाहीं. परमेश्वरा मजसारखा पापी त्रिभुवनांत नसेल. मी असल्या अनर्घ्य रत्नाचा उपभोग घेण्यास योग्य नाहीं हेंच खरें. देव कुत्र्याला खीर कोठून खाऊं देणार ? माझी व पद्मनयनेची विवाहग्रंथि तरी कशाला झाली ? अगर मला त्या विहिरींतून तरी असलें दुःख पाहण्यास कशाला काढिलें ? आतां माझ्यानें त्या विहिरींत पुनः उडी टाकवत नाहीं. काय करूं, प्राणप्रियेवांचून हे पंचप्राण व्याकुळ होतात ! हा प्राण निघून जाईल तर

खरें, परंतु तिचा विरह माझ्यानें सहन करवत नाहीं. ती आजपासून बारा वर्षांनीं भेटेल असें जरी कोणीं मला वचन दिलें तरी त्या आशेवर सुद्धां मी काळ कंठीन; परंतु या स्थितींत काय करावें तें मला सुचत नाहीं. कोणी तरी दुष्टानें दागिन्यांकरितां तिचा प्राण घेतला ही गोष्ट खरी आहे ! " असें म्हणून त्यानें जमीनीवर अंग टाकिलें, आणि तो मोठ्यानें शोक करूं लागला:—

दिंड्या.

( राग तिलांग, ताल दादरा. )

प्रिया माझी नयनांत खेळताहे ॥
चित्तव्यापी चिर हृदयपदीं राहे ॥
कशी गेली प्रेमांत कुसुमचापा ॥
घेतवे तो अनिवार विरहतापा ॥ १ ॥
प्रिये कांग केलीस कठिण माया ॥
चित्त होतें तें एक दोन काया ॥
मनाचा हा कवटा धीर केला ॥
प्रेमपात्रा हृदयास तो न आला ॥ २ ॥
जरी होतें टाकोनि जावयाचें ॥
सांग मजला कां दिलें जांवयाचें ॥
पुरें करणें मोडोनि कामनांचें ॥
तरंगातें वारिलेंस कां मनाचे ॥ ३ ॥
तुझ्या वदनानें चंद्र नभीं लाजे ॥
गजाधिकही गति मंद ती विराजे ॥
कोकिलेला तव शब्द फार टोंचे ॥
कटी पाही तों सिंह मनीं खोंचे ॥ ४ ॥
अहा ! कबरीचा भार मयूराला ॥
दुःख नेत्रद्वय देइ कुरंगाला ॥
दंतकांतीनें रत्न कोंदनाला ॥
अधर रागें धिःकार विद्रुमाला ॥ ५ ॥
अहा देवा ! काय हा कोप केला ! ॥
प्राप्त नाहीं सुखलेश मला झाला ॥

प्रिया कोठें नेलीस पद्मनेत्रा ॥
कृपासिंधो जगदीश पद्मनेत्रा ! ॥ ६ ॥
पद्मनयना ती प्रिया कोमलांगी ॥
मालती ते नवकुसुम पंचरंगी ॥
राजविहग ! गेलीस तरी कोठें ? ॥
यइ हातें गे दुःख मला मोठें ॥ ७ ॥
प्राण माझा हा जाय वियोगानें ॥
हृदय भाजे हें विरहपावकानें ॥
मीन तळपे तो तोयविना हांहीं ॥
पुष्पशीला या तडप तशी देहीं ॥ ८ ॥

साक्या.

( राग जोगी ताल धुमाळी ).

मन्दर भेट गडे ॥ चैन तुझ्याविण मज न पडे ॥ ध्रु० ॥
विरहाग्नीनें भाजुनि गेलों तल्लिन मी झालों कीं ॥
प्राणसखे ! तूं रुसुन गेलिस टाकुनि मज या लोकीं ॥ १ ॥
मंदस्मित वदनाची तीच्या आठवण मजला होती ॥
दीनदयाळा पंकजनयना माझी मज लाहो ती ॥ २ ॥

पद.

( राग खमाज, ताल पंजाबी ठेका ).

[ संगीतशाकुंतल नाटकांतील ' आज मज सहज आला उल्हास '. या चालीवर. ]

प्रियसखि विरह करी उदास॥निशिदिन मजसि होतसे त्रास॥ध्रु.॥ शरचंद्र हा सुखद जनाला ॥ रवि परि करि मजसि भास ॥ ॥ प्रिय० ॥१॥ मधुकर अटके कमलि स्नेहेनें ॥ कधि रवि करि कमलविकास ॥ प्रिय० ॥२॥ विरहानल हा जाळि मनाला॥ मज न गमत सुखविलास ॥ प्रिय० ॥ ३ ॥

पद.

( राग भैरवी, त्रिताल ).

लटकें प्रेम कशाला ॥ दाउनि जाशि वनाला ॥ ध्रु० ॥ काय करावें कांहीं सुचेना ॥ प्रियसखीविण चैन पडेना ॥ विरह-वन्हि हा मज सोसेना ॥ दुःखचि होइ मनाला ॥ लटकें० ॥१॥

प्रेम कसें तुज न मनीं आलें ॥ सुखद सुवचनें कां मज वरिलें ॥ ममता लावुनि हृद नेलें ॥ नाहिंस पूर्णपणाला ॥ लटकें० ॥२॥ एक हृदय तें देह दुयाला ॥ भासविलें तूं माझे मनाला ॥ धिक धिक केलें सुरललनांला ॥ स्वप्नीच भास जहाला ॥ लटकें० ॥३॥ मंदगती तव लसति गजापरी ॥ कटिला पाहुनि हरि शोक करी॥ वचन मधुर परिसोनि अंतरीं ॥वेडावुनि पिक गेला॥ लटकें॥४॥ कबरीभारें वेड मयूरा ॥ वेणि करीं तव बद्ध अहींद्रा ॥ विरहानलिं या वहु सुख थारा ॥ प्रेमेंचि या सुजनाला ॥ लटकें ॥ ५ ॥

याप्रमाणें शोक करतांना घटकेंत ती मरण पावली, घटकेंत ती जीवंत आहे, असें पुष्पशीलास वाटे. शेवटीं त्याचे मनांत आलें कीं, "छिः प्राणसखीचें अनिष्ट कां माझे मनांत येतें ? ती कोठें तरी खुशाल असेल. ती थोडकेच दिवसांनीं प्रायः मला भेटेल. परमेश्वराची लीला अघटित आहे. कदाचित् ती आतां भेटण्याचा देखील संभव आहे. कारण, तिला माझा जेव्हां अतिशय ध्यास लागला होता त्या दिवशीं त्याच वेळेस मी येऊन तिला भेटलों. त्याप्रमाणें आज तिजविषयीं मी अत्यंत शोक करीत आहे, सबब या वेळेस येऊन मला आनंदभरित करण्याची तिची पाळी आहे. आली काय ! पद्मनयने, अगे पद्मनयने, कोठें आहेस ? मीं तुला धोंडा मारून आल्याची खूण केली होती, परंतु तूं कोणत्या रीतीनें मला सूचना करणार आहेस ? चल, नको अंत पाहूं. मी खालीं आलों असें तुला समजल्यावर खिडकींतूनच उडी टाकूं कीं काय असें तुला वाटलें होतें मात्र; परंतु मी खचितच उडी टाकीन. तूं वर येस तोंपर्यंत माझ्याच्यानें धीर धरवणार नाहीं. माझा पाय मोडला तरी त्या आनंदांत मला तो दुःख करणार नाहीं! " याप्रमाणें तो मनोराज्यांत निमग्न झाला असतां जरा वाऱ्यानें खिडकी अगर दरवाजा वाजला, म्हणजे त्यास पद्मनयना आल्याचा भास व्हावा. त्यानें चटकन् उठून दार उघडून तीस हांक मारावी. पुनः ती नाहीं म्हणून उदास होऊन बिछान्यावर येऊन पडावें. असें चाललें आहे इतक्यांत जिन्यांत कोणाचीं पावलें वाजलीं; त्या वेळेस त्यास अतिशय आनंद होऊन तो उठला आणि तत्क्षणींच दारापाशीं जाऊन म्हणाला. " अहा ! प्राणवल्लभे.किती अंत पाहिलास बरें ! याकरितां कां-

हीं तरी मृत्युरोचा शब्द बोलल्याशिवाय मी दार उघडणार नाहीं." (दाराआडून शब्द होतो.) "अहो महाराज, बोलतां काय, लवकर दार उघडा. तुम्हास पद्मनगरेकडे नेतों. तिचा शोध लागला आहे, सबब आपणास तिजकडे या वेळेस पाठवावें असा राजसाहेबांचा हुकूम झाला आहे."

हें ऐकतांच मोठ्या उत्कंठेनें पुष्पशीलानें दार उघडलें, आणि पाहतों तों कसची पद्मनयना आणि कसचें काय! एकदम आकाश कोसळल्याप्रमाणें झालें! त्या दारावाट चार पांच यमस्वरूपी हत्यारबंद शिपाई आंत शिरले, आणि त्यांणीं पुष्पशीलाच्या मुसक्या बांधिल्या! त्या वेळेस तुम्ही हें काय करितां वगैरे त्यांस पुष्पशीलानें पुसलें. परंतु ते जबाब न देतां "उगी बस" म्हणून त्यास धमकावूं लागले. अशी स्थिति झाल्यावर तो राजास व राणीस (सासऱ्यास व सासूस) हांका मारूं लागला. ते ऐकूं येईनात तेव्हां निद्रिस्थ असतील असें समजून आळवीत शिपायांस व घरांतील दुसऱ्या माणसांस त्यानें हांका मारल्या; परंतु त्यांचें कोणीही ऐकेना. त्या शिपायांनीं त्या चतुर्भुज करून खालीं आणिलें! तेव्हां राजा आणि राणी उभयतां ओसरीवर उभीं होतीं तें पुष्पशीलानें पाहिलें. त्या वेळेस हीं आपणास सोडवितील असें पुष्पशीलास वाटलें. परंतु त्यांनीं याजकडे पाहून मोठ्यानें हंबरडा फोडला, आणि पद्मनयनेविषयीं शोक करीत ते आंत गेले. दुसरे घरांतील लोक व नोकरचाकर हे जागचे जागीं गुडघ्यांत डोकीं घालून स्वस्थ बसले, परंतु पुष्पशीलास सोडविण्यास कोणी येईना. असें पाहून कांहीं तरी काळाघात आहे असें पुष्पशीलास वाटून तो दैवावर भरंवसा ठेवून स्वस्थ राहिला. शिपायांनीं त्यास खुनी कैदी बसविण्याची कोठडी होती तींत नेऊन ठेविलें. नंतर तुरुंगावरील अधिकारी येऊन त्यानें हवालत केली, आणि पुष्पशीलाभोंवतीं चार शिपायांचा पाहरा नेमून ठेऊन तो निघून गेला. याप्रमाणें बिचारा पुष्पशील हें अकस्मात काय झालें याचा अचंबा करीत अतिदुःखी होत्साता पडून राहिला.

---

# भाग ५.

## अद्भुत चमत्कार.

मागें सांगितल्याप्रमाणें शहरांतील अरिष्टें टाळण्याकरितां पुष्कळ प्रकारांनीं कदंबादेवीस शांत करण्याचे उपाय केले; परंतु त्यांपासून विघ्नें कमी न होतां तीं उत्तरोत्तर वृद्धिंगत होऊं लागलीं. शहरांतील एक चतुर्थांश मनुष्यें नाहींशीं झालीं. बहुतेक लोक विरक्त होऊन देवीच्या देवळांत जाऊन बसले. कोणासही घरदार सुचेना, व संसारसंबंधी व्यवहारांत कोणाचें मन लागेना. पाण्याचा तोटा, आग, महागाई इत्यादि गोष्टींस ते इतके घाबरले नसते, परंतु महामारीचा सपाटा पाहून त्यांचें हृदय दुभंग झालें. ते कल्पना करीत कीं, अजून कांहीं तरी देवीचें चुकलें आहे. याकरितां ते निरंतर तिची प्रार्थना करीत कीं, मातुश्री, आह्मां लेंकरांवर असा जुलूम करूं नको. काय इच्छा असेल ती कळवावी ह्मणजे त्याप्रमाणें तजवीज करूं. नंतर आपल्या आपणांस कांहीं तरी स्वप्न अगर दृष्टांत होईल अशी आशा धरून त्यांनीं सोंवळ्यानें देवळांत निजावें, परंतु कांहीं होऊं नये, अखेरीस त्या शहरांत एक सुमारें पाऊणशें वर्षांचा वृद्ध अग्निहोत्री ब्राह्मण, वेद, शास्त्र, ज्योतिष जाणता महान् विद्वान् होता, तो देवीपाशीं आला. त्याचें सर्व लोकांत मोठें वजन होतें, व तो सत्यवक्ता आहे असा सर्वांचा भाव त्यावर असे. त्या दिवशीं शुक्रवारीं अष्टमी आली होती, सबब त्यानें सारा दिवस उपोषण केलें होतें. संध्याकाळचा वेळ होतांच तो स्नान करून देवीच्या पूजेस आला. यथासांग पूजा झाल्यावर त्यानें एकनिष्ठभावानें तिची प्रार्थना केली कीं, गांवांतील अरिष्टें बंद न होण्याचें कारण काय तें मला सांग. असें ह्मणून तो गाभाऱ्यांत निजून राहिला. पाहांटचे चार वाजावयाच्या वेळेस त्यास स्वप्न पडलें; " जशी काय कोणी एक स्त्री हिरवें लुगडें नेसली आहे, कपाळीं कुंकाचा मोठा मळवट भरला आहे व अंगावर पुष्कळ दागिने घातले आहेत. अशी ती रागानें दांत खात आली आणि दो-

नंतर हात अग्निहोत्रीबोवांकडे करून ह्मणाली, ' अग्निहोत्रीबोवा, पाहिलेंना मी राजास अगदीं क्षुल्लक वाटल्यें होत्यें काय ! आणि अजून तरी जो माझा हाल करण्यास मूळ कारण झाला त्याचा बळी घेतल्याशिवाय मी शांत होणार नाहीं ! ' इतकें पाहून तो अग्निहोत्री जागा झाला. नंतर देवीस साष्टांग नमस्कार घालून तो तेथून निघाला. घरीं आल्यावर पुनः स्नान करून त्यानें नित्यनियम उरकले, आणि रेशीम-काठी धोतर नेसला व मखलाशीची टोपी डोक्यास घातली. एक जुनी शालजोडी हातावर घेऊन दळदळीत भस्म व त्यावर दुबोटी आडवें गंध लावून बाहेर पडला. जो कोणी भेटे त्यास रात्रीचें स्वप्न सांगत तो प्रथम प्रधानजीच्या घरीं गेला. प्रधान, प्रतिनिधि व दुसरे कित्येक लोक त्या ठिकाणीं बसले होते. त्यांनीं अग्निहोत्र्यास पाहतांच उठून जोडाशीं जागा देवली आणि येण्याचें कारण विचारलें.

अग्निहो०—( सद्गदित होऊन. ) महाराज, काय विचारतां, प्रसंग मोठा कठिण येऊन ठेपला आहे !

प्र० व प्रति०—(घाबरून) का महाराज, काय ह्मणतां ? आलें तरी काय ?

अ०—काय विचारतां, माझें बोलणें तुह्मांस कदाचित् खोटें वाटेल.

प्र० व प्रति०—छिः छिः असें ह्मणूं नका, तुह्मांविषयीं कोणास-ही असें वाटणार नाहीं. आमचा भाव तुमच्या सारख्यांच्या ठिकाणीं आहे कीं नाहीं हें त्या परमेश्वरास माहित.

अ०—बरें तर ऐका. काल अष्टमीसह शुक्रवार आला होता, यास्तव गांवांतील कल्पांत अद्याप कसा कां होत नाहीं ह्मणून म्यां देवीवर संकट घातलें होतें.

प्र०—वाः ! चांगली गोष्ट केली. आपल्यावांचून असलीं कामें दुसरा कोण करणार आहे ? बरें कांहीं साक्षात्कार झाला काय ?

अ०—हें काय विचारणें, तो सांगण्यासाठींच तर या वेळेस मी येथें आलों आहें.

प्र०— अहाहा ! याचें नांव काम; आणि यांसच पुण्यपुरुष ह्मणावें. पुष्कळ लोक यासाठीं रात्रंदिवस देवीची आराधना करिताहेत, परंतु व्यर्थ. असो, काय साक्षात्कार झाला तो लवकर सांगा.

अ०—( डोळ्यांस आसवें आणून. ) महाराज, देवी जांबाई बोवांस

बळी मागते, आणि तो मिळाल्याखेरीज शांत होणार नाहीं असें ह्मणते.

प्र०व प्रति०—( एकदांच. ) काय पुष्पशील महाराजांस ?

अ०—( हळूच दुःखानें. ) होय, महाराज.

( हे शब्द एकतांच सर्वांचीं अंतःकरणें दुभंग झालीं. कोणाच्यानें वर मान करून एक शब्दही बोलवेना. ) शेवटीं प्रतिनिधि ह्मणाले, " अहो, ही कदंबादेवी महा जाज्वल आहे. हें पुरातन अति कोपायमान पीठ आहे, हिची इच्छा परिपूर्ण केल्याशिवाय इलाज नाहीं. जोंपर्यंत तिचा मान राखला होता तोंपर्यंत तिणें या शहरांतील लोकांचें रक्षण पोटच्या लेंकरांप्रमाणें केलें होतें. वडील सांगतात कीं, ही देवी रात्रीं विशाळ रूपानें हातांत खड्ग घेऊन लोकांचे रक्षणार्थ या शहराभोंवतीं फिरत असते. तुह्मीच पहा कीं, असा प्रकार एकदां तरी कधीं उत्पन्न झाला होता काय ? अग्निहोत्रीबोवांस आठवत असेल, मागें एक दोन वेळां महामारी आली होती; परंतु दोन चार माणसें गेलीं ह्मणजे लागलीच सर्वांनीं देवीची स्तुति करावी, कीं पुनः शांतता होत असे. पूर्वींचीं मनुष्यें भोळीं. त्यांचा देवांब्राह्मणांपाशीं भाव असे, ह्मणून देवही त्यांस साहाय्य होत असे. आतां दिवसानुदिवस कलीचा जोर होत चालला, लोकांचा भाव उडाला, त्याला देवानें तरी काय करावें ? तितक्यांत या इंग्रजानें तर फारच भ्रष्टाकार मांडला. सर्वांस इंग्रजी शिकवून वेदविद्या बुडवून टाकिली. धर्मावरील लोकांची श्रद्धा उडवून पाखांडमत उत्पन्न केलें. तशांत आपल्या राजेरजवाड्यांनीं तरी कांहीं स्वधर्माकडे लक्ष्य पुरवावयाचें होतें, परंतु त्यांच्याही मनांत कांहीं येत नाहीं, तस्मात् काळ फार कठिण आला आहे. या भरतसिंह राजास पुष्पशीलास इंग्रजी शिकविण्याची कांहीं गरज होती ? परंतु होणार भविष्य, तें कधीं चुकत नाहीं. त्यास इंग्रजी शिकविण्याची बुद्धि होणार; यास देवता खोटी वाटून देवीस स्थानभ्रष्ट करण्याची इच्छा होणार; चित्रपाल राजास त्याचें मत पसंत वाटणार; हीं ब्रह्मलिखितेंच ह्मणावीं. " प्रधान ह्मणाला, " परंतु आतां यापासून केवढा प्रलय होईल तो पहा. पुष्पशीलास बळी दिल्यानें चित्रपालास मुलगी नाहीं आणि जांवई नाहीं अशी अवस्था होणार; पुढें राज्यावर बसविण्यास पुरुष सांपडणार नाहीं.

दुसरें, भरतसिंहास ही गोष्ट कळतांच दारुण युद्धप्रसंग होणार; त्यामध्यें हजारों लोक मरणार; असे नानाप्रकारचे कहर उत्पन्न होतील. आतां या गोष्टीस काय करावें तें मला सुचत नाहीं. " अग्निहोत्री बोवा ह्मणाले, " रात्रीं देवीची ती क्रोधायमान् मुद्रा माझे नेत्रांपुढें अजून दिसते. माझी खातरी आहे, जर तिणें मागितलेला भक्ष्य तिला न मिळाला तर ती सर्व शहर एका क्षणांत भस्म करून टाकील ! "

प्रतिनि०( प्रधानास. ) महाराज, आतां दुसरा विचार उपयोगी नाहीं. देवीची कामना पूर्ण केलीच पाहिजे.

प्र०— अहो, तुह्मी ह्मणतां तें खरें; परंतु पुढें भरतसिंहाच्या कोपानें तुह्मां आह्मांस भिकेस लागावें लागेल, कदाचित् प्राणासही मुकावें लागेल याचें कसें करितां?

प्रति०— आपणास रक्षणार ती जगदंबा समर्थ आहे. पुढें भरतसिंह राजा युद्ध करून सर्वांचा नाश करील याचा विचार करितां; परंतु देवी आजच सर्वांचा रक्षा करण्यास प्रवृत्त झाली आहे याचा विचार कां करितां? पुढील संकटास भिऊन आज मरावें हा न्याय कोठचा?

प्र०— ( डोळ्यांत आंसवें आणून. ) परंतु एकाद्याचा निरपराध प्राण घेणें हें महान् पाप आहे.

प्रति०— तसें करण्यास देवतेची आज्ञा आल्यास मग कसचें पाप आहे? आणि मला वाटतें, असे जे धर्मशून्य अधम जगांत उत्पन्न होतात त्यास मारिलें असतां त्यांत पाप नाहीं. तशांत जर पुष्पशील ब्राह्मण असता तर ती गोष्ट आलाहिदा होती; परंतु हिंदुधर्मांतील गोब्राह्मणांचें व देवतांचें रक्षण करणारा क्षत्रिय असून जेव्हां त्यास अशी बुद्धि सुचली तेव्हां त्यास काय ह्मणावें? खरें पुसाल तर, ज्या वेळेस देऊळ मोडण्याची गोष्ट त्यानें प्रथम काढली, त्याच वेळेस त्याचें शीर उडवावें असें माझे मनांत आलें होतें; परंतु राजसत्तेपुढें नाइलाज झाला.

याप्रमाणें प्रतिनिधि बोलल्यावर पुष्पशीलास बळी द्यावें हें सर्वांस मान्य झालें. नंतर राजाच्या निवांत बसण्याच्या वेळेस ते सर्व जमून

त्याकडे गेले. अग्निहोत्र्यानें पडलेलें स्वप्न अक्षरशः राजास सांगितलें. प्रधान वगैरे मंडळींनीं असें करण्याची अवश्यकता, व त्यापासून होणारे अपायांचें निरसन कोणत्या प्रकारें व्हावयाचें तें सर्व सांगितलें. तें ऐकून चित्रपाल राजानें धरणीवर अंग टाकिलें, आणि अगदीं सद्गदित होऊन तो ह्मणाला, "माझी पद्मनयना सांपडली तर तिला मी काय सांगूं?" असें ह्मणून तो शोक करूं लागला. त्या वेळेस प्रतिनिधि त्याचें सान्त्वन करून ह्मणाले, "महाराज, आतां कसची पद्मनयना आणि कसचा जांवई! प्रजापालनाकडे लक्ष्य द्या ह्मणजे झालें. तुह्मास काळरूपी जांवई मिळाला त्याणें पद्मनयनेचा घात केला, आणि आपणही चालला. तो पूर्वजन्मींचा वैरीच ह्मणावयाचा, त्यानें आपला सूड उगविला. मागें देवीचा छळ करण्याचे वेळेस आमचें राहिलें, परंतु या अग्निहोत्रीबोवांसारख्यांचें तर संमत घ्यावयाचें होतें! त्यांनीं तर सत्य गोष्ट सांगितली असती! परंतु तसें न करितां त्या आतांच्या काळच्या सुधारलेल्या हुच्चभाईचें भाषण ऐकिलें आणि हा अनर्थ करून घेतला." त्यावर राजा ह्मणाला, "अहो अग्निहोत्रीबोवा, त्या वेळेस तुह्मीं येऊन माझे तोंडांत कां नाहीं मारिली? तुह्मी वडील होतां व तुह्मास माझा कान पिळण्याचा अधिकार होता. मला कसें गुरळ पडलें! हर हर! परमेश्वरा! काय अनर्थ हा! हे जगदंबे, या बालकावर कवढा कोप केलास! भरतसिंहाचाही वृद्धापकाळ आला आहे. त्याचा एकुलता एक पुत्र मी कसा बळी देऊं?" दुसरे लोक ह्मणूं लागले, "महाराज, आतां जास्ती कल्पना नका काढूं. 'आलिया भोगाशीं असावें सादर.' लुत हजारों प्राणी मरताहेत त्यांची करुणा येऊं द्या. पुढील संकटें निवारणार ती जगदंबा समर्थ आहे." हें ऐकून राजानें मोठ्या मिनतवारीनें ती गोष्ट मान्य केली. नंतर प्रधानानें सुचविलें कीं, त्या स्वारीस याच रात्रीं कैद केलें पाहिजे. मग मुहूर्त पाहून बळी देण्याचा दिवस ठरवितां येईल; कारण, कदाचित् त्यास ही गुणगुण कळली तर तो रात्रींतून कोठें निघून जाईल. तेंही राजानें कबूल केल्यावर प्रधानानें शिपायांस सांगून पुष्पशीलास कैद करविलें. पुढें कैद केल्याचा वगैरे प्रकार कसा झाला तें मागें सांगितलेंच आहे.

दुसरे दिवशीं तें वर्तमान सर्व शहरभर पसरलें. बहुतेक लोकांस तें कृत्य चांगलें वाटलें, परंतु जे कोणी निरपेक्ष व समंजस होते त्यांस हा अगदीं अन्याय वाटला. असो. नंतर राजानें ब्राह्मणांस बोलावून बळी देण्यासाठीं उत्तम दिवस योजिला. पुढें विधि कसा करावयाचा म्हणून ब्राह्मणांस विचारिलें; तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं, इतर पशु बळी देण्याचे मार्ग शास्त्रांत आहेत, परंतु मनुष्याचा बळी कोठें ग्रंथांतरीं नाहीं. तथापि ही देवी सामान्य लोकांची आहे याकरितां इचे भक्त जे येथील वतनदार रामोशी, त्यांच्या घराण्यांतील एखादा पुरुष बोलावून त्याकडून हें कृत्य करवावें. कारण, ते हमेशा कुळाचाराचे वेळेस व नवसाकरितां मनुष्याचा बळी देत असतात, त्याप्रमाणेंच हाही भक्ष्य अर्पण करावा.

दुसरे दिवशीं देवीच्या [illegible] एका वृद्ध रामोशास बोलावून आणिलें, आणि त्यास तो विधि विचारला. तो म्हणाला, "पुढें शुक्रवारीं पौर्णिमा आहे. दिवस [illegible] उत्तम. ब्राह्मणांनीं काढून दिला आहे. याकरितां कांहीं मनांत शंका न आणतां समारंभ उत्तम करावा, म्हणजे सर्व अरिष्ट दूर होऊन राजास लवकर पुत्रसंतान होईल. प्रथमतः इष्ट भक्ष्यास उत्तम स्नान घालून इच्छाभोजन द्यावें. नंतर त्याचे सर्व वस्त्रालंकार काढून काळी लंगोटी नेसवावी. सर्व अंगास काळा रंग लावून मळवट भरावा. मग सर्व गांवांत समारंभानें मिरवून देवीवर उभा करावा. [illegible] [illegible] देण्यासह ब्राह्मण बोलावून देवीची यथासांग पूजा करावी. नंतर [illegible] गजर करून [illegible] त्याचें रुधिर देवीवर ओतावें. जितकें जास्त [illegible] तितकें अधिक कल्याणकारक. अखेरीस [illegible] नमस्कार करून इष्ट भक्ष्याचें शिर उडवावें [illegible] रुधिर देवीवर टाकावें म्हणजे झालें."

याप्रमाणें भयंकर विधि श्रवण करून राजाच्या अंगावर कांटा उभा राहिला; परंतु निरुपाय [illegible] त्यानें तसाच करावयास सांगितलें. ठरलेल्या दिवशीं प्रथम पुरुषाला उत्तम मंगलस्नान घालून उत्तम भोजन घातलें. नंतर तेव्हां वस्त्रालंकार काढण्यास सांगून

काळा रंग आणिला, तेव्हां तो ह्मणाला, "खबरदार, माझ्या अंगास कोणी हात लावला तर ! जर तुह्मी जबरीनें माझ्या अंगावरील कपडे वगैरे काढूं लागाल तर मी पांचपंचविसांचा प्राण घेऊन मरेन, याचा विचार करा !" हें राजास खरें वाटून त्यानें सांगितलें कीं, त्यास तसाच देवळांत न्या. मग वेळेस काय करील तें करो. अशी आज्ञा झाल्यावर पुष्पशीलास देवीपाशीं तसेंच नेऊन एका गादीवर बसविलें. तिसराप्रहर होतांच राजानें स्नान केलें, आणि पत्नीसहवर्तमान देवीच्या पूजेस आरंभ केला. त्या दिवशीं बहुतेक लोकांनीं उपोषणें केलीं होतीं, व तो चमत्कार पहाण्यासाठीं देवळाच्या समोरील पटांगणांत हजारों लोक जमले होते. मुख्य नृपति आपल्या जांवयास बळी देणार, तेव्हां आपणही यथाशक्ति बळी देवीस अर्पण करावे, असें मनांत आणून सर्वांनीं कांहीं तरी आणिले होते. मोठ्या श्रीमंतांपैकीं कोणी वाघ धरून आणिले होते; कोणी चित्त, कोणी लांडगे, कोणी अश्व व हेले आणिले होते. गरीबांपैकीं कोणी तीन, कोणी पांच, सात, नऊ असे विषम संख्येनें शक्त्यनुसार अजापुत्र आणिले होते. अगदीं जे गरीब होते त्यांनीं एक बकरा अगर निदान एक कोंबडा तरी आणिला होता. परंतु रिक्तहस्तें कोणीही आलें नव्हतें.

राजानें मंगलपूजा समाप्त करून पशु अर्पण करण्यास आरंभ केला; तें पाहून सर्व लोकही आपापल्या पशूंचा वध करूं लागले. वाद्यें मोठ्या जोरानें वाजूं लागलीं व बंदुका आणि तोफा सुटूं लागल्या. लोकांनीही मोठ्यानें जयजयकार केला. तेणेंकरून सर्व शहर दणाणून गेलें. देवीच्या अंगावर पुष्कळ रक्त पडलें यामुळें तिचें तें उग्ररूप आपल्या दृष्टीस पडावें ह्मणून जो तो आंत शिरण्यास पाहूं लागला. आंत जाण्यास कोणासही मनाई नव्हती. सबब तेथें इतकी दाटी आली कीं, कित्येक लोक चेंगरून मरण पावले. कित्येकांस एका बाजूनें खांब अगर भिंत आणि दुसऱ्या बाजूनें मनुष्यांच्या गर्दीचा अतिशय जोर लागून त्यांच्या बरगड्या मोडून गेल्या. अशी अतिशय दाटी होऊन मुंगीस देखील फिरण्यास जागा राहिली नाहीं.

पशूंचा वध अपरिमित झाल्यामुळें रुधिराचे पाट सर्व शहरांत चो:

ळून ते नरांस जाऊन मिळाले, व सर्वांचीं अंगें रक्तानें भरून गेलीं. अखेर, नगारे व तुतारे उसळण्याचा एकसारखा सपाटा चालून सर्व वातावरण व्याप्त होऊन गेलें. सूर्यास्ताची वेळ अति संनिध येऊन ठेपली असतां ' करंचा मातेकी जय ' अशा प्रकारचा जयघोष उत्तरोत्तर अधिक अधिक होत चालला; व सर्व लोकांचें लक्ष्य अखेर असा जो देवीचा मुख्य भक्त त्यानें नमस्कार करून राजाच्या हातून निःपक्षपणानें नक्षत्रवत् ... करीत होतें तें तन्मयतेनें पहाण्याकडे लागलें.

सूर्य क्षितिजास चाटतांबरोबर पंचवीस तीस जबरदस्त शिपायांनीं बिन हत्यारें बिचाऱ्या पुष्पशीलास आवळून धरून रुमालानें पुसलेली तरवार चित्रपाल राजाचे हातांत दिली. आणि एकदांच मोठ्यानें जयजयकार केला. त्याचा ध्वनि एकसारखा घुमतो आहे इतक्यांत ब्राह्मणांनीं, ' उडवा शीर ' असें राजास सांगितलें. ते समयीं त्यास पद्मनयनेची आठवण होऊन त्याच्या सर्वांगावर रोमांच उठले. अंगाचा थरकांप झाला, व मी हें काय करितो असें वाटून त्याचा कंठ भरून आला! परंतु येथें दुःख दाखविण्याचें नाहीं असें मनांत आणून पुनः आपण एकदा अत्यंत तीव्र स्वरानें ' श्री महाकाली महालक्ष्मी त्रिभुवननायिका करंचा देवीकी जय ' असा जयघोष करून पुष्पशीलाचें शीर उडविण्यास त्यानें तरवार उगारिली! इतक्यांत ' अडडडडडड ' शब्द करून मधील शिला फोडून करंचा देवी साक्षात् प्रकट झाली! आणि तिनें मोठ्या आवेशानें चित्रपाल राजाच्या हातची तरवार हिसकून घेऊन मोठ्यानें किंकाळी फोडली! तीस पहातांच सर्वांनीं साष्टांग नमस्कार घातले, व हात जोडून तिजकडे अति विस्मयानें व आश्चर्यानें पहात ते तटस्थ उभे राहिले! ब्राह्मणांनीं सप्तशतीचे पाठ चालविले, व बाकीच्यांनीं देवीचीं स्तोत्रें म्हणण्यास आणि नामोच्चारण करण्यास आरंभ केला! आडाणी काचाडी लोकांत मोठा अनर्थ उत्पन्न होऊन ते मोठ्यानें एकच गोंगाट करून ओरडूं लागले, व देवीचें स्वरूप दृष्टीस पडण्याविषयीं यत्न करूं लागले. तिचें स्वरूप अति विक्राळ व भयंकर होतें. ती भरजरी शालू ओंचकाटे खोंवून बसली होती. तिनें अंगांत किनखाबी चोळी घातली होती, व गळ्यांत मोत्यांची पेंडी व पुतळ्यांच्या माळा घातल्या होत्या. तिच्या

कानांत मोठमोठीं भव्य कुंडलें होतीं, व हातांत सुवर्णाच्या बांगड्या होत्या. पायांत सांखळ्या व तोरड्या होत्या, आणि कंबरेस सोन्याचा कंबरपट्टा होता. कपाळभर कुंकाचा मळवट होता, व तिचे केश मोकळे पाठीवर कंबरेपर्यंत पडलेले होते. तिनें हातांस उटी लाविली होती, व गळ्यांत ताज्या पुष्पांचे कमालखानी हार घालून मस्तकावर पुष्पांचा मुगुट धारण केला होता. तिच्या तोंडाभोंवतालचा कांहीं भाग कनकमय दिसत होता, व डोळे लाल सक्रोध दिसत होते. असें त्या देवीचें भव्य व तेजःपुंज स्वरूप पाहून महिषासुरमर्दनाच्या वेळचेंच हें रूप आहे असें सर्वांस वाटलें! व ते तीस वारंवार नमन करूं लागले! चित्रपाल राजा देवीचें स्तवन करूं लागलाः—

पद.

" नरजन्मामाधिं नरा करून घे नरनारायण गडी " या चालीवर.
अथवा संगीतसौभद्रांतील " वीर शिरोमणि धनुर्धर. " हा चाल.

॥ त्रिपुरसुंदरी आदिभैरवी तुळजापुरवासिनी ॥
॥ जग तनुजासम पालिनी ॥ ध्रु० ॥
॥ हिमनगतनय जय जगदंबे सकल जगन्मोहिनी ॥
॥ खल महिषासुर मर्दिनी ॥
॥ थोर विक्रमें केली सीमा अमितासुर मारुनी ॥
॥ गाती विबुधजन कीर्तनीं ॥
॥ नुपुरभूषित पादसरोरुह पीतांबर नेसुनी॥
॥ गदादिदर करीं घेउनी ॥
॥ चाल ॥ घातली रुंडमाळ ती गळां ॥
॥ शोभतसे कुंडलांची कळा ॥
॥ वाटतो क्रोध अला आगळा ॥
॥ वक्र भ्रुकुटीनें क्षण न लागतां दानवअसु हारिणी ॥
॥ जग तनुजासम पालिनी ॥
॥ भवसागरीं मी बुडलों असतां कशी अंबा धांवली! ॥
॥ जननी दयाघन जाहली!
॥ धन्य जन्म हें झालें माझें जगदंबा भेटली! ॥
॥ सुखाची मज घटिका लाभली ॥

॥ आमाना या तुज दिषलें म्यां कन्याही वाहिली ॥
॥ मज तुझी ठिक सेवा घडली ! ॥
॥ चाल ॥ कशाला मज ही तनु पाहिजे ? ॥
॥ सुखाचीं मिळलीं चरणांबुजें ! ॥
॥ मज नको राज्य गमे घोर जें! ॥
॥ दुष्टविमर्दिनी भक्तसुपालिनि मुनिवर मनमोहनी ॥
॥ जग तनुजासम पालिनी ॥ २ ॥

अशी सर्व भोळेभक्तांची भक्ति पाहून देवीच्या हातांत ज्या दोन तरवारी होत्या त्या फिरविण्यास तिणें आरंभ केला. ती ताडकन् उडून सभामंडपांत गेली. आणि त्या तरवारी अशा तऱ्हेनें फिरवूं लागली कीं, त्यांवर कोणाची नजर ठरेना! याप्रमाणें कांहीं वेळ नृत्य करून हस्तकौशल्य प्रकट केल्यावर देवी राजाकडे वळून ह्मणाली, " हे चित्रपाला! तुझी एकनिष्ठ भक्ति पाहून मी तुजवर सुप्रसन्न आहे. तुझी मुलगी आणि जांवई ब्रह्मासावित्रीप्रमाणें नांदोत! " इतकें बोलून तिणें मोठ्यानें हांक मारली, " पद्मनयने, बेटा ये लवकर! " असे शब्द निघतांच ज्या भिंतींतून देवी प्रकट झाली त्याच स्थलांतून उत्तम वस्त्रालंकार परिधान केलेली पद्मनयना येऊन तिणें देवीस व बापास नमस्कार केला. तसमयीं त्या आनंदास काय पुसावयाचें!! सर्वांच्या नेत्रांवाटे आनंदाश्रूंचे लोट चालले! इतक्यांत देवीनें पुष्पशीलाचा हात धरून तो राजाचे हातांत दिला आणि ती म्हणाली कीं, " हे चित्रपाल राजा! तुझी भक्ति पाहून हा जांवई तुला म्यां बक्षिस दिला आहे. " नंतर देवीनें राजाच्या मस्तकीं हस्त ठेवून आशीर्वादयुक्त भाषण केलें! "हे चित्रपाला! तुजसारखा सत्वधीर राजा या भूमंडलांत कोणीही नाहीं! आतां तूं त्रैलोक्यांत धन्य आहेस! तुझ्या शहरांतील सर्व संकटें शांत होऊन यांतील रहिवाशांस अमरावतीनगराप्रमाणें सुखें होतील, व हा तुझा जामात उत्तम प्रकारें प्रजेचें पालन करून दिगंत कीर्ति मिळवील, व तुझ्या कन्येस अनुपम सुख देईल! " असें बोलून तिणें आपल्या गळ्यांतील पुष्पांचा हार पुष्पशीलाच्या गळ्यांत घातला, आणि मोत्यांचें पेंडें पद्मनयनेच्या गळ्यांत घातलें; नंतर सर्वांस घरोघर जाण्यास आज्ञा देऊन आपण

गाभाऱ्यांत गेली आणि दरवाजा बंद करून अदृश्य झाली.

याप्रमाणें चमत्कार पाहून सर्वांस विलक्षण आश्चर्य वाटलें ! ते ह्मणाले, केल्या कष्टाचें सार्थक्य उत्तम झालें. देवतेनें प्रत्यक्ष रूप धारण करून साक्षात्कार दाखविला, आणखी काय पाहिजे ? ज्या ठिकाणीं भाव आहे त्या ठिकाणीं देव आहेच! असें बोलत सानंदाश्चर्येंकरून भरित होत्साते पुष्पशीलास व पद्मनयनेस ईश्वरीप्रसाद समजून त्यांस मोठ्या संमानानें राजवाड्यांत नेण्याच्या तयारीस लागले.

राजानें भांडार फोडून ब्राह्मणांस लुटण्यास परवानगी दिली, व हत्तीवरून साखर वांटण्यास सांगून बंदीवानांचे बंद खुले करण्यास हुकूम दिला. सर्व लोकांनीं गुढ्या उभारल्या व दीपवाळीपेक्षां शतपट दीपोत्सव केला. किल्ल्यावर तोफांची सरबत्ती चालली, व सर्व गांवांतील रस्त्यांत कुंकाचे सडे टाकिले. पलटणींतील पायदळ शिपाई देवळापासून राजवाड्यापर्यंत दुतर्फां उभे राहिले. नगरजन आनंदयुक्त होत्साते नळे, चंद्रज्योति, फुलबाजा वगैरे दारू सोडूं लागले, व पलटणींतील शिपाई एकदम शेंकडों बंदुकांचे बार काढूं लागले. याप्रमाणें तयारी झाल्यावर पुष्पशीलास व पद्मनयनेस बसण्याकरितां एक सर्व जवाहिरानें मढविलेला व रत्नखचित अंबारीचा हत्ती आणिला. अंबारीमध्यें गुडघ्याइतकी उंच परांची गादी टाकिली होती व त्या अंबारीसभोंवतीं मोठमोठ्या मोत्यांच्या झालरी लाविल्या होत्या. हत्तीच्या अंगावर भरगच्ची झूल घातली होती व तिच्या खालीं लोंबणाऱ्या दशांस मोत्यें लाविलीं होतीं. त्याच्या गंडस्थळीं सुवर्णाच्या तारांची भरदार जाळी घातली होती व गळ्यांत मोटमोठाल्या पदकांच्या रत्नजडित माळा घातल्या होत्या. पायांत सोन्याचे तोडे व वाळे होते व दांतांभोंवतीं हिरकण्या लाविलेलीं वेढीं होतीं. याशिवाय दुसऱ्या गाड्या व बग्या इतर लोकांस बसण्याकरितां आणिल्या होत्या. घोड्यांवर सोन्याचे व चांदीचे अलंकार घालून ते पुढें चालण्याकरितां आणिले होते, व शृंगारलेले उंट नौबदी व नगारे चढवून आणिले होते. गाड्यांवर नगारखाने, व कर्णेवाले आणि शिंग वाजविणारे आणिले होते. याप्रमाणें स्वारीची तयारी झाल्यावर देवळामध्यें सर्व सरदार व साव-

गल्या व कंबरेवर पाण्याच्या घागरी भरून आणून हत्तीपुढें ओतित्या झाल्या; आणि **पुष्पशील व पद्मनयना** यांस मोठ्या उत्कंठेनें पाहून त्यांवरून दहींभात ओंवाळून टाकल्या झाल्या.

याप्रमाणें ती वरात सर्व गांवांत मिरवून राजवाड्यापाशीं आली. ते समयीं दारूकाम खूपच सोडिलें. राजवाड्याभोंवतीं पुष्पांच्या माळा बांधिल्या होत्या. चंदनीअत्तराच्या हंड्या लाविल्या होत्या. सर्व नोकरांस नवे पोषाख दिले होते, सबब ते अंगावर घालून मोठ्या नम्रतेनें सलामी करण्यास उभे होते. राजवाड्यांत व त्यापुढील रस्त्यांत केळींचे खांब लाविले होते, व मोठमोठीं सोन्याचीं तोरणें लाविलीं होतीं. छत्रें, निशाणें, अबदागीर, झेंडे, आणि गोंडे, असे ओळीनें उभे करून ठेविले होते. **पुष्पशील** व **पद्मनयना** अंबारींतून खालीं उतरतांच **पद्मनयने**च्या आईनें दहींभात त्या उभयतांवरून ओंवाळून टाकिला, आणि सुवर्णजलकुंभ त्यांपुढें ओतिले. नंतर **पद्मनयना** आणि **पुष्पशील** हे राजवाड्यांत चालले असतां दरवाजाशीं **धैर्यशील व मनोहरपंडित** हे पुष्पशीलानें आगतस्वागत करण्याकरितां उत्तम पोषाख करून उभे होते ते भेटले. त्यांस पाहतांच **पुष्पशीलानें** एकदम जाऊन त्यांस आलिंगनें दिलीं व हात धरून आंत नेलें. आंत गेल्यावर सर्व स्त्रियांनीं पुष्पशीलास व **पद्मनयनेस** एकमेकांचीं नांवें घेण्यास सांगितलें. कांहीं वेळ किंचित् लाजून व आंतचे आंत हंसून त्यांनीं नांवें घेतल्यावर त्यांच्या पदरांच्या गांठी सोडल्या. नंतर भोजनाची तयारी झाली. ते समयीं **पुष्पशीलाचे** मित्र व **पद्मनयने**च्या मैत्रिणी यांणीं आग्रह करून **पुष्पशीलास** व **पद्मनयनेस** एका ताटांत जेवावयास बसविलें व दुसरे सर्व लोकांची पंगत बसली, व भोजनास आरंभ झाला. ते-समयीं त्या दंपत्यास एकमेकांस घांस देण्यास सांगितलें. त्यांनीं परस्परांचीं नांवें घेऊन परमप्रीतीनें घांस दिले. तें पाहून **पद्मनयनेच्या** मातापितरांस व इतर सर्व लोकांस फारच संतोष वाटला. **मित्रपालराजाच्या** मनाची स्थिति आदले दिवशीं अशी होती कीं, त्यास या जगांतील सर्व गोष्टी अशाश्वत् वाटून तो अगदीं विरक्त झाला होता; व आपणास मरण प्राप्त होईल तर बरें होईल

असें त्यास वाटलें होतें. त्याच चित्रपालास हे सोहळे अकल्पित दृष्टीस पडल्यामुळें केवळ अधोगतीस गेलेल्यास एकदम स्वर्गवास झाल्यासारखें वाटलें. जेवणें आटोपल्यावर पानसुपारी झाली व सर्व लोक या अभिनवचरित्राच्या गोष्टी सांगत बसले. राजवाड्यांत हिरव्या, पिवळ्या, तांबड्या आणि तांबड्या अशा अनेक रंगांचीं विलायती झुंबरें लाविलीं होतीं. याशिवाय हंड्या, चंद्रप्रकाशदीप व नानातऱ्हेचीं निरांजनें यांचीही संख्या पुष्कळ होती. त्यामुळें सर्वत्र दिवसाप्रमाणें प्रकाश पडला होता, व अत्तरगुलाबांचा सुवासही सर्व शहरभर पसरला होता. तेवढ्यांत पद्मनयना आपल्या सख्यांत जाऊन बसली व पुष्पशील आपल्या मित्रांमध्यें आला. ते वेळीं एकांत पाहून धैर्यशील म्हणाला, "कां पुष्पशीला, कसा काय रंग आहे!" पुष्पशील म्हणतो, "धैर्यशीला, काय सांगू, कद्रू बादेवीवर आपला आजपासून पक्का भार बसला; आतां आपण असल्या जागृत दैवतास मोठें मानणार नाहीं." हें त्याचें भाषण ऐकून मनोहरपंडित व धैर्यशील हसून म्हणाले, "पुष्पशीला, अरे, असल्या क्षुद्रदेवतेवर तूं इतका विश्वास ठेवतोस काय!" पुष्पशील आश्चर्यानें म्हणतो, "अरे, देवतेनें साक्षात् प्रकट होऊन पद्मनयनेस इच्छामात्रेंकरून उत्पन्न केलें असतां तुम्ही हसतां, आतां शर्थ झाली!" मनोहरपंडित व धैर्यशील अधिक मोठ्यानें हसतात, आणि म्हणतात: "शाबास शाबास!" हें ऐकून पुष्पशीलास त्यांचा भावार्थ न समजून हें काय गूढ आहे तें कळावें म्हणून तो त्यांचे फार आर्जव करूं लागला. तेवढ्यांत धैर्यशील बोलला: "अरे वेड्या, मी देवीचें सोंग घेऊन तेथें प्रकट झालों असतां तूं देवी उत्पन्न झाली असें समजलास काय!" पुष्पशील विस्मित होऊन म्हणतो, "धैर्यशीला, अरे हें तर विटंबणा लावून त्वां केलें! बरें, आतां कृपा करून सर्व सविस्तर सांग." तो असें बोलल्यावर मनोहरपंडित सांगूं लागला:—"पुष्पशीला, काय विचारतोस, आजचें धैर्यशीलाचें धाडसकर्म निर्विघ्नपणें सिद्धीस गेलें, म्हणून ही घटका आपणांस प्राप्त झाली आहे. असो. आम्हांस मोठ्या कष्टानें पद्मनयना सांपडल्यावर मी पूर्वीप्रमाणें हुशार होतांच आम्ही त्या

अमलपुरींतून निघून सर्व मंडळी विचित्रपुरीस येऊं लागलों; आणि आज चार वाजतां जेव्हां आम्ही या शहरच्या टप्यांत आलों तेव्हां मोठमोठ्या आरोळ्या आणि वाद्यांचे गजर ऐकूं आले. त्यावर कोणीं गांवांतून येणारजाणारास हें काय चाललें आहे असें साहजिक विचारलें. त्यानें तुला सूर्यास्ताबरोबर बळी द्यावयाचें आहे त्याचा हा विधि चालला आहे वगैरे सर्व सांगितलें. तें वर्तमान ऐकतांच आम्हा सर्वांच्या कंबरा बसल्या. दुःखानें भाजून गेलेल्या पद्मनयनेनें तर धाडकन् जमिनीवर अंग टाकून शोकास आरंभ केला. त्या वेळेस आमच्या मनांत आलें कीं, या भोळ्या लोकांस पद्मनयना सांपडली आहे असें जरी वर्तमान सूर्यास्ताच्या अगोदर कळलें, तथापि देवीस अर्पण केलेला बळी त्यांच्या बापाच्यानेंही परत घेववला नसता. याकरितां तुझा जीव वांचविण्यास कांहीं एक युक्ति सुचेना. अखेरीस मित्र धैर्यशीलानें मी देवीचें सोंग घेऊन त्या स्थानीं प्रकट होतों आणि सर्व संकटें निवारितों अशी युक्ति काढिली. ती सर्वांस मान्य होऊन जगन्नियंत्या परमेश्वराची करुणा भाकून तसें करण्यास त्याणें आरंभ केला. प्रथमतः सर्व सरंजाम जमवून जंगलांतच एक तंबू ठोकून सोंग तयार केलें, आणि नंतर पद्मनयनेस घेऊन बुरख्याच्या गाडींतून आम्ही कदंबेच्या देवळामागें जाऊन बसलों. नंतर पद्मनयनेचा मावसभाऊ जो आपल्या शाळेंत कांहीं दिवस कलकत्त्यास होता, व ज्यास पद्मनयना हरवल्यापासून राजानें आपल्या जवळ ठेविलें होतें तो अकस्मात् भेटला. त्यास ही युक्ति सुचविल्यावरून त्यानें मोठ्या आनंदानें पुष्कळ साहाय्य केलें. तेथें आणखी टापटीप करून देवीच्या मागील भिंत हळूहळू उकरण्यास आरंभ केला. गोंगाट मोटा चालला होता, व गर्दी फार झाली होती, आणि सर्वांचें लक्ष्य देवीकडे लागलें होतें, यामुळें आमचें सर्व कृत्य निर्विघ्नपणें शेवटास गेलें. आम्हीं पडदे लाविले होते व शिपायांस सांगून कोणासही तिकडे येऊं दिलें नाहीं, यामुळें कोणासही कांहीं संशय आला नाहीं. सूर्यास्ताची वेळ आल्यावर जेव्हां फारच मोठा गोंगाट झाला तेव्हां धैर्यशीलानें लाथ मारून देवीमागील भिंत पाडली आणि तो एकदम प्रकट झाला. त्यानें पद्मनयनेस सांगून ठेविल्याप्र-

माणें हांक मारताच मीही मोठ्या आवेशानें तुम्हाकडे धांवून आली. याप्रमाणें सोंगाची संपादणी झाल्यावर धैर्यशील व मी पुनः बुरख्याच्या गाडींत बसून गांवाबाहेर निघून गेलों. व मागाहून खटला घेऊन सावकाश गानवाल्यांस घेऊन तुम्ही वाट पहात बसलों."



# भाग ६.

## प्रीतिविवाह.

---

मागील भागांत सांगितल्याप्रमाणें मनोहरपंडितानें कथन केलेलें वर्तमान श्रवण करून पुष्पशीलास धैर्यशीलाच्या समयसूचकतेचें व धैर्याचें विलक्षण आश्चर्य वाटून गहिंवर आला. त्यानें धैर्यशीलाच्या गळ्यांत मिठी मारिली आणि तो स्फुंदुस्फुंदून रडूं लागला. तो त्याचे व ईश्वराचे आपले प्राण वांचविल्याबद्दल आभार मानून धैर्यशीलास केवळ ईश्वर मानूं लागला.

इतक्यांत दोनचार तरुण मुली पुष्पशीलास विड्या तोडण्यास बोलावूं लागल्या. तेसमयीं ते सर्वच मध्यघरांत गेले. तेथें पुष्कळ स्त्रिया व पुरुष मौज पाहण्यास जमले होते, व उत्तम बिछायत घालून चकचकाट केला होता. त्या ठिकाणीं विड्या तोडल्यावर व सुपाऱ्या लपविण्याची गंमत झाल्यावर त्या सर्व स्त्रियांनीं पद्मनयनेस व पुष्पशीलास रंगमहालांत ठेवून आपण निघून गेल्या.

त्या अनुपम महालांत येतांच तीं उभयतां मागील सर्व दुःखें विसरलीं. तीं एकमेकांच्या गळ्यांत हात घालून पलंगावर जाऊन बसलीं व एकमेकांच्या मुखांत तांबूल घालूं लागलीं. नंतर एकमेकांच्या गालांचीं चुंबनें मोठ्या प्रीतीनें व प्रमोदानें घेऊन त्यांनीं परस्परांस अगदीं घट्ट आलिंगन दिलें. याप्रमाणें अति आनंदांत कांहीं काळ गेल्यानंतर तीं एकमेकांच्या अंगावर हातपाय टाकून परस्परांचें वर्तमान विचारूं लागलीं. तेसमयीं पुष्पशीलास पद्मनयना हरवल्यापासून तिची काय अवस्था झाली ती ऐकण्याची फार इच्छा होती; सबब त्यानें तीस मला सर्व सांग, असें म्हटलें. त्यावर पद्मनयनेनें मागील सर्व दुःखें आठवून मोठा दुःखाचा सुस्कारा टाकून भ्याल्यासारखें केलें. आणि पुष्पशीलास अधिक दृढ आलिंगन देऊन सद्गदित होऊन ती बोलूं लागली. तिनें पुष्पशीलाकरितां प्रथमदिवसापासून मरीम्हातारीनें घर जाळल्याचा आरोप घालून

झाडाशीं बांधून ठेविलें येथपर्यंत सर्व सांगितलें. आणि पुढें म्हणाली:
"त्या दुष्ट म्हातारीनें मला दिवस उगवेपर्यंत अतिशय जाच केला, आणि दिवस उगवल्यावर मला आणखी झाडाशीं पक्कें जखडून ती निघून गेली. नंतर दुपारीं सुमारें बारांवर दोन वाजतां सात आठ असामी घेऊन परत आली. त्यांनीं आपल्याबरोबर एक दारूनें भरलेला डेग आणिला होता, व सर्वांजवळ एक एक तरवार होती. ते सर्व येऊन माझ्या भोंवतीं गराडा घालून बसले, आणि प्रथम एकमेकांस आग्रह करून दारू पाजूं लागले. हे सर्व लोक, त्या म्हातारीनें माझा न्याय तोडण्याकरितां आणिले होते; कारण, त्या लोकांत अशी चाल आहे कीं, त्यांना आपमांत जर एखादा तंटा उत्पन्न झाला तर तो सरकारांत न जातां जातींतील पंचांनीं तोडला पाहिजे. पंचांनीं प्रथम दारू पिऊन गुंग व्हावें, मग जसा पाहिजे तसा न्याय करावा. त्याप्रमाणें सर्व पंच अमलानें गुंग झाल्यावर म्हातारी बोलली कीं, मला व काळोजीला ठार मारून टाकावें अशा उद्देशानें हिनें मुद्दाम माझे गवत आग लाविली. पंचांनीं तें ऐकून मला कांहीं एक न विचारतां सर्व अन्याय माझा आहे असें ठरविलें. त्या वेळेस शिक्षा काय करावी म्हणून ते विचार करूं लागले. एक म्हणाला, येथेंच तरवारीनें कापून टाका. दुसरा म्हणाला, विहिरींत लोटून द्या. असें होतां होतां अखेरीस एक म्हातारा एका बाजूस बसला होता तो म्हणाला, "अहो, असें कशाला! परवांचे दिवशीं अमलपुरींतील राजाच्या बागेखालच्या देवीचा कुळधर्म आहे; तेथें तीन स्त्रियांचा बळी अवश्य पाहिजे, याकरितां तेथें हिला पोंचवून द्या म्हणजे झालें." ती गोष्ट सर्वांस मान्य झाली. म्हातारी म्हणाली, "वा! ही युक्ति फार चांगली काढली; कारण, ही मूळ देवीस अर्पण केलेला भक्ष्यच आहे."

"याप्रमाणें ठराव झाल्यावर त्यांनीं माझी मोट करून तेथून जें उचललें तें रानोरान चालून अमलपुरींतील देवळापाशीं मोकळें केलें. नंतर माझी अतिशय दुर्दशा करून मला देवीवर टांगून ठेविलें. माझ्यामागून सुमारें दोन तासांनीं धैर्यशील वगैरे तेथें येऊन त्यांनीं माझी सुटका केली, नाहीं तर मी तेथें विनतोड माणास मुकलें असतें."

असें पद्मनयनेचें वर्तमान ऐकून पुष्पशीलाच्या नेत्रांवाटे अश्रुपात चालले. नंतर पुढील सर्व मजकूर तिच्या मुखानें ऐकल्यावर त्यानें आपली सर्व हकीकत सांगितली. याप्रमाणें बोलण्यांत व सुखोपभोगांत सर्व रात्र निघून गेली.

प्रातःकाळ होतांच मुखमार्जन झाल्यावर पुनः पुष्पशील, धैर्यशील, मनोहरपंडित, पद्मनयना व तिजबरोबर सांपडलेली स्त्री वगैरे मंडळी एकत्र बसून आनंदाच्या गोष्टी बोलूं लागली. तेसमयीं पुष्पशील त्या नव्या स्त्रीकडे पाहून म्हणतो, " सगुणाबाई, तुमचें वर्तमान कसें आहे तें ऐकण्याची आम्हा सर्वांस फार इच्छा आहे." सगुणाबाई म्हणाली, " काय विचारतां महाराज? मजसारखी दैवहीन या जगांत कोणीच नसेल. माझा बाप अति दरिद्री एक भिक्षुक ब्राह्मण आहे. तो माणिकपूर शहरांत राहात असतो. त्या ठिकाणीं इंग्रजसरकारचें राज्य झाल्यास थोडकींच वर्षें झालीं आहेत, तथापि त्या दिवसापासून शहराची व लोकांची सुधारणा चांगली होत चालली आहे. तेथें सरकारी इंग्रजी व मराठी शाळा स्थापन झाल्या आहेत, व एक मुलींची शाळाही आहे. त्या मुलींच्या शाळेंत मी घरीं दांडगाई करीं म्हणून माझ्या आईबापांनीं मला घातलें होतें. जरी मला विद्या न यावी असा त्यांचा उद्देश होता, तरी घरच्या खोडा कमी होण्याकरितां त्यांणीं मला चार वर्षें शाळेंत ठेविलें. तितक्या वेळांत माझें पुष्कळ शिकणें झालें. मी आठ वर्षांची होत्यें तेव्हांपासून बारावें वर्ष लागेपर्यंत पुष्कळ अभ्यास केला. मराठी शाळेंतील सहाही बुकें वाचलीं. पूर्णांक, अपूर्णांकपर्यंत गणित शिकल्यें. भूगोल, व्याकरण वगैरे सर्व विषय मला आले. पुढें मला विद्येची अत्यंत गोडी लागली, व आमचे शिक्षकही म्हणाले कीं, तुमच्यांपैकीं कांहीं जणींस थोडे दिवस नार्मलस्कूलांत पाठवूं म्हणजे तेथें तुमचा जास्ती अभ्यास वाढून तुम्हांस मुलींच्या शाळांवर शिक्षक नेमतील. ती गोष्ट मला आवडली. कारण, तसें झाल्यानें आमच्या देशांतील पुष्कळ अज्ञानी स्त्रियांचीं मनें वळवून त्यांस सत्यमार्ग प्रदर्शित करण्याचें पुण्य मला मिळालें असतें. परंतु काय करूं ? माझ्या आईबापांचे मनांत ती गोष्ट येईना. मला बारावें वर्ष लागतांच

त्यांनीं शाळेंतून काढिलें. माझ्या बापाच्या मनांत माझ्याबद्दल हजार रुपये मोजून घ्यावयाचे आहेत. याकरितां जरी मला हल्लीं चवदावें वर्ष लागलें आहे तरी तो मासें लग्न करीत नाहीं. एखादी रक्कम एखादा म्हातारा देऊन मला वरील आणि पुढें तो लवकरच मरून मला वैधव्यदुःखांत घालील! (रडूं लागते.) माझा बाप आपला आग्रह सोडणार नाहीं, आणि म्हाताऱ्याशिवाय दुसरा कोणीही वरणार नाहीं, ही काळजी रात्रंदिवस माझ्या मनास लागली आहे! (सद्गदित होते.) आतां मरणाशिवाय मला दुसरें कांहीं प्रिय वाटत नाहीं! म्यां त्या देवीला कृपेनें हा जीव बळी दिला होता, परंतु (धैर्यशीलाकडे बोट करून.) या महाराजांनीं पुण्यकर्म म्हणून मला वांचविलें. दैवाची गति विलक्षण आहे! पूर्वजन्मीं केलेलें पाप पुरतेपणीं भोगण्याकरितां या जगांतील माझे दिवस लांबताहेत. आतां पुढें काय पाहावयाचें आहे कोण जाणे!" (पुनः रडूं लागते.)

धैर्यशील म्हणाला, "सगुणाबाई, तुम्ही रडूं नका. तुम्हास अनुपम सुख व्हावें याकरितां परमेश्वरानें त्या संकटापासून तुमची सुटका करण्याची बुद्धि मला दिली असें समजा. तुमचा सौम्य स्वभाव पाहून आणि तुमचें वर्तमान ऐकून आम्हांस अतिशय दुःख वाटतें. तुमच्यासारख्या साध्वि स्त्रियांचे असे विलाप ऐकून मनुष्यास काय, परंतु परमेश्वरासही करुणा आली आहे." सगुणाबाई म्हणते, "परमेश्वराकडे या गोष्टीचा काय शब्द आहे! मीं पूर्वजन्मीं महान् पापें केलीं असतील त्याचें फळ आतां भोगित्यें, यांत परमेश्वराचा काय अपराध आहे"! पुण्यशील म्हणाला, "बरें तें असो, परंतु तुम्ही त्या देवीपाशीं कशा गेलां हें स्पष्ट करून अद्यापि सांगितलें नाहीं, तें ऐकण्याची फार इच्छा आहे." सगुणाबाई म्हणाली, "माझ्या बापाचा असा निश्चय झाल्यापासून मी आपले बापाचे घरीं राहिलें होतें. तेथें विरक्तपणानें दिवस काढीत असतां, एके दिवशीं पुराण श्रवण करून एका आडगल्लींनें मी घराकडे येत होतें. त्या गल्लींत एक लहान झोंपडें होतें. त्याच्या दारास आंतून कडी असून बाहेर पुष्कळ कुणब्याच्या वगैरे बायका उभ्या राहून कानोसा घेत होत्या, व दुःखाचे उद्गार टाकून एकमेकींशीं बोलत होत्या. त्या काय करिता-

हेत व फटीवाटे झोंपड्यांत काय पाहताहेत हें जाणण्याची मला इच्छा होऊन मी त्यांजवळ गेलें, आणि काय आहे म्हणून विचारलें. परंतु कोणी कांहीं सांगेना; मग मीही त्या दारापाशीं जाऊन कानोसा घेतला. तों असें समजलें कीं, कोणी एक सुमारें पसतीस वर्षांची बायको अतिशय शोक करून रडते आहे. तिच्या शोकांतील कांहीं शब्द मला स्पष्ट ऐकूं आले. तेणेंकरून माझ्या हातून तिचें संकट निवारण होण्यासारखें आहे असें मला वाटलें. त्यामुळें अति आनंद वाटून, मला दार उघड, म्हणून म्यां तीस हांक मारली, परंतु ती उघडीना. शेवटीं सुमारें सात वाजण्याची वेळ झाली तेव्हां सर्व बाहेरील बायका आपल्या घरोघर गेल्या, असें पाहून तीस मीं पुनः हांक मारली. त्या वेळेस ती किंचित् हर्ष पावून दारापाशीं आली. नंतर दार उघडून तिणें मला आंत घेतलें आणि पुनः दार बंद केलें. ती मला कृत्रिम प्रेम दाखवूं लागली. तेव्हां मीं तीस ह्मटलें कीं, बाई, तुमच्या मनांतील गोष्ट मी बहुतेक समजल्यें आहें; आणि जीवावर उदार होऊन तुमचें संकट निवारण्यास आल्यें आहें. याकरितां आतां सत्य गोष्ट छपवूं नका. मीं असें बोलल्यावर ती किंचित् हांसून हलकेच म्हणाली: बाई, काय विचारतां, आमचे रामोशी लोकांचे कुळाचार फार कठिण आहेत. त्यामध्यें आमचे घराण्यांत एक कुळधर्म अतिभयंकर आहे. तो दर पिढीस एकदां करावा लागतो. आमची कुळदेवी त्या अमलपुरीच्या बागेखालीं आहे. तिचे तीन पिढ्यांचे कुळधर्म राहिले आहेत. त्या कुळधर्मास एक बायकोचा बळी द्यावा लागतो. माझे सासऱ्याला तो बळी मिळेना ह्मणून आज करूं उद्यां करूं असें करून तो मरून गेला. आतां तो माझे नवऱ्यास केला पाहिजे. माझा नवराही त्याकडे थोडा कानाडोळा करूं लागला असें पाहून ती देवी एकदां स्वप्नांत येऊन बोलली कीं, जर माझा कुळधर्म न कराल तर तुह्मास कधीं बरकत येणार नाहीं. आणि खरेंच मीं पाहात्यें, माझा नवरा पुष्कळ द्रव्य आणितो, पण तें कोणीकडे जातें कोण जाणें. बरकत बिलकुल येत नाहीं. याकरितां परवांचे दिवशीं माझे सासऱ्याच्या पिढीचा, आमच्या पिढीचा, आणि माझे मुलाचे पिढीचा, असे तिन्ही

कुळधर्म एकदांच करण्याचा माझे नवऱ्यानें बेत केला आहे. आह्मी रामोशांचे नाईक आहों. याकरितां माझा नवरा कोर्टें न्याय करण्यास गेला होता तेथें एक स्त्री अनायासानें मिळाली आहे. दुसरी स्त्री माझा नवरा कोठें तरी पाहून विकत अगर कोणत्याही प्रयत्नानें आणण्यास गेला आहे. आणि तिसरीबद्दल तो मलाच बळी देणार आहे. कारण, त्याला तिसरी बायको आहेत. त्या सर्वांत मी नावडती आहें, ह्मणून तो माझा अशा रीतीनें शेवट करणार आहे !

असें ती ह्मणून रडूं लागली. मग मीं तीस ह्मटलें, "बाई, तूं दुःख करूं नको. तुझ्या बदली मी बळी जाईन. मला नवरा ना पोर, ह्मणून तरी पुढें दुःखच भोगावयाचें आहे. तूं सुखानें आपल्या मुलांलेकरांत नांद." आह्मी इतकें बोलत आहों तोंच तिचा नवरा आला आणि या बळेस मजबरोबर चल ह्मणून बोलूं लागला. तेव्हां तिणें त्यास खुणावून घरांत नेलें, आणि सांगितलें कीं, माझ्या बदली ही बाई बळी जाण्यास सिद्ध आहे, हिला घेऊन जा. तें ऐकतांच त्यास आनंद वाटून तो मजकडे आला, आणि दुसरा एक मनुष्य मदतीस घेऊन त्यानें बळेंच माझ्या तोंडांत बोळा कोंबला. मी खुषीनें बळी जाण्यास सिद्ध आहे व रस्त्यानें ओरडणार नाहीं वगैरे त्याची पुष्कळ विनंति केली, परंतु व्यर्थ. त्यानें माझें सर्व गात्र बांधून टाकिलें आणि एका गाडींत घालून रातोरात चालून त्या अरण्यपुरीच्या देवीच्या देवळांत दुर्दशा करून टाकून ठेविलें.

याप्रमाणें सगुणाबाईचें भाषण ऐकून तिच्या परोपकाराविषयीं आणि धर्मबुद्धीविषयीं सर्वांची खात्री आली. नंतर ते तिघेजण इंग्रजींत बोलूं लागले:—

पुण्य०—मित्रहो ! पहा या स्त्रीचें औदार्य व निरपेक्षपणा ! यावरून हिच्या दुसऱ्या गुणांची परीक्षा होत नाहीं काय !

**मनो०**—मला वाटतें, इजसारख्या दुसऱ्या स्त्रिया जगांत थोड्याच आढळतील.

**धं०**—तर या स्त्रीचें जितकें बरें होईल तितकें आपण करून हीस अत्यंत सुखी केलें असतां किती पुण्य लागेल बरें !

**मनो०**—अगाध पुण्य लागेल यांत संशय नाहीं.

पुष्प०—बरें, ईस कोणत्या रीतीनें तुह्मी सुखी करणार ?

धैर्य०—मला वाटतें, मनोहरपंडितानें इच्याशीं विवाह करावा. ती त्याच्याच शाखेची आहे, व हा ओघ फार उत्तम आला आहे.

पु०—( हांसून. ) खचित सांगतों, मनोहरपंडिता, तूं इच्याशीं विवाह कर. ही तुला त्या धर्मभोळीपेक्षां शतपट सुख देईल.

धै०—तूं भिऊं नको, इचे आईबाप गरीब आहेत ह्मणून तूं इचा अव्हेर करूं नको.

मनो०—परंतु हें माझे बापास कधींही मान्य होणार नाहीं.

धैर्य०—अरे, तूं इच्याशीं विवाह केल्यावर तो काय करणार आहे ? पुष्पशीलासारख्यानें अथवा दुसऱ्या कोणी त्याची समजूत केल्यावर तो मान्य करील, व एकदां त्यानें मान्य केलें ह्मणजे सर्वांस मान्य होईल.

मनो०—( सगुणाबाईकडे उत्कंठेनें पाहून व किंचित् हांसून. ) परंतु ती कोठें तें कबूल करणार आहे ?

पुष्प०—अरे, तूं तर आधीं कबूल हो, मग तिच्याविषयीं उद्योग करूं. ( इतक्यांत दुसरीं मनुष्यें उठून गेलीं, तेव्हां सगुणाबाई एकटी राहिली, असें पाहून धैर्यशील तीस ह्मणतो. )

धैर्य०—सगुणाबाई, तुमच्या सद्गुणाची परीक्षा आह्मांस झाली आहे. आतां तुह्मासारख्या स्त्रिया दुःखांत पाहून आमचें हृदय कळवळतें, याकरितां तुमच्या सुखाचा मार्ग आह्मीं योजिला आहे तो तुह्मास निर्भीडपणानें सांगतों, याचा राग मानूं नका.

सगु०—राग कशाचा ? परंतु तुह्मी काय बोललां याचा भाव मला समजला नाहीं, ह्मणून असें ह्मटलें. असो. तुह्मीं कोणता मार्ग माझे सुखाचा काढिला आहे तो कळवा तर खरा.

धै०—तुमच्याकरितां आह्मी एक छानदार नवरा योजिला आहे त्यास तुह्मीं माळ घालावी.

सगु०—( हांसून. ) बरें, तुह्मीं कोणाशीं माझा विवाह लावण्याचा निश्चय केला आहे ?

पु०—( मनोहरपंडिताची पाठ थापटतो. ) यांच्याशीं. हे गृहस्थ फार हुशार व सद्गुणी आहेत. तुमच्याच जातीचे असून मोठे

कुलीन व शास्त्रवेत्ते आहेत. आमचे राज्यात न्याय सांगण्याचें काम यांचेकडे वंशपरंपरेनें चालत आलें आहे. यांची स्त्री मरण पावली हें वर्तमान यांचे तीर्थरूपांस अद्यापि समजलें नाहीं. नाहीं तर इतके दिवसांतच पुष्कळ नवऱ्यांचे बाप पदरीं हंड्यांच्या गांठोड्या बांधून आले असते. परंतु तुमचे सद्गुण यांचे मंदिरांत वास करण्यास योग्य आहेत असें समजून तुमचा अंगीकार आम्ही यांजकडून करवीत आहों.

मगु०—परंतु माझे बापास ही गोष्ट पसंत पडणार नाहीं. याला काय उपाय आहे! त्याचा सांठा पाहिजे.

धै०—तुम्ही सज्ञान आहां. तुम्हास आईबापांची परवानगी नको. इंग्लिश सरकारांनीं सन १८५६ सालच्या १५ वे आक्टांतही स्पष्ट लिहिलें आहे कीं, अज्ञान मुलीस विवाह करणें असेल तर तिणें मात्र आईबाप अथवा पालन करणारांची आज्ञा घेतली पाहिजे; परंतु वयांत आलेल्या स्त्रीस कोणाचेंही संमत नको.

मगु०—तें कांहीं असो; परंतु आईबापांच्या विचाराशिवाय माझ्यानें या गोष्टीस रुकार देववत नाहीं. माझ्या भावानें एक दोन वेळां उत्तम विद्वान गृहस्थास पाहून मला द्यावें म्हणून त्यानें माझ्या बाबाजवळ गोष्ट काढिली होती. त्या वेळेस तो माझ्या भावास रागें भरून म्हणाला कीं, अशी गोष्ट पुनः मजजवळ बोलूं नको. याकरितां मी फार भितें.

धै०—बरें. कांहीं काळजी करूं नका. तुम्हाकरितां मी पुष्कळ श्रम करून तुमच्या बापाची संमति मिळवीन. मग तर तुम्ही कबूल आहांना!

मगु०—( हांसून. ) अहाहा! हें काय विचारणें! चातकपक्षी मेघाचीच वाट पहात असतो!! परंतु तुम्ही मज कंगालाकरितां असल्या थोर व श्रीमान गृहस्थास माझा अंगीकार करण्याचे संकटांत पाडितां, व इतके श्रम घेण्यास सिद्ध होतां, याचें मला फार दुःख वाटतें.

पुरु०—आम्ही यांत कांहीं विशेष करीत नाहीं. हें आमचें कर्तव्यच आहे. आम्ही असल्या लोककल्याणाच्या गोष्टींकडे पुढारी होऊन लक्ष्य न पुरवूं तर त्या कशा घडतील बरें!

याप्रमाणें त्यांचीं भाषणें झाल्यावर सर्व स्थानास गेले. भोजनोत्तर

कांहीं वेळ वामकुक्ष झाल्यावर दरबार भरविला. त्या प्रसंगीं सर्व लोक जमल्यावर त्या तिघां विद्वानांनीं एक निबंध तयार केला होता तो मनोहरपंडिताकडून वाचविला. त्यामध्यें त्या राज्यांत किती अव्यवस्था आहे ही युक्तीनें दाखवून धैर्यशीलास कसा अन्यायानें शिक्षेचा हुकूम दिला होता हेंही लिहिलें होतें. मनोहरपंडिताचीही हकीकत त्यांत लिहून धैर्यशीलानें कशा प्रकारचा मुद्दा काढून खऱ्याचा निर्णय केला याचेंही त्यांत स्पष्टीकरण केलें होतें. याशिवाय त्या राज्यांतील वसूल घेण्याचे व न्याय करण्याचे प्रकार किती अविचाराचे आहेत हें दाखवून, पुढें कशी तजवीज करावी हेंही त्यांत आणलें होतें. अखेरीस कदंबा देवीची स्तुति त्या भोळे लोकांदेखत थोडी करून त्यांच्याकडून जे कांहीं अन्याय झाले त्यांबद्दल माफी मागितली होती.

अशा प्रकारचा निबंध ऐकून सर्वांस विलक्षण चमत्कार वाटला. ते धैर्यशीलास अतिशय ज्ञानी व विचारी मानूं लागले. त्या दिवसापासून चित्रपाल राजासही त्याच्या शहाणपणाविषयीं खातरी वाटून तो सर्व राज्यकारभार त्यावर सोंपविता झाला.

दरबार बरखास्त झाल्यावर धैर्यशील, पुष्पशीलास व मनोहरपंडितास एकांतीं ह्मणालाः "तुह्मी एकाएकीं देऊळ पाडण्याचा विचार केला हा बरोबर नव्हता. तुमचें दैव अनुकूळ; नाहीं तर त्याच वेळेस एकादा हरिभक्त येऊन तुमचा प्राण घ्यावयाचा. अशा प्रकारची सुधारणा थोडी तजविजीनें करावी लागते. बरें, आतां तरी मी सोंग वगैरे घेतल्याचें कोठेंही फुटूं देऊं नका. कारण, वृद्ध लोकांस तें कधींही खरें वाटणार नाहीं; व ते प्राण गेला तरी देवीचें बंड मोडण्याविषयींचे तुमचे यत्न शेवटास जाऊं देणार नाहींत.

नंतर धैर्यशीलानें तेथें कांहीं दिवस राहून त्या शहराची दुरुस्ती वगैरे बरीच करविली; आणि तेथें मुलींच्या व मुलांच्या शाळा स्थापन केल्या. दवाखाना व पुस्तकसंग्रह वगैरे सुरू करण्याची योजना करून आपण स्वतः सगुणाबाईस बरोबर घेऊन तिच्या बापाच्या गांवीं गेला. धैर्यशील ज्या दिवशीं तिच्या घरीं गेला त्या पूर्वी आठ रोज तिचा बाप कांहीं रोगानें मरण पावला होता.

हें वर्तमान ऐकून सगुणाबाईस अतिशय दुःख झालें. धैर्यशीलानें तिचें समाधान करून थोडे दिवस जाऊं दिले, आणि मग तिच्या भावास आपल्या येण्याचें कारण कळविलें. तो गृहस्थ समंजस असून सुशिक्षित होता. त्यास कलेक्टर ऑफिसांत रैटराची नोकरी होती. त्याजवळ धैर्यशीलानें सगुणाबाईची सर्व हकीकत सांगून तिच्या सद्गुणांची फार तारीफ केली. आपल्या बहिणीस महान् संकटांतून सोडवून एकद्या थोर गृहस्थानें इतके श्रम घेतले हें पाहून त्यानें धैर्यशीलाचे फार आभार मानले. नंतर इच्या गुणांचें सार्थक्य होण्यास एका उत्तम विद्वानाशीं [illegible] विचार न करितां इचा विवाह करावा, असें धैर्यशीलानें सुचविलें. त्याचे मनांतही तें कर्तव्य होतेंच, परंतु बापाच्या आग्रहामुळें त्याचें कांहीं चाललें नाहीं. धैर्यशीलानें वराची योजना कशी केली वगैरे सर्व त्यास सांगितलें. तें ऐकून त्यास अति आनंद होऊन त्यानें तत्काळ ती गोष्ट कबूल केली. त्यांना सर्वांस संतोष वाटून त्यांनीं लागलेच शास्त्री मिळवून तिथिनिश्चय करविला. याप्रमाणें सिद्धता झाल्यावर धैर्यशील विचित्रपुरांत आला, आणि मनोहरपाटणास, पुष्पशीलास, पद्मनयनेस व आपल्या इष्टमित्रांस बरोबर घेऊन ठरलेल्या तिथीच्या अगोदर दोन दिवस सगुणाबाईचे गांवीं दाखल झाला. लग्नाचे दिवशीं पुष्कळ विद्वान मंडळी जमवून त्या उभयतांचें लग्न मोठ्या समारंभानें लाविलें.

# भाग ७.

उद्योग नीति द्वय या भवांत ॥
करी सुखी मानवही वनांत ॥
किती जरी दुःसह दुःख पाही ॥
अंतीं जगाचा प्रभु त्यास पाही ॥

## स्त्रीशौर्य.

उष्णकाळांतील चांदण्यारात्रीं फार आनंद वाटत असतो. दिवसास सूर्याच्या प्रखर किरणांनीं सर्व शरीर तप्त होऊन गेलें असतें, तें सायंकाळीं चंद्राच्या शीतळ चांदण्यानें शांत होतें. आकाश निरभ्र असल्यामुळें नक्षत्रांचा चमत्कारिक देखावा दिसून चंद्रप्रभेनें त्यास विलक्षण शोभा आली असते. बागेंतील पुष्पें विकसित होऊन त्यांवरून मंद सुगंध वायु अति आनंददायक वाहत असतो. उन्हाच्या तडाख्यांत प्रवास करण्यास फार क्लेश होतात, याकरितां तसल्या दिवसांत मुशाफरलोक रात्रीं मार्गक्रमण करितात. सर्व लोकही आपआपलीं करवतील तितकीं कामें चांदण्यांत करितात, व कोणी आपले स्नेह्यांसमवेत गच्चीवर बसून करमणूक करितात, व कोणी कुटुंबांतील सर्व मनुष्यांसह चांदण्यांत आनंदाच्या गोष्टी बोलत बसतात. त्या वेळेस गच्चीवर बसलें असतां, शहरांत कोणी वाद्यें वाजवीत असतात, कोणी सुस्वर गळ्यांवर गात असतात, त्यांचे आवाज हलके ऐकूं येऊन कर्णास फार गोड लागतात. कधीं कधीं रस्त्यांतून लोकांच्या लग्नकार्यांतील वराती वगैरे निघतात तेव्हां हवया, नळ, इत्यादि दारू सुटून अतिरमणीय शोभा दिसते. गांवांत वसंतपूजेचा क्रम चाललेला असतो यामुळें ब्राह्मणांचे वेदघोष चमत्कारिक ऐकूं येतात.

याप्रमाणें अति आनंदाचे वेळेस सगुणाबाईच्या शहरांत पद्मनयनेसह पुष्पशील वगैरे मंडळी एका वाड्याच्या गच्चीवर चांदण्यांत हवा घेत व आनंदाच्या गोष्टी बोलत बसली असतां आपला सवथा

मित्र श्यामसुंदर पद्मनयनांचा शोध करण्यास गेला आहे तो कोठें असेल व काय करीत असेल इत्यादि बोलतात तों एकाएकीं मोठा गलबला झालेला ऐकूं आला. त्या वेळेस सर्व कान देऊन ऐकूं लागले. तेव्हां, " अरे, तीस बाहेर काढ तीस, " " नकाहो महाराज, क्षणभर मला येथें तुम्ही राहूंद्या. मी तुमच्या पायां पडतें. " " अरे इला बाहेर काढून देतोस का सरकारचा शिपाई आणूं! " अशी भाषणें ऐकूं आलीं. तेव्हां सर्वही चकित होऊन काय झालें आहे तें पाहण्याकरितां ते गेले आहेत; आणि पाहतात तों एक अति रूपवती सुमारें तेरा चवदा वर्षांची मुलगी अगदीं कंपायमान झाली आहे, नेत्रांतून अश्रुपात चालून मूर्च्छित झाली आहे; ती, थोडा वेळ या वाड्यांत मला तुम्ही राहूंद्या. असें विनंति करीत असतां बाहेरून एक मनुष्य तिला बाहेर काढून द्या म्हणून ओरडत आहे; त्यामुळें चाकरलोक तीस बाहेर काढण्याचा यत्न करीत आहेत. असें दिसलें. तें पाहून धैर्यशील त्या स्त्रीजवळ जाऊन तीस म्हणाला, " मुली, तुजवर कोणतें संकट पडलें आहे. व तूं घाबरलीस कां? तें सांग. " ती म्हणाली, " महाराज! मला हाक मारतो हा चोर आहे. मला धरून माझा सर्वस्वी नाश करण्याचा याचा इरादा आहे. याकरितां मज अनाथावर दया करून मला यांतून तारा, येथें राहूं द्याल तर तुमचे उपकार मी जन्मवर विसरणार नाहीं. " असें तिचें मधुर व गरीबीचें भाषण ऐकून सर्वांस तिची दया आली. नंतर धैर्यशील दरवाजा उघडून बाहेरील मनुष्यास दरडावून विचारतो. " तूं कोण आहेस रे? " " महाराज, माझी बायको तुमचे वाड्यांत गेली आहे तीस मी हांक मारतों. " " तुझी, तुझी बायको काय? ( चाकरास हांक मारतो. ) सोमाजी याला पकड आणि फौजदाराकडे पोंचवून दे, म्हणजे जेलखान्यांत याची बायको कशी आहे ती दिसेल. " असे धैर्यशीलाचे शब्द ऐकतांच तो चोर एक एक पाऊल मागें टाकूं लागला. शेवटीं तोंड फिरवायाचे वेळेस, बरें बरें, माझ्या बायकोचा अभिलाष करण्याचा प्रयत्न तुम्ही चालविला आहे, परंतु कांहीं चिंता नाहीं, आतां सरकारचा शिपाई आणून तुमची खातरी करितों, " असें म्हणून चालता झाला. तो पुनः दिसला नाहीं.

नंतर ते सर्व त्या नवऱ्या स्त्रीस घेऊन पुनः माडीवर गेले, आणि त्यांनीं तीस विचारलें: "बाई, हा चोर तुमच्या मागें कां लागला?व तुमचें मूळचें गांव कोणचें! वगैरे सर्व आम्हांस सांगा." ती म्हणाली, "माझ्या बापाचें गांव कांचनपूर, तेथें माझें लग्न झाल्यास सुमारें दीड महिना झाला असेल. माझ्या सासऱ्याचे गांवाचें नांव फार अवघड आहे, तें आतां मला आठवत नाहीं. माझा भ्रतार आमचे गांवांत कांहीं कामाकरितां आला होता, त्या वेळेस त्याचे गुण व स्वभाव सर्वांस फार प्रिय वाटून माझे बापानें तेथेंच त्याच्याशीं माझें लग्न लाविलें. नंतर आम्हीं उभयतां स्त्रीपुरुषें एका भाड्याचे टांग्यांत बसून निघालों तों आज या गांवापासून सुमारें सहा कोसांवर आलों; इतक्यांत नागव्या तरवारी हातांत घेतलेले असे चार पांच चोर एकाएकीं एका नाल्यांतून बाहेर निघून आमच्या गाडीआड आले. त्यांनीं प्रथम गाडीवानास एक वार केला. त्या भयानें तो जीव घेऊन पळाला. मग काय विचारतां? ते आमच्याकडे आले; त्यांनीं माझे भ्रतारास गाडींतून बाहेर ओढून काढलें आणि त्याचे अंगावरील सर्व अलंकार व वस्त्रें काढून घेऊन त्यास लांब नेऊन एका झाडाशीं बांधून टाकिलें. (रडूं लागते.) आणि दोघे आंत येऊन बसले व कांहीं गाडीच्या मागें पुढें चालून त्यांनीं घोडे पिटाळून मला या गांवांत आणिलें. येथें गांवाबाहेर एका चावडींत उतरल्यावर मला दिशेस जावयाचें आहे म्हणून मीं त्यांस सांगितलें. त्यांनीं मजबरोबर जावयास एक मनुष्य देऊन मला परवानगी दिली. गांवांतून एक लवण आलें होतें. त्या वाटेनें मी तेथपर्यंत आलें, आणि बरोबर आलेल्या मनुष्यास सांगितलें कीं, स्त्रीजातीस फार शरम वाटते याकरितां तूं जरा दूर बैस. आतां मी पळून जाऊं शकणार नाहीं. असें बोलल्यावर तो तेथेंच बसला, आणि मी त्या नाल्यांत गेलें. तेथें गेल्यावर माझे मनांत आलें कीं, प्रयत्न केल्यावर परमेश्वर सहाय्य होतो; याकरितां त्या दुष्टांच्या हातांतून सुटण्यासाठीं मीं ओणव्यानें त्या लवणांतूनच गांवाकडे येण्यास आरंभ केला. अशा रीतीनें एका रस्त्याच्या समोर येतांच मी नाल्यांतून बाहेर पडलें आणि गांवांत पळूं लागलें. इतक्यांत तो दुष्ट मला पाहून लांडग्यासारखा माझे मागें लागला. मी पळतां पळतां थकलें आ-

**पठाण**.—ए बात तो कभी होनेकी नहीं.

अशी दोघांची बोलाचाली होऊन ते निकरावर आले, व अखेरीस असें ठरलें कीं, पलीकडच्या वाळवंटावर जाऊन दोघांनीं प्रथम द्वंद्व युद्ध खेळावें, त्यांत जो जिंकेल त्यानें शिकारीस जावें. याप्रमाणें करार होऊन वाळवंटावर गेल्यावर पहिल्यानें पठाण पट्टा खेळावयास लागला. त्याचें चांचल्य व हस्तकौशल्य पाहून धैर्यशीलास फार आनंद वाटला. त्यानें त्यास शाबासकी देऊन नंतर आपण खेळूं लागला. धैर्यशीलाचें कौशल्य पाहून पठाणासही फार आनंद झाला. नंतर ते छडीपट्टा खेळले, व सर्व प्रकारच्या कसरती एकमेकांनीं एकमेकांस दाखविल्या. अखेरीस दंड टाकून कुस्ती खेळूं लागले. पठाणाचा बांधा धैर्यशीलापेक्षां लहान होता व तो वयानेंही लहान होता, तथापि तो घाबरला नाहीं. त्यास पेंचांची फार चांगली माहिती होती, यामुळें एक वेळ त्यानें धैर्यशीलास चीत करण्याचा रंग आणिला. धैर्यशीलानेंही पुष्कळ जोर केला, परंतु पठाण आटपेना. तेव्हां तो मनांत समजला कीं, मी मोठा पराक्रमी असें समजत होतों, परंतु हा लहान असून किती बळकट आहे! शेवटीं धैर्यशीलानें सर्व बळ एके ठिकाणीं करून मोठ्या प्रयासानें पठाणास चीत केलें, तितक्यांत पठाणानें उलटून तत्क्षणीं धैर्यशीलास उलथून पाडिलें.

याप्रमाणें बरोबरी झाल्यावर असें ठरलें कीं, ती शिकार दोघांनीं मिळून मारावी, आणि सारखी वांटून घ्यावी. नंतर त्या ठिकाणीं अंमळ विसावा घेण्याकरितां ते बोलत बसले. पठाण धैर्यशीलास ह्मणालाः "महाराज, तुमारी जात कौन और रहनेका गांव कौन वगैरा बंदेकू मालूम करो." असें विचारल्यावर धैर्यशीलानें मी अमुक राजाच्या प्रधानाचा मुलगा आहें, व राहण्याचें गांव वगैर सर्व सांगून तेथें तेवढ्या रात्रीं येण्याचें कारण सुद्धां सांगितलें. तें ऐकून पठाणानें अतिशय आनंद झाल्यासारखें दाखविलें. इतक्यांत धैर्यशीलानेंही आपलें नांवगांव सांगा म्हणून प्रश्न केला, परंतु पठाण त्या प्रश्नाचा जबाब न देतां 'चलो शेर निकल जायगा' असें म्हणून धांदल करून उठला. तें पाहून धैर्यशीलही उभा राहिला. नंतर तेथून जवळच त्या पठाणाचा तंबू होता तेथें श्यामसुंदर वगैरे ह्यांस

तेथून ते उभयतां घोड्यांवर बसून मोठ्या उल्हासानें वाघाच्या जाळी-कडे जाऊं लागले.

त्या वेळेस सुमारें दोनप्रहर रात्रीचा अंमल झाला होता. पूर्णचंद्रबिंब डोक्यावर आल्यामुळें प्रकाशाचा लखलखाट झाला होता. चोहोंकडे हिरवी गार झाडी लागली होती. त्या ठिकाणीं मुळींच मनुष्याचा असंचार. त्यांत मध्यरात्र झाल्यामुळें तें अरण्य अतिभयंकर व शून्य-वत् दिसूं लागलें. केव्हां केव्हां हिंस्र पशूंचे शब्द मात्र ऐकूं येत. अशा त्या रानांत तो पठाण व धैर्यशील केवळ चंद्रसूर्यांत शोभूं ला-गले. ते परस्पर एकमेकांच्या स्वरूपाकडे पाहून अगदीं भुलून गेलेसे दिसले. त्यांतही पठाणाच्या पोटांत तर धैर्यशीलास पाहून आनंदाच्या उकळ्या फुटूं लागल्या. परंतु कांहीं एक न बोलतां ते एकमेकांच्या स्वरूपाचें मनांत आश्चर्य करीत चालले.

वाघाच्या जाळीजवळ जातांच पठाणानें प्रथम त्यावर बंदूक मारली. तिचा आवाज होतांच वाघ संतापून मोठ्यानें ओरडत व शेपटी आपटीत बाहेर आला. इतक्यांत पठाणानें जलदी करून दुसरी गोळी मारली, परंतु त्याच क्षणीं वाघ एका बाजूस वळल्यामुळें ती गोळी चुकली. मग काय विचारावयाचें आहे! त्याच क्रोधानें अति संतप्त होत्साता एक-दम उडी मारून पठाणाचे अंगावर धांवून आला. त्या वेळेस पठाण धांदलल्यासारखा झाला. गोळी भरण्यास अवकाश राहिला नाहीं, भाला मारावा तर तो भाल्याचे टप्प्यांत नव्हता. तरवारीचा तर कांहीं इलाजच नाहीं. अशी स्थिति होऊन गेली. धैर्यशील त्या-च्या मागून जाऊन त्यास भाला टोंचणार इतक्यांत वाघ उडी मारून पठाणाचे घोड्याच्या मानेवर जाऊन बसला. तेसमयीं पठाण ए-कादें हत्यार काढून त्यास मारणार तोंच धैर्यशीलानें आपल्या बाजूस होऊन गोळी मारली. आणि तत्काळ वाघास जमीनीवर पाडलें. हें सर्व कृत्य एका निमिषमात्रांत झालें. नंतर त्यांनीं आणखीही कांहीं जनावरें मारलीं आणि तीं सर्व घेऊन ते पुनः तंबूपाशीं आले.

तंबूंत गेल्यावर पठाणानें श्यामसुंदर, मनोहरपंडित यांजवळ धैर्य-शीलाचा उपकार व पराक्रम यांचें फार वर्णन केलें. नंतर कांहीं किरकोळ गोष्टी झाल्यावर धैर्यशीलानें आपलें नांवगांव सांग,

ह्मणून पुनः त्यास प्रश्न केला. तो ऐकतांच पठाण मोठ्या प्रेमानें हंसून उठला, आणि सांगतों ह्मणून कनातीच्या आड गेला. तेथें त्यानें तो पठाणी पोषाख टाकून मूळचें आपलें स्त्रीरूप धारण केलें. तिनें संपूर्ण अलंकार अंगावर घालून व मोठी शालू नेसून ती गज-गतीनें ठुमकत येऊन धैर्यशीलापुढें हात जोडून उभी राहिली. त्या वेळेस विस्मित होत्साते ते सर्व तिच्या तोंडाकडे पाहूं लागले. तिच्या मुखाच्या ठेवणीवरून पुष्कळ वेळानें मग लक्ष्यांत आलें कीं, इणेंच पठाणी पोषाख घेतला होता. त्या वेळेस ही स्त्री असून इतकी धैर्य-वान् व बळकट आहे असें धैर्यशीलास वाटून त्यास अतिशय आ-श्चर्य वाटलें. त्यानें तिची फार स्तुति केली, आणि तुझें नांव आतां तरी सांग ह्मणून विचारलें. तेव्हां ती ह्मणाली. "माझें नांव वी-रावती. मी रत्नपूर शहरांतील राजाचे प्रधानाची मुलगी. माझे पित्यास मुलगा नव्हता व माझा लहानपणींच धीट स्वभाव पाहून त्यानें मला मुलाप्रमाणें लिहिणेंवाचणें शिकवून क्षत्रियोपयोगी पौरुष-गुण शिकविले. मी वयांत आल्यावर माझे बापानें पुष्कळ वेळ माझा विवाह करण्याचा उद्योग केला; परंतु मी त्यास सांगितलें कीं, माझे खातरीस एखादा पुरुष उतरल्याशिवाय मी लग्न करणार नाहीं. त्यानें ती गोष्ट मान्य केली; परंतु माझे मनाजोगता पुरुष मिळेना. बहुधा श्रीमंत लोकांची मुलें हावरीं ह्मणजे अशक्त व दुर्गुणी अस-तात, याकरितां तसल्याबरोबर विवाह करून सर्व जन्म दुःखांत घा-लवावा त्यापेक्षां मुळींच लग्न करूं नये असा शेवटीं मी निश्चय केला. मी पठाणी पोषाख करून शिकार करण्यांत मग आपला सर्व वेळ घालवूं लागलें. असें करण्याचे दोन हेतु होते: एक तर असल्या प्रकारच्या करमणुकीत सर्व वेळ जावा, व दुसरा कोणी वीर भेटल्यास त्याची चौकशी करावी. याप्रमाणें माझा क्रम पुष्कळ दिवस चा-लला, परंतु आज आपल्या शौर्याची खातरी होऊन हा जीव या चरणांबुजीं लीन झाला आहे. आपल्या स्वरूपाची या मनास ओळ-ख झाली आहे, याकरितां आतां व्यवहारिक व्यापार बिलकुल सुचणार नाहींत."

असें तिचें भाषण धैर्यशीलास अत्यंत आनंदकारक वाटलें. त्याचे

याप्रमाणें ठराव झाल्यावर त्यांनीं **वीरावती**जवळून एक मनुष्य बरोबर घेतला, आणि तीस विचारून मोठ्या आनंदानें ते चालले. ते अगदीं दिसेनातसे दूर जात तोंपर्यंत **वीरावती** त्यांकडे पाहत होती. नंतर ती **धैर्यशीला**च्या गुणांचे आश्चर्य करीत बिछान्यावर स्वस्थ पडली. **धैर्यशील** वगैरे सर्व मंडळी पहांटच्या वेळेस तीन वाजण्याच्या सुमारास **पुष्पशील** होता तेथें जाऊन पोंचली. ते उभयतां यांची वाट पहातच बसले होते. त्यांस पाहतांबरोबर **पुष्पशीलास** जो आनंद झाला तो सांगतां येत नाहीं. त्यांनीं परस्परांस प्रेमालिंगनें देऊन आनंदाश्रु गाळले. **विचित्रपुरांत** ते पहिल्या दिवशीं आले होते. त्यावर त्या चौघांची एके ठिकाणीं ही गांठ सहा महिन्यांनीं पडली. **धैर्यशील श्यामसुंदरास** आणण्याकरितां निघाल्यानंतर मागें **पुष्पशीलानें जयंतास** धरून आणणाऱ्या चोरांस पोलिसाकडून पकडलें होतें, व **श्यामसुंदरा**ची गाडी व दुसरा मुद्देमाल सर्व धरिला होता. पुढें **श्यामसुंदर** आल्यानंतर तेथील म्याजिस्ट्रेटासमोर तो खटला चालवून त्यांस यथास्थित शिक्षा देवविल्या.



इतकेंच होतें कीं, त्या शाळेंतील पहिले वर्गांतील पहिली मुलगी फारच हुशार होती. तीस कोणताही प्रश्न घालण्याचा उशीर कीं तत्काळ ती त्याचा जबाब देई. याप्रमाणें तिची विद्या व तैलबुद्धि पाहून मला अतिशय आश्चर्य वाटलें. ती लिहिणार उत्कृष्ठ, कशिदा काढणार उत्तम, पायमोजे व टोप्या वगैरे विणणार मोळा आणे, असे तिचे गुण पाहून मनास फार आनंद झाला.

शाळा सुटल्यावर स्कूलमास्तरानें मला एक खाणावळ दाखवून दिली, व भररस्त्यावर एक खोली भाड्यानें देवविली. त्या खोलीच्या अगदीं समोर एक माझ्या जातीच्या सोनाराचें दुकान होतें. तेथें नेहमीं रात्रंदिवस ठोकाठोक चालत असे. तें आमचें मूळचें कर्म. परंतु मला कधीं तें ठाऊक नाहीं; याकरितां कर्म काय करितात तें पाहावें व करमणूकही व्हावी म्हणून मी दुकानांत घटका दोन घटका दिवसांतून बसावयास जाऊं लागलों. तेव्हां माझे मनांत आलें कीं, या लोकांस सोनें किंवा चांदी आटण्यास फार श्रम लागतात, व फुंकतां फुंकतां हे अगदीं थकून जातात, याकरितां यांस फुंकण्याकरितां एखादें सोपेंसें यंत्र करून द्यावें. सोनें किंवा चांदी आटण्याचे वेळेस वारा मोठ्या जोराचा नको, परंतु बारीक, एकसारखा व न थांबणारा असा पाहिजे; याकरितां हें काम वाफेकडून करवावें असें मला वाटलें. नंतर मी एक नवीन भांडें तयार करविलें. तें असें कीं, त्याचें बूड मोठें करून तोंड लहान केलें. तोंडावर घट्ट बसे असें एक मळसूत्री झांकण करवून एका बाजूस एक तोटी केली व तीवरही पक्का मळसूत्री बूच बसविला.

याप्रमाणें भांडें तयार झाल्यावर, त्यांस सांगितलें कीं, यांत प्रथम थोडें पाणी घालून तें तापवावें म्हणजे त्याची वाफ होईल. ती वाफ त्या भांड्यांत दाटली म्हणजे सोनें अगर चांदी मुशींत घालून त्या मुशीच्या समोर या भांड्याची तोटी लावून ठेवावी, आणि तोटीचा बूच काढावा. म्हणजे भांड्यांतील वाफ तोटींवाटे जोरानें येऊन ती विस्तव प्रज्वलित करून धातु जलदी आटवील. असें सांगितल्यावर त्यांणीं त्याप्रमाणें कृति केली. अगोदरच ती वाफ अतिशय उष्ण; तितक्यांत तिचा जोराचा फुंपाटा त्या

मुशीवर बसे त्यामुळें व बाहेरील उष्णताही प्रखर असल्यामुळें धातु फार सत्वर आटूं लागल्या. पूर्वीं पांच तोळे आटण्यास त्यांस जितके कोळसे व वेळ लागत असे, त्याचे निम्मे कोळशांत व एक चतुर्थांश वेळांत पन्नास तोळे चांदी आटूं लागली. तें इतका फायदा करणारें होईल असें वाटलें नव्हतें म्हणून मलाही फार आश्चर्य झालें. त्या सोनारमंडळीस तर तें पाहून अतिशय आनंद झाला. त्यांनीं माझी पुष्कळ स्तुति केली, व त्या दिवसापासून त्यांची मजवर फार प्रीति जडून स्नेह वाढत चालला.

त्या दुकानांत एक वृद्ध सोनार असून त्याचे पांच मोठमोठे मुलगे एकत्र काम करीत असत. ते मुलगे सरकारी मराठी शाळेंत शिकून हुशार झाले होते, व ते आपले सोनारधंद्यांतही फार कुशळ होते. ते रात्रंदिवस झटून काम करीत, यामुळें त्यांच्याकडे पुष्कळ गिऱ्हाइकें येऊन त्यांचा चरितार्थ चांगला चालत असे. ते पूर्वींपासून श्रीमंत होते. तशांत हे पांच जण पैसा कमावूं लागल्यामुळें त्यांची गांवांत चांगली प्रतिष्ठा वाढून साधारण वडलोकांत त्यांची गणना होती. त्या तरुण सोनारांनीं तें यंत्र लागलेंच आपले दुकानांत सुरू केलें; परंतु त्या वृद्ध सोनारास त्यामुळें फार राग आला. तो ह्मणाला: " अरे तुम्हीं हें काय मांडलें आहे? अग्नीस आणि वरुणास ताप देऊन हें अघोर कृत्य कसचें आरंभिलें आहे? आपणांस वेळूच्या फुंकणीनें देखील विस्तव फुंकण्याचा अधिकार नाहीं, असें असून जर हीं यंत्रें आणि तंत्रें आपण चालू केलीं तर सर्व लोक आपणांस जातीबाहेर टाकतील. दुसरें तुम्ही असें पहा कीं, आपले वडील काय मूर्ख होते? त्यांस असले प्रकार करितां येत नव्हते? परंतु बाबांनो, जी चाल पूर्वापर चालत आली आहे तीप्रमाणें आपण वागावें त्यांतच आपलें कल्याण आहे. आपला हेका मिरवून वडिलांच्या चाली मोडूं नयेत." हें त्याचें बोलणें ऐकून घेऊन त्यां जबाब दिला कीं, तुम्ही जेव्हां स्वयंपाक करितां त्या वेळेस जशी उष्णतेनें पाण्याची वाफ होऊन ती तुमचे पदार्थ शिजविते, तसाच प्रकार येथें आहे; असें असून तुम्ही पाकनिष्पत्तीचे वेळेस अग्नीस आणि वरुणास ताप होतो असें म्हणत नाहीं आणि येथें कां दोष लावितां? इतक्यांत सर्वांत थोरला मुलगा

म्हणाला, " बाबा, अहो लांब कशाला, तुम्हीं फुंकून जेव्हां धातु आटितां तेव्हां अग्नीस त्रास होतो कीं नाहीं ? "

असें आमचें भाषण ऐकतांच म्हातारा असा कडकडला कीं, सांगायची सोय नाहीं. तो मोठ्या क्रोधानें बोलला, "मूर्खांनो, तुमच्या ओंठावरचा अजून जार वाळला नाहीं, आणि मला म्हाताऱ्याला शहाणपणा शिकवितां ? तुह्मास लाज वाटत नाहीं ? माझ्यापुढें तें यंत्र कापर्यंत आणिलें तर मी डोकें फोडीन ! " असा तो ओरडल्यावर कोणाच्यानें त्यास जबाब देववेना. पुढें ते मुलगे त्या बापाच्या भयानें तो बाहेर गेला ह्मणजे अगर रात्रीं आटण्याचें काम करूं लागले. परंतु तें जेव्हां त्या म्हाताऱ्यास समजलें तेव्हां त्यानें पुष्कळ हातपाय आपटून दुकान वर्ज केलें, आणि हे आपलें ऐकणार नाहींत असें समजून तो सर्व धंदे सोडून स्वस्थ हरिहरि ह्मणत घरीं बसला. असें त्याचें आचरण पाहून त्याच्या मुलांस फार आनंद झाला. त्यांनीं थोडक्याच काळांत त्या यंत्राच्या सहाय्यानें पुष्कळ द्रव्य कमाविलें. हें पाहून कित्येक त्यांच्या तरुण शेजाऱ्यांनींही त्यांचा कित्ता घेऊन आपापले दुकानांतूनही तें यंत्र चालू केलें. परंतु जे कांहीं वृद्ध होते त्यांनीं ह्यांस दोष देऊन, जरी नुकसान होऊं लागलें तरी तें सोसून आपली वडिलोपार्जित लोखंडाचे फुंकणीनें विस्तव फुंकण्याची चाल मोडिली नाहीं.

नंतर एके दिवशीं मी त्या दुकानांत बसलों असतां समोर रस्त्यांत गारोड्याचा खेळ झाला. त्या वेळेस तेथें जमलेल्या लोकांस तो गारोडी कसकसें फसवितो तें मी तत्काळ सांगत गेलों. परंतु त्या लोकांस तें खरें वाटेना. ते मला ह्मणत कीं, तुह्मी कांहीं तरी सांगतां. ही बंगाली विद्या आहे, त्याशिवाय असें व्हावयाचेंच नाहीं. तेव्हां मीं त्यांस म्हटलें कीं, ही सर्व तुह्मांस भ्रांति आहे. मी कधींही खोटें बोलत नाहीं ! ते ह्मणाले, " जर असें आहे तर आह्मांस तुह्मी प्रत्यक्ष खेळ करून दाखवा आणि त्याचें निराकरण करा म्हणजे तुमचें म्हणणें आम्हांस खरें वाटेल. "

असें ते बोलल्यावर म्यां विचार केला कीं, जरी या कामांत आपला एक दिवस मोडला तरी चिंता नाहीं; परंतु गारोड्याचा खेळ आपण स्वतः त्यांस एक दिवस करून दाखवावा, ह्मणजे या शह-

रांतील पुष्कळ लोकांचें अज्ञान मोडून त्यांस खऱ्या गोष्टी समजतील. नंतर मीं तें कबूल करून त्या सर्वांस सांगितलें कीं, आजपासून आठ दिवसांनीं म्हणजे पुढचे आदित्यवारीं मी तुम्हांस उत्तम प्रकारचा गारोड्याचा तमाशा करून दाखवीन, याकरितां तो पाहण्यासाठीं तुह्मी आपले इष्टमित्रांस पाचारण करून ठेवा. याप्रमाणें बोलून एका वर्तमानपत्रांतही याबद्दल जाहिरात दिली.

आठ दिवसांची फुरसत घेतली होती त्या वेळांत म्यां सर्व सरंजाम व त्या ठकविद्येस लागणारीं रसायनें वगैरे सर्व पैदा केलीं. हा खेळ त्या सोनाराच्या घराच्या मागील चौकांत करण्याचें ठरलें होतें. खेळाचे दिवशीं पुष्कळ लोक मोठ्या उत्सुकतेनें अगदीं ठांसून त्या चौकांत बसले. सोनाराचे मुलगे व त्यांचे स्नेही अग्रभागीं बसले होते, व त्यांच्या स्त्रिया माडीवर बसल्या होत्या, त्यांमध्यें मी पहिले दिवशीं मुलींचे शाळेंत पाहिलेली मुलगी होती. तिची त्या गारोड्याच्या कपटविद्येचें निराकरण जाणण्याविषयीं फारच उत्कंठा दिसली.

याप्रमाणें मंडळी जमल्यावर म्यां चौकाच्या मध्यभागीं एक खुर्ची मांडून तीपुढें एक टेबल ठेविलें. त्या टेबलाच्या कपाटांत सर्व फसविण्याचें सामान ठेविलें होतें. त्या सर्व लोकांचा भाव मजवर बसावा व त्यांनीं शंका कमी काढाव्या याकरितां म्यां गमतीनें डोळ्यांभोंवतीं शेंदराचे पट्टे मारले, व हातांत लोखंडी कडें घातलें. टेबलाच्या दोहों बाजूंस दोन वेताच्या छड्या मांडल्या व चार लिंबें कापून त्यांजवर शेंदूर टाकून तीं चार कोपऱ्यांस ठेविलीं. टेबलाच्या मध्यभागीं थोडेसे उडीद आंथरून त्यावर शेंदराचा मारुती काढिला. व अशाच प्रकारचे पुष्कळ ढोंग व भयप्रदर्शन करण्याचे प्रकार करून नंतर खेळास आरंभ केला. त्या सर्वांस वाटलें कीं, मी मोठा जादूगार आहें. आणि बंगाली विद्येंत अगदीं निपुण आहें. त्या वेळेस ते सोनाराचे मुलगे म्हणावयास लागले कीं, तुह्मी ती विद्या जाणत आहां राव; आणि आम्हांस सांगतां कीं, तें सर्व खोटें आहे. मीं त्यांस खुणेनें सांगितलें कीं, एव्हांशीं एक अक्षरही बोलूं नका, मुकाट्यानें काय होतें तें पाहा. असें बोलल्यावर ते मुकाट्यानें पाहूं लागले.

मीं पहिल्यानें टेबलांतून एक चाकू काढिला. त्यास अगोदरच,

ज्या कापशीस आबाशाई रंगाचें फूल येत असतें तिच्या फुलाचा रस लावून ठेविला होता. नंतर त्या चाकूनें लिंबू कापतांच त्या रसाचा व लिंबाचे रसाचा मिलाफ होऊन त्यांतून भडभडां रक्ताप्रमाणें लाल रस पडूं लागला, व तें लिंबू दुभागल्यावर त्या दोन फांका अगदीं लाल दिसूं लागल्या. तें पाहून म्यां बकऱ्याचें रक्त मंत्रसामर्थ्यैंकरून उत्पन्न केलें असें त्यांस वाटलें. नंतर कागदाच्या द्रोणांत पुऱ्या तळल्या. मोठमोठ्या दोन घागरी आणून एवढ्या भरून धान्य काढतों असें सांगितलें, आणि अंगवस्त्राचा पदर डोक्यावरून घेऊन त्या घागरींच्या तोंडांवर खोबऱ्याच्या वाट्या बसवून म्यां टेबलामध्यें जें पावशेर धान्य आणून ठेविलें होतें त्यानें त्या शिगेपर्यंत भरल्या आणि बाहेर काढून दाखविल्या. दगडावर नारळ किंचित् उचलून धरून बुक्कीनें फोडून दाखविला. चुन्याच्या भट्टींत कांहीं दिवस ठेवलेले जोंधळे काढले आणि ते एका धोत्रांत वालून त्यांस पाण्याच्या हातानें हालवून त्यांच्या लाह्या करून दाखविल्या. वायूच्या दाबानें पात्रांतील पाणी गुप्त केलें व तें पुनः उत्पन्न केलें. एका पिशवीच्या आंतून दुसरी उलटी पिशवी शिवून तयार केली होती, तींत प्रथम सोईच्या द्वारें एक कोंबडीचें अंडें घातलें आणि तें आंतील पडपिशवींत घालून पिशवी उलटी करून अंडें गुप्त झाल्याचा भास केला, आणि मग गारोड्याप्रमाणें एका मुलाचे अंगास ती पिशवी लावून त्याच्या शरीरांतून तें गुप्त झालेलें अंडें येणार असें सांगून पिशवी उलटी धरून हालविली. तेव्हां तें अंडें पडपिशवींतून पुनः बाहेर निघून पिशवी ओततांच खालीं पडलें. याप्रमाणें झाल्यावर मग हातचलाखीचे खेळास आरंभ केला. प्रथम तळहातांत एक रुपया घेऊन हात उलटा करून मजजवळ कांहीं नाहीं असें सांगितलें, आणि नंतर गारोड्याजवळ जसें ढोंग दाखविणारें हाडूक असतें तशा मासल्याचें म्यां एक लांकूड तयार केलें होतें तें हातांत घेतलें. त्याचें कारण असें कीं, त्याच्या योगानें माझे हातांतील पदार्थ कोणास दिसूं नयेत. मग नांवाला मात्र थोडी माती डावे हातावर घेतली आणि फुंक मारण्याकरितां हातावर ठेवून तोंडापाशीं दोन्ही हात नेले. तेव्हां उजव्या हातांतील रुपया डावे हातांत पडला, आणि डावा हात

मिटून चलचलचल, ह्मणून रुपया काढिला. पुनः गुप्त करण्याचे वेळेसही तोंडापाशीं दोन्ही हात नेतां व चट्कन् डावे हातांतील रुपया उजवे हातांत घेऊन तो गुप्त झाल्यासारखें केलें. त्याप्रमाणें तळहातांत अनेक पदार्थ ठेवून त्यांस ते झट्झट् काढून दाखविले, व एकाचे दोन केले, तीन केले व चार केले. मग ते निम्मे करून दोन भाग केले. असें पुष्कळ रीतीनें ठकाविलें.

नंतर पुनः तळहातामध्यें पुष्कळ पदार्थ एकदांच घेऊन मिशांवर ताव वगैरे देतांना एक पदार्थ पट्कन् तोंडांत घातला. आणि मोठ्या जोरानें खांकरून खोकरून पोटांतून निघाला असें दाखवून तो बाहेर काढावयाच्या वेळेस लागलाच दुसरा पदार्थ घातला. या रीतीनें, घुंगरूं, लाखेची गोटी, कांच, कवडी, सोंकटें, असे अनेक पदार्थ एकामागून एक काढिले. त्यानंतर तोंडांत वनस्पती धरून जाळ काढिले, व खापरखुंट्या कडकडां चावल्या. याशिवाय करंड्याखालीं चेंडू लपवून हातचलाखीनें एका ठिकाणीं दोन व एका ठिकाणीं कांहीं नाहीं असें करून दाखविलें. एक लहान फांदी पहिल्यानें लावून ती दाखवावी, नंतर तीपेक्षां मोठी तिचे जागीं पुरावी, असें करीत अखेरीस आंबे आलेली फांदी पुरून त्या सर्व लोकांस आंब्यांचें झाड करून दाखविलें.

गुलाब, अबीर, बुक्का, अर्गजा इत्यादिकांच्या गोळ्या म्यां अगोदरच शरीराचे निरनिराळे भागांत ठेविल्या होत्या. मग जेव्हां अरगजा वगैरे काढितों असें ह्मटलें तेव्हां नांवास मात्र थोडीशी माती घेऊन इकडे तिकडे हातवारे करण्याचे वेळेस ती टाकून देऊन ठेविलेल्या गोळ्या चलाखीनें घेऊन त्या चुरून ते ते पदार्थ करून दाखविले. नंतर इंग्लिश रीतीचे कांहीं खेळ त्यांस करून दाखविले. त्यांमध्यें मुख्य लोहचुंबकाचे चमत्कार, नखतेलाच्या दिव्यांत दिसणारे चमत्कार, व विद्युलतेचे चमत्कार दाखविले. हरबऱ्याची आंब व गारेचें पाणी यांपासून तत्काळ रसायनव्यापार घडून धान्यें कशीं तत्क्षणीं उगवतात तें दाखवून दुसरेही गंधकाचा अर्क आणि क्लोरेट ऑफ् पोटाश व फासफरस यांच्या रसायनांची मजा दाखविली.

हे सर्व खेळ पाहून त्यांस अतिशय आनंद झाला. नंतर म्यां त्यांस त्या सर्व गोष्टींचें निराकरण करून सांगितलें कीं, आपल्या देशांत कोणास रसायनव्यापार, आकर्षण, अथवा वायूचा दाब अशा प्रकारचे सृष्टींतील कांहीं चमत्कार दृष्टीस पडले, ह्मणजे ते दुसऱ्यास न सांगतां तेवढ्यावरच आपली उपजीविका चाळावी याकरितां दुसऱ्या लोकांस मंत्राचें अगर जादूचें ढोंग दाखवून आपला निर्वाह करितात. ही चाल आपले मुलुखांत फार प्राचीन काळापासून चालत आली आहे. ही वेडी समजूत मंत्र व जादू यांविषयींच तुमची नव्हे, तर मोठमोठ्या महत्वाच्या गोष्टींविषयींही हाच प्रकार आहे. एखाद्यास एखादें उत्तम औषध समजलें, अगर एखादा हिशोब समजला, अथवा एखादा खुबीदार श्लोक आढळला, तर ते आपलें महत्व कमी होईल या भयास्तव मरेपर्यंत तो कोणास सांगत नाहींत. कधीं कधीं असें होतें कीं, ते शोध त्यांच्या बरोबरच नाहींसे होतात, त्यामुळें तितकी सृष्टींतील सुधारणा मागें पडते. असो. आतां तुम्हीं ह्या गोष्टी ध्यानांत ठेवून कोणास न फसवितां व फसवूनही न घेतां लोकांस खऱ्या गोष्टींविषयीं माहिती करून द्या. मी इतकें बोलल्यावर एकानें मला किमया कशी होते ह्मणून विचारलें. तेव्हां मी ह्मणालों, फार चांगलें विचारलें, हेंही लोकांमध्यें एक वेडच आहे. सुवर्ण आणि रुपें ह्या स्वतःसिद्ध शुद्ध धातु आहेत. ह्या कोणापासून अगर कशाच्याही संयोगानें होत नाहींत. मागें पुष्कळ गोसाव्यांनीं व फकिरांनीं किमया करून दाखविली असें म्हणतात, परंतु त्यांनीं आपले शिष्यास अगर यजमानास एखादे वेळेस खुष करण्याकरितां, किंवा त्यांचा भाव आपणावर बसण्याकरितां, जवळचें सोनें अगर चांदी खर्च करून ती युक्तीनें मुशींत घालून सोनें किंवा रुपें करून दाखविलें, परंतु खरी किमया कोणासही सांपडली नाहीं.

आतां सुवर्णामध्यें मुख्य गुण म्हटले ह्मणजे प्रसरणशक्ति, सौंदर्य, अविनाशकता, व वजन हे आहेत. किमयांच्या योगानें अगर रसायनव्यापारानें यांपैकीं कोणतेही तीन गुण आणितां येतात, परंतु चारी गुण पूर्णपणें आणितां येत नाहींत. म्हणजे त्याचा अर्थ, सुवर्ण कृतीनें करितां येत नाहीं. पुष्कळ किमयावाल्यांनीं सुवर्ण करण्या-

च्या थापा देऊन त्याच्या साहित्यास मिळविलेलें द्रव्य उपटून पलायन केलें असें पुष्कळांच्या लक्ष्यांत आलें असेल. असो. आतां आजपासून तुम्ही हुशारीनें वागाल आणि अशा प्रकारच्या भोळेपणावर विश्वास ठेवणार नाहीं अशी आशा आहे. असें बोलल्यावर सभा विसर्जन झाली.

पुढें त्या शहरांत पद्मनयनेचा शोध लागत नाहीं असें वाटून तेथून निघून जावें असें माझ्या मनांत आलें. तो बेत मी आपले त्या नवीन सोनार मित्रांस सांगितला. तेव्हां ते म्हणाले, " आमचे मनांत एक हेतु आहे तेवढा शेवटास न्या आणि मग जा. " त्याजवर काय हेतु आहे तें मीं विचारलें. मीं आपल्या बायकोची वगैरे सर्व हकीकत त्यांस सांगितली होती, याकरितां ते म्हणाले कीं, आमची सर्वांत धाकटी बहीण उपवर आहे तिचा अंगीकार आपण करावा. असें ते बोलल्यावर मला मोठें कोडें पडलें. कारण अशा स्नेह्यांनीं मनापासून विनंति केली ती मोडणें फार वाईट आहे. दुसरें, माझे मनांत होतें कीं, अशिक्षित स्त्री करावयाची नाहीं. सुशिक्षित स्त्री जर कदाचित् नच मिळाली तर असाच जन्म काढूं. परंतु त्यांनीं त्या गोष्टीचा फारच आग्रह धरिला, तेव्हां मला कांहीं युक्ति सुचेना. शेवटीं म्यां बेत केला कीं, मुलगी पाहण्यास बोलावावी आणि तिच्यामध्यें कांहीं तरी न्यूनपणा काढून ईस वरीत नाहीं असें सांगावें. दुसरे दिवशीं त्यांचे दुकानीं गेल्यावर मुलगी कशी आहे ती दाखवा असें मीं म्हटलें, तेव्हां त्यांनीं तत्क्षणीं तीस घरांतून दुकानांत बोलाविलें. ती माझ्यापुढें येऊन उभी राहतां बरोबर काय विचारतां ? मला असें वाटलें कीं, मी कल्पवृक्षाखालीं बसलों आहें काय ? किंवा स्वर्गसुख भोगीत आहें काय ? किंवा मला कामधेनूच प्रसन्न झाली काय ? कारण, जी मुलगी मी मुलींच्या शाळेंत पहिल्यानंबरची ह्मणून सांगितली तीच ती होती. ती त्यांचीच बहीण आहे असें मला पूर्वीं माहित नव्हतें. मला अशी विद्वान् स्त्री मिळणार असें वाटतांच अतिशय आनंद झाला, व आजपर्यंत नीतीनें वागल्याचें फळ परमेश्वरानें मला दिलें असें मीं समजलों. मी तत्क्षणीं ती गोष्ट कबूल करून लग्नाची तयारी लवकर करा असें सुचविलें. त्यांनीं तें मान्य करून थोडके

दिवसांत लग्न लाविलें. नंतर त्या स्त्रीसहवर्तमान विचित्रपुरीकडे येत असतां रस्त्यांत विघ्न आलें वगैरे गोष्ट तुम्हांस समजलीच आहे. असें बोलून तो स्वस्थ राहिला.



# भाग १.

## विद्येचें फळ.

श्यामसुंदराची हकीकत संपतांच प्रभातकाळ झाला. आकाश रक्तवर्ण होऊन थंड वायु वाहूं लागला. पक्षी वृक्षांवर बसून सुस्वर गयन करूं लागले; व झाडेंझुडें प्रफुल्लित दिसूं लागलीं. रात्रीं कमलांत अडकलेले भ्रमर सूर्योदय होतांच बाहेर निघाले व मोठ्यानें गुंजारव करूं लागले. मधुमक्षिकांनीं रात्रीस पुष्पांचे कोशांत सांचलेला मधुर रस लुटण्यास आरंभ केला; व त्या अति आनंदानें पुष्पपरागांत लोळूं लागल्या.

अशा समयास ते विद्वान् उठून मुखमार्जनादि नित्यकर्म सारितेझाले. नंतर पुनः एकत्र जमण्याच्या इराद्यानें बैठकीच्या जागीं आले. इतक्यांत खालीं कोणी हांक मारितो आहे असें समजल्यावरून पुष्पशील दरवाज्यापाशीं आला. त्यानें मोठ्या उत्सुकतेनें शोध केला, तों एक मनुष्य हातांत लखोटा घेऊन उभा आहे असें दिसलें. पुष्पशीलानें त्यापासून तो कागद घेतला व पत्ता वाचला, तो असा होताः—

श्रीमंत प्रतापसिंह राज्यधुरंधर धैर्यशील महाराज, यांस माणिकपुरांत देणें.
विरावती.

माणिकपूर.

हा पत्ता पाहतांच पुष्पशीलास विलक्षण आश्चर्य वाटलें. तो तत्क्षणीं त्या मनुष्यास उभें राहण्यास सांगून माडीवर गेल आणि धैर्यशीलास मोठ्यानें हांक मारून ह्मणाला, " धैर्यशीला, अरे ही वीरावती कोण? अरे, वीरावती काय? काय आहे तरी काय?" धैर्यशील हर्षभरित होऊन म्हणतो, " अरे, पाहूं दे काय पत्र आहे तें.—पत्र फोडून वाचूं लागतो.

प्राणप्रिय धैर्यशील महाराज यांस,

जोंपर्यंत आपण या तंबूंत होतां तोंपर्यंत सहस्त्र किरणांनीं

सूर्य प्रकाशतो असें भासून या स्थलास इंद्रभुवनापेक्षां जास्ती शोभा आली होती. परंतु आपण पराङ्मुख होतांच हें स्थल स्मशानवत् भासलें. विरहाग्नीनें शरीर दहन करण्यास आरंभ केला, तेणेंकरून सर्व अंगाची लाही होऊन नेत्रांस चंद्री लागली आहे. आपली मूर्ति एकसारखी नयनांपुढें उभी राहिली आहे. व कर्तव्यकर्मे कांहीं सुचत नाहींत. आपण गेलां त्याच वेळेस आपलेबरोबर यावें असें मनांत होतें, परंतु आपला कल तसा दिसला नाहीं, सबब बाहेर मनोभाव दाखविला नाहीं. प्रातःकाळ झाल्यावर आपलेबरोबर गेलेला मनुष्य परत आल्यावर त्याबरोबर आपले भेटीस यावें असें मनांत आलें; परंतु परवानगीवांचून तसें करवेना. याकारितां हें पत्र पाठविलें आहे. तर विलंब न करितां या मनुष्याबरोबर आज्ञापत्र सत्वर पाठवावें म्हणजे आपल्या दर्शनानें सर्व ताप दूर होऊन मानसाचें समाधान होईल. जरकरितां मला येण्याची आज्ञा देण्यास कांहीं अडचण असेल तर आपण तरी एकवेळ येथपर्यंत येऊन वदनशोभामृतेंकरून तृषार्त नेत्रांस शांत करावें. त्याशिवाय या ठिकाणाहून रत्नपुरास जाववत नाहीं. यावरून माझे अंतःकरणाची स्थिति आपले लक्ष्यांत येईल. फार काय लिहिणें, ही विज्ञापना.

आपली प्रीतिसुधेच्छु,

**वीरावती.**

याप्रमाणें पत्र वाचतांच धैर्यशीलाचे ह्रदयांत आनंदलहरी उठूं लागल्या. पुष्पशीलास मग समजलें कीं, ही कोणी याचे प्रीतींत सांपडलेली विरहिणी आहे. तेव्हां त्यासही अति आनंद वाटून तो मोठ्या उत्कंठेनें ही कोण आहे व तिची प्रीति तुजवर केव्हांपासून कशी जडली तें मला सांग म्हणून म्हणाला. त्या वेळेस श्यामसुंदारानें वीरावतीच्या शौर्याचें वगैरे सर्व वर्णन केलें. तें ऐकल्यावर तो म्हणाला, " अहाहा! सृष्टिकर्त्याची लीला अघटित आहे! पहा हा जोडा काय योग्य उत्पन्न केला आहे! धैर्यशीला, आतां एकदम वीरावतीस इकडे बोलाव.

आम्हास एकदां तीस पाहूं दे. अशी पराक्रमी व शहाणी स्त्री पाहण्याचा आम्हांस हा पहिलाच प्रसंग आहे. तिची पत्र लिहिण्याची तरी काय खुबी आहे पहा! यावरून ती अलौकिक स्त्री आहे यांत संशय नाहीं. नंतर धैर्यशीलानें तीस त्या पत्राचें उत्तर लिहिलें, तें असें:—

माझे प्राणप्रिये वीरावती,

तूं दुसऱ्याचे अंतःकरणांत जे भाव उत्पन्न होतात ते जाणण्यास शिकली आहेस काय? तूं आपले पत्रांत लिहिलेले भाव माझे हृदयांत उत्पन्न होत आहेत, असें जाणून ते आपल्यावर ओढून माझे मनाची अशी स्थिति झाली आहे अशी उत्प्रेक्षा केली आहेस काय? असो. वीरावती, तुझें पत्र पाहतांच, चंद्रदर्शन झालें ह्मणजे जसा सागर त्यास भेटण्याकारितां उत्कंठित होऊन वर जाऊं लागतो, त्याप्रमाणें तुझ्या पत्रानें तो दिव्य मुखचंद्रमा साक्षात् दृष्टिगोचर झाल्यासारखें होऊन प्रेमसिंधूस पूर आला आणि त्याच्या लहरी हृदय व्यापून बाहेर पडूं लागल्या. प्रिये, काय सांगूं, मी सारी रात्र मित्रसमाजांत आनंदाच्या गोष्टी सांगत बसलों होतों खरा, परंतु सारें लक्ष तुझ्याकडे लागलें होतें. मला त्यांची आज्ञा घेतल्याशिवाय तुजकडे येववेना, व तुला येथें बोलाविण्यासही प्रशस्त वाटेना. यामुळें काय तजवीज करावी तीही सुचेना. अशा अडचणींत होतों तों तुझें पत्र येऊन दाखल झालें, त्या वेळेस सर्व स्नेह्यांची आज्ञा झाल्यावर हें पत्र पाहतांच त्वां इकडे यावें या आशेनें ह्या चार ओळी लिहिल्या आहेत. आतां विलंब करूं नको, माझें सर्व लक्ष रस्त्याकडे लागलें आहे. जरा कांहीं वाजलें तरी तूं आलीस असा मला भास होईल.

तुझी भेट इच्छिणारा,

धैर्यशील.

अशा मजकुराचें पत्र लिहून त्यानें आलेल्या मनुष्याबरोबर तें पाठवून दिलें. तें पत्र वीरावतीस पोंचतांच तीस अतिशय आनंद झाला. तिणें तत्क्षणीं घोड्याची गाडी तयार करवून उत्तम पोषाख केला, आणि तंबू वगैरे सरंजाम रत्नपुरास रवाना करून आपण माणिकपुरास आली. तिला पाहतांच सर्वांस अतिशय आनंद झाला. त्या वेळेस ते चारही जोड एके ठिकाणीं बसल्यावर फार विलक्षण शोभा

दिसूं लागली. तितक्यांत ते सर्व जशास तसे मिळाले होते यामुळें प्रीति आणि आनंद हे त्या समाजांत स्पष्टपणें दिसत होते. त्या सर्व स्नेह्यांत श्यामसुंदर वयानें कांहींसा लहान होता. तशीच त्या स्त्रीसमाजांत जयंतीही लहान होती. कोणी परकी स्नेही आला ह्मणजे त्यांणीं विनोदार्थ एकत्र होऊन आमचे जोडे निराळे कर ह्मणून विचारावें, तेव्हां त्यास त्यांच्याविषयीं कांहीं जरी माहिती नसली तरी एका क्षणांत त्यानें त्यांच्या जोड्यांची फोड करावी; इतके ते एकमेकांच्या रूपातुल्य होते.

माणिकपूर शहरांत कांहीं दिवस राहून ते थोडकेच दिवसांनीं विचित्रपुरीस आले. आणि लागलीच चौंशहाणपुरास जाण्याची तयारी करूं लागले. वीरावती त्या सर्वांचा निरोप घेऊन आपले बापाचे घरीं निघून गेली. नंतर त्यांनीं जयंतीस व सगुणाबाईस पद्मनयनेच्या घरीं ठेवून आपण जसे मुशाफराचे पोषाख घेऊन घरून निघाले होते, तसे पेहराव करून आपापल्या घोड्यावर बसून सानंदाश्चर्येंकरून युक्त होत्साते चौंशहाणपुरास येऊन दाखल झाले.

ते आले असें वर्तमान भरतसिंह राजास व दुसरे लोकांस समजतांच ते त्यांस सामोरे आले; आणि त्यांनीं मोठ्या थाटानें त्यांस शहरांत नेलें. सर्व सरदार व नौकरलोक यांनीं त्यांस मोठ्या नम्रतेनें सलाम केले व बरोबरीच्यांस त्यांनीं प्रेमालिंगनें दिलीं. जे वडील, श्रेष्ठ व विद्वान् होते त्यांस, चौघांनीं पायांवर डोकीं ठेवून नमस्कार केले. नंतर कचेरींत सर्व मंडळी बसली असतां त्यांनीं आपला सर्व वृत्तांत सांगितला. तो ऐकून सर्व लोकांस धैर्यशीलाच्या धैर्याचें मोठें आश्चर्य वाटलें. भरतसिंह राजासही पुष्पशीलानें पद्मनयनेस वरलें हें ऐकून संतोष वाटला. कारण, तिच्या स्वरूपाची कीर्ति त्यानें ऐकिली होती, व तिच्याशींच पुष्पशीलाचा विवाह करावा असा त्याचा हेतु होता; परंतु पोरानें मला तो लग्नसोहळा पाहण्यास बोलाविलें नाहीं ह्मणून तो जरा खिन्न झाला.

पुढें थोडकेच दिवसांनीं भरतसिंह राजानें पुष्पशीलास राजाभिषेक करून गादीवर स्थापन केलें, आणि आपले शिरावरील राज्यकारभार त्याचे अंगावर टाकून आपण परलोकसाधनास लागला.

चित्रपाल राजानेंही प्रधानास पाठवून पुष्पशीलास बोलावून नेलें, आणि विचित्रपुरींतील राज्यावर त्याची स्थापना केली. तेथें कांहीं दिवस राहून पद्मनयना, सगुणाबाई व जयंती या तिघींस घेऊन तो पुनः चौशहाणपुरास आला. नंतर थोडेच दिवसांनीं वीरावतीच्या बापाकडून पत्र आल्यावर संकेताप्रमाणें धैर्यशीलाचें व वीरावतीचें लग्न मोठ्या थाटानें लागलें. त्यानंतर पुष्पशीलानें तीं दोन्हीं राज्यें एकत्र करून त्यांचा बंदोबस्त करण्यास आरंभ केला. त्यानें प्रथम धैर्यशीलास प्रधानकीचीं वस्त्रें दिलीं. नंतर त्या एकत्र झालेल्या सर्व राज्याचे तीन विभाग केले. एका विभागावर मनोहरपंडितास व दुसऱ्या दोन विभागांवर धैर्यशीलास व श्यामसुंदरास गव्हरनरासारखे अधिकार देऊन नेमिलें. नवीन कायदे करण्याकरितां अगर हरएक राज्यप्रकरणीं गोष्टीविषयीं विचार करणें झाल्यास त्या सर्वांस हुजूरांत बोलावून त्यांच्या विचारें करण्याचा ठराव केला.

त्या मुलुखांत पूर्वीं जागोजाग अति निबिड जंगलें होतीं त्यामुळें चोरांस वाटा मारण्यास सोईवार पडत असे; याकरितां त्यांनीं तीं सर्व जंगलें तोडून मैदान केलें, आणि सर्व ठिकाणीं मोठमोठ्या सडका बांधून चोरवाटा अगदीं मोडून टाकिल्या. या गांवाहून त्या गांवीं पत्र पाठविण्याची फार गैरसोय होती ह्मणून पोस्टऑफिसें निरानिराळे ठिकाणीं स्थापन करून रात्रंदिवस टप्याचे घोडे ठेवून डांका चालण्याचा बंदोबस्त केला. जमिनीची मोजणी करून तिच्या उंचनीच प्रती लावून त्या मानानें जमिनीचा सारा घेण्याचा ठराव केला. प्रत्येक तालुक्यांत दिवाणी व फौजदारी अशीं दोन कोर्टें स्थापन करून त्यांवर बी. ए. च्या परीक्षेंत पास झालेल्या विद्वानांस नेमिलें, व त्यांनीं तीं कामें पुष्कळ दिवस इमानानें व हुशारीनें केलीं असें लक्ष्यांत आल्यावर त्यांची पुनः परीक्षा घेऊन त्यांसच जिल्ह्याचे ठिकाणच्या कलेक्टराच्या व जजाच्या जागा देण्याचा ठराव केला. सर्व शहरांत म्युनिसिपाल कमिट्या स्थापन केल्या आणि त्यांच्याकडून शहरांच्या सुधारणा करविल्या. प्रत्येक ठिकाणीं दूर अंतरावरून पाण्याचे नळ बांधून आणिले, व गांवांत मोठमोठे रस्ते करून पोलिसाचा बंदोबस्त उत्तम प्रकारचा केला. गांवामध्यें चोरांस बसण्याच्या जागा अगर

त्यांचीं देवस्थानें सर्व युक्तीयुक्तीनें पाडून टाकिलीं; व फौजेमध्येंही उत्तम प्रकारची कवाईत व व्यवस्था ठेविली.

जे मुख्य तीन विभाग केले होते त्या प्रत्येक भागांत सरकारी इमारती बांधून त्या ठिकाणीं मुख्य न्यायकोर्टें स्थापिलीं. आणि तीं अपिलाची शेवटील पायरी ठरविली. त्या ठिकाणीं **पुण्यशील** दर वर्षास स्वतः जाऊन देखरेख व तपासणी करी. **धैर्यशीलास** एका भागांत गव्हरनरचें काम करणें केवळ शुष्क वाटे. याकरितां सर्व फौजवरील मुख्य सेनापतीचा अधिकारही त्यास दिला. प्रत्येक गांवामध्यें सरकारी शाळा स्थापन केली. तालुक्याचे गांवांत एक इंग्लिश स्कूल केलें. व जिल्ह्याचे ठिकाणीं कॉलेजें स्थापिलीं. **विचित्रपरी** आणि **चांशहाणपूर** या दोन ठिकाणीं दोन युनिव्हर्सिट्या स्थापिल्या. आणि त्यावर यूरोपियन विद्वान् अधिकारी आणिले. यांशिवाय मोठमोठ्या गांवांत मुलींच्या शाळा सुरू केल्या. त्या शाळांतून हुशार आलेल्या मुलींसच पुढें शिक्षकांच्या जागा देण्याचा ठराव केला. मुलींच्या सर्व शाळांवर **सगुणाबाईस** व **जयंतीस** मुखत्यार केलें, व त्यांनीं त्या सुधारण्यास झटावें असा ठराव केला.

मोठमोठ्या गांवीं दवाखाने व डागदरखान्या स्थापन केल्या. आणि मुशाफरांस उतरण्याकरितां धर्मशाळा व चावड्या बांधिल्या. तसेंच पाणपोया व अन्नछत्रें जागोजागीं घातलीं. याप्रमाणें प्रजेच्या सुखाकरितां पुष्कळ व्यवस्था करून त्यांना तो देश संपन्न व सुखी करण्याची युक्ति आरंभिली. त्यांच्या मुलुखांत जे जे पदार्थ उत्पन्न होत नव्हते ते ते दुरून आणून पेरण्याचा क्रम चालविला. सोय पाहून मोठमोठ्या नद्यांस धरणें बांधून त्यांच्या पाण्यानें बागाईत चालविलें. कोठें कोठें विस्तीर्ण डोहांत बंब लावून त्याच्या योगानें शेतांस पाण्याचा पुरवा केला. वाफेनें चालणारे नांगर व दुसरा माल तयार करण्यास यंत्रें लाविलीं. सुताचे यंत्राचा कारखाना सुरू केला, व विणण्याचेंही काम यंत्रानें चालविलें; आणि छापखाने चालविले. असे मोठाले कारखाने राज्यांतील खर्च बेताचा ठेवून खजिन्यांतील सरकारी शिलकेनें व श्रीमंत सावकारांच्या विभागानें चालू झाल्यामुळें त्या मुलुखांत संपत्ति थोडकेच दिवसांत फार वाढली. यांखेरीज व्यापारीलोकांच्या मंडळ्यां-

स उत्तेजन देऊन त्यांचेकडून रेल्वे व तारायंत्रें करण्याचें काम सुरू केलें. तेणेंकरून सर्व व्यापारी व श्रीमंत लोकांस द्रव्याचा उपयोग कसा करावा हें समजून तेणेंकरून रयतेचें कल्याण होऊं लागलें.

याप्रमाणें सुधारणा आल्यावर व देश संपन्न आल्यानंतर त्यांणीं त्या चौगहाणपुरास फारच शोभा आणिली. रस्त्यांमध्यें आलेलीं घरें पाडून रस्ते अगदीं सरळ व रुंद केले. त्यांतील सर्व वाड्यांस बाहेरून सुवर्णवर्णी रंग देऊन तें सर्व शहर कनकमय आहे असें केलें. रस्त्यांच्या दोहों बाजूंस संगमरवरी दगडांचीं दुहेरी गटारें बांधिलीं. व त्यांवरून पायरक्त मनुष्यांस वागतां यावें इतकीं तीं रुंद केलीं. गटारांवर रस्त्यांस दोहों बाजूंस सोन्याचा मुलामा केलेले व नकशीदार असे प्याले तीन तीन फुटांच्या अंतरानें मांडिले; व त्यांमध्यें गुलाब, कांटेशेवती, मोतिया, गुलछबू, व अशाच प्रकारचीं दुसरीं सुवासिक व उत्तम फुलें येणारीं झाडें लाविलीं. धुराच्या दिव्यांच्या नळ्या सर्व शहरभर पसरून दहा दहा फुटांवर चांदीचे नकशीदार व सोन्याचा मुलामा केलेले स्तंभ पुरून त्यांवर मोठमोठ्या गोलाकार हंड्या लाविल्या; आणि प्रत्येकांमध्यें मोठमोठाले दोन दोन दिवे सारी रात्र जळावे असें केलें. शहराच्या मध्यभागीं एक विस्तीर्ण वर्तुल काढिलें, व त्याच्या सभोंवतीं वर्तुळाकृति एका हातोटीचे अनेक वाडे बांधिले. त्या वर्तुळाच्या मध्यभागीं गोलाकार लहानसा बगीचा करून सभोंवतीं वर्तुलगामी रुंद रस्ता केला. बागेच्या मध्यभागीं पाषाणाचा चवथरा करून त्यावर सुवर्णानें व अति कौशल्यानें कोरलेलें एक झाड मांडिलें; व त्यावर जागजागीं प्याल्यांच्या आकृति करून त्यांतून अत्युत्तम फुलझाडें लाविलीं. चवथऱ्यासभोंवतीं अनेक कारंजीं निरंतर उडावीं असें केलें; व त्यांचें स्वच्छ पाणी तांब्याच्या पाटांतून खळखळ वाजत जाऊन फुलझाडांच्या तांटल्यांस मिळावें अशी योजना केली. त्या वर्तुलाकार बगीच्याभोंवतीं चांदीची झिलई दिलेले व नकशीदार कठडे लाविले; व त्यांच्या नजीक पाच, मरवा, दवणा, इत्यादि सुवासिक झाडें धातूंच्या झिलया दिलेल्या कुंड्यांमधून लाविलीं.

फार लांबून पक्का पाण्याचा नळ बांधून सर्व रस्त्यांत नेला, व घरोघर पाणी जाणाऱ्या नळ्या केल्या. रस्त्यांतही जेथें पैस जागा

दिसलें त्या ठिकाणीं दगडाचे हौद बांधिले व त्यांस कारंजीं क रून तीं निरंतर पुरुषभर उंच उडावीं अशी तजवीज केली. गांवा बाहेर मोठें रेलवेचें स्टेशन बांधिलें व त्यापासून गांवापर्यंत दुतर्फा झाडें लाविलीं. तारायंत्राचें ऑफीस, पोस्ट ऑफीस व मोठमोठ्या दि वाणी व फौजदारी कोर्टें अतिशय खर्च करून बांधिलीं. मामलेदार, फौजदार, मुनसफ, सेनापति, मुतालीक, इत्यादि कामदारांच्या क चेऱ्या त्या वर्तुळाकृति रस्त्यांतील वाड्यांत ठेविल्या. सर्व गांवाभोंवतीं अति विस्तीर्ण बाग केले, व त्यांमध्यें आंबे, फणस, जांभळ, आवळी निंब, बकुल, मालती, चांफा, पारिजातक, पेरू, नारंग, कोट शिताफळी, रामफळी, वगैरे झाडें एका रांगेनें लाविलीं. त्यामधून सुंदर सडक काढून मधून मधून मोठाली पटांगणें ठेवून त्यामध्यें मु वासिक फुलझाडें लावून मधील रस्त्यावर द्राक्षांचे मंडप घातले. मधून मधून त्यांमध्यें केळी, नारळी, पोफळी, बदाम, अंजीर, न. कोत्रे, डाळिंबी, अननस, इत्यादि फळझाडें लाविलीं. याशिवाय, क ळीचीं, उंसाचीं व बोरूचीं बनें ठिकठिकाणी केलीं; व कांदे, ब टाटे, अळू वगैरे शाकभाज्यांचे मळे जागोजाग करविले.

त्या शहरच्या विस्तीर्ण नदीस पुष्कळ ठिकाणीं पूल बांधून अ नेक धरणें बांधिलीं व त्यांच्या योगानें सर्व शहराभोंवतीं जिकडे ति कडे बारा महिने उदकाचे पाट चालावे अशी तजवीज केली.

वर्तुलगामी चौकाच्या समोरच्या बाजूस अति उत्कृष्ट राजवाडा बांधिला. त्या वाड्यास सात मजले केले व चोहोंकडे खिडक्या ठेवून उजेड आणि स्वच्छ हवा सर्वत्र विपुल राही असें केलें. सर्व वाड्यास सोनेरी रंग दिला व दरवाज्यास सोन्याचे पत्रे मारिले. आंत निर निराळे रंगमहाल व ऐनेमहाल केले व त्यामध्यें किनखाबी छतें आणि तसबिरा उत्तम प्रकारें बसविल्या. प्रत्येक महालांत आपोआप वाजणारीं रत्नखचित घड्याळें ठेविलीं व बारा सदोदित चालण्यास कळीनें चालणारे किनखाबी पंखे लाविले.

अशा प्रकारचा राजवाडा व शहरची सुधारणा करून ते चार वि द्वान् राहते झाले; ते निरंतर आपल्या बुद्धिकौशल्याचा उपयोग आ पल्या आणि प्रजेच्या सुखाकडे करूं लागले; ते अगोदर अत्यंत सु

द्धिमान्, नशांत त्यांस उत्तम शिक्षण मिळून अगणित द्रव्य व स्वसत्ता प्राप्त आली; मग काय विचारावयाचें आहे! ते नवीन यंत्रें उत्पन्न करूं लागले, व नवीन शोध करूं लागले. त्यांनीं निरनिराळ्या विषयांवर अनेक ग्रंथ लिहिले, व ऐहिक आणि पारलौकिक उत्तम सुख मिळे अशा प्रकारचें कायदे केले. पूर्वींच्या सर्व वेड्या समजुती सोडून दिल्या व निरनिराळ्या भाषा शिकून त्यांतील उत्तम राजनीति शोधून काढिली.

याप्रमाणें ते विद्वान स्त्रियांसहवर्तमान एकत्र राहून लोकांस आपलें उत्तम आचरण दाखवूं लागले; व त्यायोगें सर्व आबालवृद्धांनीं यांचा कित्ता घेऊन त्या सर्व राज्यांतील लोक इंद्रभुवनाप्रमाणें सुख भोगूं लागले.

आर्या

॥ प्रभु पुरा हा झाला ॥ जगदीशा नव कृपें चित्रपुरी ॥
॥ तात्पर्य बाळूनीं मन ॥ पावें निज आत्मसमृद्धिचित्रपुरी ॥



* आत्मसमृद्धिचित्रपुरी ह्मणजे स्वानंदरूप जी विलक्षण पुरी आहे ती.

# विचित्रपुरी.

## पुस्तक तिसरें.

## भाग १.

### कथानकाचें तात्पर्य.

आपल्या देशांतील प्राचीन श्रेष्ठ लोकांनीं पिंडब्रह्मांडरचना वर्णन केली आहे. तींमध्यें, ज्या ज्या वस्तु ब्रह्मांडांत आहेत त्या त्या सर्व सूक्ष्मरूपानें या शरीरांतही आहेत, असें उपपादिलें आहे. त्या मानानें ब्रह्मांडांत जे वसंत, ग्रीष्म, इत्यादि ऋतु आहेत त्यांच्या समतेचे विकार या देहांत कामक्रोधादि षड्रिपु होत. ब्रह्मांडांत सृष्टिसौंदर्याचे प्रकार जसे या ऋतूंच्या योगेंकरून दृष्टीस पडतात, त्याप्रमाणें शरीरांत कामक्रोधादिकांचे चमत्कार चित्तवेधक असतात. याकरितां कोणतेंही कथानक रसभरित करण्याकरितां व कामक्रोधादिकांचीं रूपकें सर्वोत्कृष्ट व्हावीं, यास्तव त्यांचे अंगभूत जे षड्ऋतु त्यांचें वर्णन करणें अवश्य असतें. या कारणास्तव या ग्रंथांत संधि पाहून जागजागीं ऋतूंचें वर्णन दिलें आहे. परंतु तें ज्ञानदृष्टीनें कामक्रोधांचेंच समजावें.

असो. कथानकांत चौशहाणपूर शहर म्हटलें आहे तें एकंदर देह समजावा. चौशहाणपूर म्हणजे चार शहाणे गृहस्थ राहतात तें शहर, आणि ते चार शहाणे अनुक्रमें, पुष्पशील, धैर्यशील, मनोहरपंडित आणि श्यामसुंदर हे होत. आतां या देहांतही मुख्य चार तत्वें आहेत, तीं कोणतीं म्हणाल तर, आत्मा, धैर्य, मन व विवेक; देहाचें भरण (पोषण) करणारा जो देहाभिमान तो भरतसिंह राजा होय. देहाच्या योगेंकरूनच आत्मप्रतीति होते, याकरितां भरतसिंहाचा पुत्र पुष्पशील (आत्मा) असें वर्णिलें आहे. देह विद्यमान असून आत्मा पाहिला असतां तो पुष्पशीलच, म्हणजे पुष्पासारखा सुकुमार आहे. कारण, सत्वगुणापासून ह्मणो-

घर आलेला आत्मा पूर्णत्वेंकरून देहाभिमान निरास आल्याशिवाय " नैनं छिंदति शस्त्राणि " इत्यादि योग्यतेस कसा पावेल? दुसरें, या कथानकांत केवळ जडमूढतेस देह पावला असून, नंतर त्यास पूर्णत्वेंकरून स्वानंदस्थानास नेणें आहे, असें दर्शविणें आहे. याकरितां बद्धस्थितींत आत्म्याचें स्वरूप सकुमार दर्शविलें आहे.

आत्म्याचा प्रधान धैर्य कसें? असा प्रश्न सहज उत्पन्न होणार आहे. परंतु संसारसक्त वृत्ति झाल्यानंतर परमार्थ करूं म्हटलें म्हणजे पर्वतप्राय धैर्यच पाहिजे, त्याशिवाय कांहीं एक होत नाहीं. पातकी मनुष्य झाल्यास चांगलें कर्म आचरण्यासही धैर्य होत नाहीं, याबद्दल सर्व लोकांस अनुभव थोडाबहुत असतोच. याकरितां सांप्रतकाळीं सर्व लोक संसारसुखांतच ब्रह्म आहे असें मानून त्याकरितां रात्रंदिवस प्रयास करितात, असें असतां त्या सर्वांचें मत चुकीचें आहे असें मानून आपण एकटेच परमार्थ करूं लागलों तर, केवढें धैर्य पाहिजे हें सांगणें नको. इत्यादि कारणांस्तव काळदेशवर्तमान मनांत आणून आत्म्याचें मुख्य प्रधानत्व येथें धैर्यास दिलें आहे. **मनोहरपंडित** म्हणजे मन हें आत्म्याच्या निकटसंबंधांतील तत्व होय, म्हणून यास आत्म्याचा मित्र असें म्हटलें आहे. **श्यामसुंदर** ( विवेक ) हाही आत्म्याचा मित्र होय. धैर्य अनुकूल झाल्यानंतर मन आणि विचार यांच्याच योगानें पुढें परमार्थाची मजल चालणार आहे. या विवेकास **श्यामसुंदर** हें नांव कसें दिलें? यावर असें उत्तर आहे कीं, देहामध्यें सदसद्विचारशक्ति हेंच ईश्वरी स्वरूप आहे; आणि शास्त्रामध्यें ईश्वराचें स्वरूप **श्यामसुंदर** ( मेघवर्ण ) वर्णिलें आहे, म्हणून येथेंही या विवेकास तेंच नांव दिलें आहे. **पुष्पशीलास** राजा ( क्षत्रिय ) मानिलें आहे. कारण, आत्म्याकडे सर्व जगाचें नियंतृत्व (सार्वभौमत्व) आहे. आणि ज्या अर्थीं धैर्यास प्रधान केलें आहे त्या अर्थीं त्याची जातिही क्षत्रिय असली पाहिजे. मनाच्या योगानें ब्रह्म दिसणार अथवा मन ब्रह्मापासून मूळ उत्पन्न झालेलें आहे. असें समजून त्यास ब्राह्मण वर्ण योजिला आहे. विवेकाच्या योगानें देह सुवर्णासारखा होतो अथवा अमर होतो, या कारणास्तव त्याची जाति सुवर्णकार ( सोनार ) अशी प्रसिद्ध रीतीनें धरली आहे.

याप्रमाणें हे चार देहधर्म परमार्थाचा विचार करावा या बुद्धीनें योगा भ्यास ह्मणजे कथानकांत विद्याभ्यास करावयास लागले. ते चारही एम. ए. च्या परीक्षेंत पास झाले असें म्हटलें आहे. ते मास्टर आफ अबसोल्यूशन ( मोक्ष ) ही पदवी पावले, असें समजावें. ह्मणजे, ब्रह्मसाक्षात्कार झाला असा अर्थ. आतां देहामध्यें या प्रत्येक धर्मास वेगळाला साक्षात्कार कसा झाला! त्यास कथानकामध्यें त्या सर्वांनीं एकत्र अभ्यास करून पदव्या मिळविल्या असें म्हटलें आहे; त्यावरून ज्ञानदृष्टीनें चौघांचें ऐक्य होऊन ते ब्रह्मस्वरूपास पावले, असें ध्यावयाचें. साक्षात्कार झाल्यावर चित्तचतुष्टय, त्रिगुण, क्षुधा, तृषा, इत्यादि कशा उत्पन्न होतात हें पाहण्याकरितां व शेवटीं मृत्यु कसा उत्पन्न होतो याची चौकशी करण्याकरितां ते चार धर्म एकविचारानें देहांत शोध करूं लागले. त्याचें रूपक देशाटनास निघाले, असें प्रतिपादिलें आहे.

ते फिरतां फिरतां **विचित्रपुरी** नामक शहरास गेले. आतां देहामध्यें स्वप्नस्थिति ही खरोखर फारच विचित्र पुरी आहे यांत संशय नाहीं. या स्वप्नस्थितीस वेदान्तशास्त्रामध्यें कल्पनास्थिति ( अज्ञानस्थिति ) ही कित्येक मानितात; याकरितां या दोहोंपैकीं प्रसंगोपात जी योग्य दिसेल ती घेणें आहे. त्या स्थितीप्रत ते चार धर्म गेले; तों तेथें **पद्मनयना** ( शांति ), ती **पुष्पशील्याची** ( आत्म्याची ) पत्नी वर्णिली आहे. आत्म्याच्या आणि शांतीच्या सौंदर्याविषयीं जितकें वर्णन करावें तितकें थोडेंच आहे हें उघड आहे. याकरितां या दोघांच्या लावण्याचें अत्यंत वर्णन केलें आहे. स्वप्नस्थितीचा अभिमानी जो तैजस अहंकार तो **पद्मनयनेचा** बाप **चित्रपाल** राजा समजावा. कारण, त्या तैजस अहंकारापासून शांति उत्पन्न होते.

अज्ञान स्थितींत असणाऱ्या मनाची मूळची बायको कुबुद्धि आणि विचाराची पूर्वस्त्री दुष्कीर्ति होय, ( जीस त्या कुंटणीच्या घरीं **चमेली** ह्मणत असत ती ). याप्रमाणें लहानपणीं लग्न झालेले **मनोहरपंडित** आणि **श्यामसुंदर**, यांच्या बायका होत. अज्ञान स्थितीमध्येंच प्रायः कुबुद्धि आणि दुष्कीर्ति यांची वृद्धि असते, या कारणास्तव **विचित्रपुरी** येथें त्या दोघींचीं माहेरघरें वर्णिलीं आहेत; आणि तेथेंच त्यांच्या पतींचा त्यांच्याशीं समागम झालेला आहे. विवेक ( **श्यामसुंदर** )

मर्द्दनागे झाला सबब त्याची स्त्री (दुष्कीर्ति) ही त्यास सोडूं लागली. याकरितां ती कुविचार नांवाच्या छाकट्याशीं व्यभिचार करून तत्संबंधी दोषारोपण सद्विचारावर करीत असे. याबद्दलचा फासे छाकटा व चमेली यांच्या कथानकांत दाखवून तो पुष्पशीलानें ( आत्म्यानें ) अवलोकन केला असें म्हटलें आहे.

मनोहरपंडिताची बायको कुबुद्धि इच्या कुकल्पनांची पराकाष्ठा पुस्तक १ भाग ६ यांत वर्णन केलीच आहे. मनानें तीस शांत करण्याकरितां पुष्कळ यत्न केले, परंतु कांहीं उपाय चालला नाहीं. शेवटीं मन थकून स्वस्थ निजलें, तेव्हां ती कुबुद्धि पति अज्ञान मानून व पूर्वपातकेंकरून अत्यंत खिन्न होऊन शेवटीं लय ( मरण ) पावली. नंतर मनोहरपंडितानें दुसरी बायको सुबुद्धि ( सुगुणा ) इजबरोबर प्रीतिविवाह केला.

असो. स्वप्नस्थितींत ( विचित्रपुरींत ) शांतिप्राप्तीकरितां आत्मा गेला असतां तेथें कामक्रोधादिकांनीं ( दरोडखोरांनीं ) गर्दी मांडिली. त्यांनीं सुरत ( क्रीडा ) राम सुवर्णकाराचे घरावर दरवडा घातला. त्यासमयीं मन ( मनो० पं० ) व विचार ( श्यामसुं० ) हे अडकून गेले; परंतु आत्म्यानें धैर्याच्या ( धैर्यशीलाच्या ) मदतीनें बहुतेक रिपूंचा नाश केला. काम ( कामाजी ) आणि राग (राघोजी ) हे दोघे अति प्रबल; परंतु त्यांचाही पराजय होऊन ते पळाले. ते अजिबात मरण पावले नाहींत; कारण, काम क्रोध हे अति जबर रिपू आहेत मोठमोठ्या योग्यांसही यांनीं दाद दिली नाहीं. असो. ते पुनः प्रकट होऊन त्यांनीं पद्मनयना ( शांति ) चोरून नेली वगैरे पु० १ भाग ११ यांत वर्णन केलें आहे. षड्रिपूंचा नाश होतो तेव्हां आत्म्यास शांतीची प्राप्ति होते, हें उघड आहे. त्याप्रमाणें पुष्पशीलास पद्मनयना प्राप्त झाली. कामक्रोधांचा नाश अतिकष्टेंकरून केला असतां शांति फारच आनंद देते, त्याप्रमाणें पुष्पशीलास अत्यानंद झाल्याचें वर्णिलें आहे. त्या वेळेस पुष्पशीलानें मोहन ह्मणजे मोह ( प्रीति ) आणि पद्मनयनेनें सुमध्यमा ( चांगली मध्यस्थी करणारी अथवा पापपुण्याची मध्यस्थिति ) ह्यांस उभयतांचें ऐक्य करण्यास योजिलें होतें.

सदसद्विचार ( श्याममुं० ) हा कामक्रोधादिकांचा दरवडा पडतां बरोबर अगदीं घाबरून गेला. शेवटीं मोठ्या यत्नानें आत्म्यास येऊन भेटला. त्यानें त्यास कामक्रोध जिंकल्याचें वर्तमान सांगून शेवटीं तुझी बायको जी दुष्कीर्ति तिनें तुला फसविलें, व ती व्यभिचारिणी आहे वगैरे मजकूर कळविला. ती दुष्कीर्ति, अजाबाई ( अजा म्हणजे अविद्या ) नांवाच्या कुंटणीच्या विचारानें व्यभिचारास लागली आहे, या गोष्टीचा संशय आल्यावरून विचारानें आत्म्यास त्या अविद्येकडे पाठविलें. आत्म्यानें अज्ञान धारण करून अविद्येच्या पोटांतील सर्व तथ्य काढून घेतलें, नंतर तीस विचाराची खूण दिली. विचाराच्या योगानें दुष्कीर्तीचा व आपला ( अविद्येचा ) नाश होईल, असें मग त्या अविद्येस वाटल्यावरून तिणें भास ( भूल ) रूपी भालेरावास बोलावून त्याच्या झगड्यामध्यें आत्म्यास ह्मणजे पुण्यशीलास विहिरींत ( मृषुप्तिगर्तेंत ) लोटून दिलें.

चोरांनीं कदंबादेवीस नवस केला होता कीं, आमचें कार्य झाल्यास राजकन्या आणून तुला बळी देऊं. याचा अर्थ असा कीं, कदंबा ( कुमति ) इला नवस केला कीं, विषयोभोगाची खूप प्राप्ति झाल्यास पद्मनयना ( शांति ) ही तुला बळी देऊं. कुमति प्रसन्न होऊन विषय प्राप्त झाल्यावर शांति अर्थातच नष्ट होते, हें उघड आहे. आतां कदंबा म्हणजे कुमति आणि अर्थात् सदंबा म्हणजे सुमति कशी? याविषयीं श्रीमच्छंकराचार्यांनीं मानसपूजेंत वर्णन केलें आहे.-

" आत्मात्वं गिरिजामतिः सहचराः प्राणाः शरीरं गृहं ॥"

यावरून शरीरांतील मति ही पार्वती देवी होय. आतां त्यावरून तिचे दोन भेद-कदंबा=कत्+अंबा ( कुमति ) आणि सदंबा ( सुमति)हे पुढें झाले हें स्पष्ट आहे. कुमतीचें स्वरूप किती भयंकर आहे हें सांगणें नकोच, त्या मानानें कदंबा देवीचें वर्णन केलें आहे.

धैर्यानें ( धैर्यशीलानें ) काम क्रोधादिक षड्रिपूंचा पराजय केल्यावर त्यास मध्यंतरीं झोंका अथवा गोता बसला. तो चमत्कार झोलबा शिपायाच्या रूपानें कथन केला आहे. झोलबा व दुसरे त्याचे सोबती वगैरेंनीं धैर्यशीलास धरून दुरंगेसाहेब ( दुरभिमान ) यांच्यापुढें आणलें, ते आपल्याच ऐटीमध्यें मस्त, सबब त्यांनीं धै-

धैर्यशीलाची गांठही न घेतां आपली प्रशंसा दाखविणारा, व आलबाम इनाम मिळावें वगैरे मजकुराचा अर्ज चित्रपाल राजाकडे पाठविला. तेजस अभिमानी ( चित्रपाल राजा ) यानें त्या बाबतींत विशेष चौकशी न करितां दुरभिमानाच्या रिपोर्टावरून धैर्यास ( धैर्यशीलास ) फांशीं देण्याचा हुकूम दिला. दुरभिमानास कुचेष्टा व हलकटपणा फार आवडतो, व दुसऱ्याची फजिती झाल्यास त्यास मोठा आनंद होतो; अंगीं शौर्य व धैर्य मुळींच नसतें, परंतु पोकळ आढ्यतेच्या गोष्टी मात्र मोठमोठ्या असतात. त्याप्रमाणें दरोगे साहेबांचें वर्णन आहे.

असो. त्या दरोग्यानें धैर्यशीलाची विद्रुप स्थिति करवून त्याची धिंड काढण्याचा प्रसंग आणिला त्या वेळेस धैर्यच तें त्यानें अट्‌दिशीं एका शिपायाच्या हातांतील तरवार हिसकून घेऊन गोत्यास गोता दिला. धैर्याच्या पराक्रमाची पराकाष्ठा होऊन तें अगदीं थकून गेलें, असा समय येतांच त्याचा उत्तेजनरूपी तेजी ह्मणजे घोडा त्यास मिळाला. धैर्यास उत्तेजन मिळतांच त्यावर बसून तें तावडतोब सर्व संकटांपासून मुक्त झालें.

या शरीरांतील कोणतीही वृत्ति अत्यंत उत्कर्ष पावून आपलें कार्य उत्तम केल्यानंतर ती हळू हळू लीन होऊन आत्मस्वरूपीं मिळत असते त्याप्रमाणें धैर्यशीलानें अति पराक्रम करून सर्व संकटें टाळल्यानंतर त्यास पुष्पशीलाच्या भेटीची अत्यंत इच्छा प्राप्त झाली. त्या वेळेस तर्करूपी फिरस्ता त्यास भेटून त्यानें वर्तमान कळविलें कीं, आत्मा सुषुप्तिरूपी विहिरींत पडला आहे. व मन आणि विवेक हे दुष्कीर्ति, कुरंग ( त्याचे श्वशुर वगैरे आप्त लोक ) आणि कुबुद्धि यांच्या समागमानें बद्ध झाले आहेत.

आतां या ठिकाणीं कोणी कदाचित् कल्पना घेतील कीं, आत्मा सुषुप्तीमध्यें असतां, धैर्य पराक्रम कसे करूं शकेल? तर यावर असें उत्तर आहे कीं, फक्त धैर्याचा अतिउत्कर्ष झाला त्यामुळें आत्मस्वरूपाचा तोंपर्यंत विसर पडला व या स्थितीस पुष्पशील विहिरींत पडला असें वर्णिलें आहे, असें समजावयाचें.

असो. धैर्यशील दुरभिमानास न कळूं देतां ह्मणजे अंधारांत ( अज्ञानांत ) पुनः विचित्रपुरीस आला. तो सुषुप्तिविहिरीजवळ

पुण्यशीलाचा शोध करीत आहे, इतक्यांत अशी मांवाच्या अविद्येनें त्यास घेरलें. आणि आपलें स्वहित व्हावें याकरितां दुरभिमानास आणून धैर्यास कैद करण्याचा घांट घातला. परंतु तें धैर्य त्याही संकटांतून मुक्त झालें. व दुरभिमानास आणि त्याच्या माहात्म्यकस्त्यास मारून स्वतंत्र झालें.

कामक्रोधादि दरोडखोर. व दगेफटके, इत्यादि सर्वांचा बंदोबस्त झाल्यावर शरीरांत शांततेचीं कामें चालतात. त्या वेळेस धैर्याचा उपयोग नसतो. मवच तें देशांतरास गेलें असें दर्शविलें आहे.

इकडे सुषुप्तींतून आत्मा स्वप्नास्थितीत ( विचित्रपुरीत ) प्राप्त झाला आणि त्याची आणि शांतीची ( पद्मनयनेची ) गांठ पडली. त्या वेळेस सर्वेंद्रियांस अति आनंद होऊन, मन आणि विवेक हे बंधमुक्त झाले. तिघांचें ऐक्य होतांच सर्वोत्कृष्ट आल्हाद उत्पन्न होऊन, कामक्रोधांचे दंगे असे वहू नयेत याकरितां त्‍ बंदोबस्त करिते झाले. त्यांनी कुमतीचें ( कदंबा देवीचें ) ठाणेंच उखडून टाकिलें, व तिचे भक्त जे षड्रिपु त्यांच्या घराण्यांतील सर्व पुरुषांस हांकून दिलें. कुबुद्धि ( मना॰पंडिताची बायको ) आपले आपण अगोदरच मेली होती. दुष्कीर्ति ( श्या॰मु॰ बा॰ ) ईस त्यांनीं हद्दपार केलें; व अविद्यारूपी जी अशी कुंटणी तीस जन्मकैदेची शिक्षा दिली. शरीरामध्यें मेला न होतां स्वच्छता राहावी याविषयीं बंदोबस्त केला, व नियमित कर्में घडावीं अशा प्रकारचे राजमार्ग स्थापित केले; ह्मणजे राजयोगानें साधन चालविलें.

अशा प्रकारचा सर्व बंदोबस्त उत्तम प्रकारचा झाल्यावर आत्म्यास शांतीचें व आपलें ऐक्य सदोदित असावें अशी उत्कंठा प्राप्त झाली; ह्मणजे, उन्मनी अवस्था प्राप्त होण्याविषयींची तळमळ लागली. पुढें उन्मनी अवस्था पद्मनयनेच्या विवाहेंकरून प्रतिपादन केली आहे, हें वाचकांच्या लक्ष्यांत सहज येईल. आत्म्याचें आणि शांतीचें ऐक्य झालें असतां उन्मनी स्थितीमध्यें जो आनंद होतो तो अवर्णनीय आहे! त्याची छटा

बद्धास्थितीत दाखवितां यावी याकरितां पुष्पशीलाच्या आणि पद्मनयनेच्या विलासाची शब्दरचनेनें कमाल केली आहे, व अखेरीस योगस्थितीची उपमा देऊन पूर्णता केली आहे. परमार्थसंबंधी अनुभव प्रथम प्राप्त झाला असतां, तो फार वेळ टिकत नसतो, ही गोष्ट प्रसिद्धच आहे. त्याप्रमाणें पुष्पशीलाचा समागम पद्मनयनेशीं झाला खरा, परंतु त्या उभयतांचा आनंद फार दिवस टिकला नाहीं असें कथानकांत वर्णिलें आहे.

मागें सांगितलेली जी अविद्या ( अजी कुंटणी ) तिनें केदेनून पळ काढिला, आणि आपलें पूर्वीचें नांव बदलून नवें मरी असें प्रकट केलें. ही माया होय. जन्ममरणास ही कारणीभूत होय सबब इचें नांव मरी. इणें त्या लग्नसमारंभामध्यें अति भयंकर कपट करून पद्मनयनेस पळविलें म्हणजे आत्म्याचा आणि शांतीचा संयोग होऊं न देतां मध्यें विकल्प घातला. नंतर कामक्रोधास ( कामाजीस व रागोजीस ) शांतीचें हरण करण्याची युक्ति सांगून आपण आपल्या स्वस्थानीं गेली. कामक्रोधांनीं पुढें शांतीस धरून अविद्येकडे नेलें. मध्यंतरीं कामानें खोटी सुमती ( मदनादेवी ) अंगांत आणून क्रोधास कुमतीकडे पाठविलें व आपण आनंदानें जाऊन शांतीचे अलंकार हरण करिता झाला. पुढें शांतीचा घात करणार तोंच काळोजी प्रकट झाला, आणि त्यानें शांतीस मायेकडे ( मरीकडे )नेलें. पुढें तेथील व्यापार त्या मृत्युकल्पना होत, व त्या शांतीस अति क्लेशदायक असतात.योगाभ्यास करितांना काळ शरीरांत कायम आहे तोंपर्यंत शांतीची फारच नष्टचर्या असते. तिचें सर्व ऐश्वर्य नाहींसें होऊन ती अति दुःखांत असते, त्या वेळीं अविद्या काळास साहाय्य होऊन शांतीची अति दुर्दशा करिते.

असो. याप्रमाणें शांतीस कष्ट झाल्यावर शरीरास जुलाब होऊन तें अगदीं हलक झालें व त्यापरसा शरीरांत अति दाह उत्पन्न होऊन त्या योगानें काळ नाहींसा झाला. अशी स्थिति झाल्यावर शांति अति दीन होऊन अविद्येत लीन होऊन राहिली.

येथपर्यंत कथानक आल्यावर प्रथम पुस्तक संपलें. नंतर दुसऱ्या

पुस्तकास आरंभ झाला. आत्मा, मन, आणि विवेक इत्यादि नीं मुख्य तत्वें त्यांचें येथपर्यंत एक समयावच्छेदेंकरून वर्णन केलें आहे; व यापुढें प्रत्येकाचीं चरित्रें वेगळालीं दाखविलीं आहेत. प्रथमतः मन शांतीस धुंडण्याकरितां जेव्हां यत्न करूं लागलें, तेव्हां अफू, गांज्या, इत्यादि अमली पदार्थ सेवन केले असतां शांति प्राप्त होते असें त्यांस वाटलें. हा प्रकार कथानकांत मनोहरपंडित अमलपुरी शहरास आला अशा रूपानें दाखविला आहे. अमली पदार्थ सर्व सेवन करून शमदमादि साधनें करण्याचा हेतु होता, याकरितां श्यामभट (शम) याचे घरीं मनानें बिऱ्हाड घेतलें. इंग्लिश शिकलेलें ह्मणजे अश्रद्धायुक्त आलेलें जें मन, त्यास शमानें (श्यामभटानें) श्रद्धारूपी श्राद्धाचें आमंत्रण दिलें. असें नाहीं तसें कर, इत्यादि पुष्कळ रीतीनें शमानें मनास त्रास दिला, व तो मनानें निमूटपणें सोसला. परंतु जेव्हां अत्यंत श्रद्धा धारण करण्याची वेळ ह्मणजे श्राद्धघटका आली, तेव्हां शमाचा त्रास मनास सहन न होऊन अमलाच्या योगानें मन स्ववळलें. त्या वेळेस मनानें शमाचा धिःकार केला ह्मणजे त्याच्याशीं कज्जा केला, व श्रद्धेचा परित्याग केला ह्मणजे श्राद्धघात केला. त्यासमयीं सर्व वृत्तीही धावरून तेथें आल्या, नंतर अमलपुरीचा राजा जो असमंजसपणा त्याकडे तो तंटा गेला आणि त्यानें मनास मूर्च्छारूपी कारागृहांत टाकिलें.

अंमल करणारे जे हलक्या प्रतीचे लोक त्यांच्यांतच प्रायः पिशाचाची कल्पना असते. त्यावरून अमलपुरी शहरांतील उन्मत्तपणारूपी बागांत भ्रमरूपी पिशाच वर्णिलें आहे. तो असमंजसपणाचा भ्रम काढावा असा निश्चय मनानें करून धैर्य नसतां तें दांडगाईनें बगीचांत जाऊन बसलें. अशा स्थितींत भ्रांति उत्पन्न झाल्याशिवाय कशी राहील? भ्रमरूपी पिशाचानें मनास भुलथाप देऊन उचलिलें आणि मूर्च्छारूपी गडद्देंत नेऊन टाकिलें. तेथें तर्करूपी कुणबी येऊन त्यांनीं मनास आपल्या घरीं नेलें, आणि पूर्वस्मरणरूपी पंचाक्षरी आणून मनास सावध केलें.

अंमल केल्यावर पुढें कांहीं काळानें शरीरांत दाह उत्पन्न होत असतो, त्याकरितां पुढें मनोहरपंडित अंगार गांवास गेला, व तेथें

रात्रीं त्यास आग लागली असें कथानकांत वर्णिलें आहे. अमलाच्या योगानें शरीरांत दाह झाल्यामुळें सर्व वृत्ती मनावर उलटल्या आणि तूंच इतके श्रम देण्यास कारण आहेस असें ह्मणून त्यास कायल केलें, आणि नंतर त्यास शिक्षा करण्याकरितां सर्व ( **मनो** ) वृत्तींनीं दंड करावा याकरितां धैर्याकडे ह्मणजे **धैर्यशीलरूपी** न्यायाधीशाकडे आणिलें. मनास दंड करणें झाल्यास जबर धैर्याचा अंगीकार करावा लागतो ही गोष्ट उघड आहे; आणि या ठिकाणीं मनानें दुर्व्यसनादि उत्पन्न करणारा जो अंमल तो आजपर्यंत शमप्राप्त्यर्थ केला, तो केला.परंतु इतःपर त्यानें अंमल करूं नये याकरितां त्यास दंड करणेंही रास्त आहे. अमली पदार्थ सेवन केले असतां शमप्राप्ति होते, हीही गोष्ट मिथ्या आहे.

असो. एकंदर सर्व साधकबाधक गोष्टींचा विचार करून मनास शिक्षा करावी, असा सिद्धांत होतांबरोबर मनास व धैर्यास एकमेकांच्या चांगुलपणाचें स्मरण होऊन दोन्हीं तत्वें एक होतात व त्या वेळेस अति आनंद होऊन मन हें निरपराधी आहे, असें वाटून त्यास शिक्षा देऊं नये असा सिद्धांत होत असतो. हा वृत्तीचा चमत्कार **मनोहरपंडित** आणि **धैर्यशील** यांच्या अकल्पित भेटीनें प्रतिपादन केला आहे. नंतर इतर वृत्तींची समजूत करावी याकरितां धैर्य कांहीं कायदेशीर पुरावा शोधीत आहे, इतक्यांत संशय नांवाचा सरोदी दृष्टिगोचर झाला. गो ह्मणजे वाणी इचा दमन ( जप ) करणारा तो **गोविंदभट** होय; आणि जपाची स्त्री जी स्मृति ती त्या **गोविंदभटाची** बायको **राधाबाई** होय.या उभयतां जोडप्यामध्यें जेव्हां संशयरूपी सरोदी आला, तेव्हां आपणास संतति होण्याचा उपाय स्मृतानें पुसिला. संशयानें सांगितलें कीं, **अपूत** ( अपवित्रपणा ) याची स्त्री **निःसंताई** ह्मणजे संतोण नव्हे (साध्वी नव्हे ) ह्मणजे मलीनता या उभयतांसही संतान नव्हतें. याकरितां स्यां त्यांस उपाय सांगितला कीं, तुह्मी दाह उत्पन्न करा ह्मणजे तापरूपी पुत्र तुह्मास होईल.

आतां अपवित्रपणा आणि मलीनता यांच्या योगानें **अंगार** गांवांत ह्मणजे शरीरांत दाह उत्पन्न झाला ह्मणजे त्यांनीं आग लावली असून

मनानें अंमल केल्यामुळें दाह झाला असा मनावर आरोप घातला. इत्यादि मजकूर संशयरूप सरोद्याच्या योगानें बाहेर पडला तो धैर्यास समजला. त्यावरून त्याणें चौकशी करून सर्व वृत्तींची त्याविषयीं खातरी करून देऊन अपवित्रपणा आणि मलीनता यांस शिक्षा देऊन काढून टाकिलें आणि संशयरूप सरोद्यानें पारिपत्य केलें. ह्मणजे निःसंशय केला.

मनास धैर्याची अनुकूलता प्राप्त झाल्यावर पुनः भ्रमरूपी पिशाचाचें बंड मोडावें असें त्यास वाटून ते दोघे पुनरपि अमलपुरीस आले. धैर्याची अनुकूलता असल्यावर मग काय विचारावयाचें आहे ! भ्रमरूपी पिशाचाचा नाश तत्काळ होऊन मिथ्याभासरूपी कृत्रिम व्याघ्राचाही नाश झाला. याप्रमाणें व्यवस्था होतांबरोबर सुमतिरूपी देवीपाशीं शांति (पद्मनयना) आणि सुबुद्धि (सुगुणाबाई) अगदीं लीन झालेल्या, त्यांस मनानें ओळखून हुशार केलें, व असमंजसपणास समज देऊन त्याजवळ कांहीं काळ राहिले.

यापुढें कथानकांत, विचित्रपुरीत अत्यंत उन्हाळा प्राप्त होऊन पटकी सुरू झाली असें प्रतिपादन केलें आहे. त्याबद्दल कल्पना अशी कीं, योगाभ्यास करीत असतां मध्यंतरीं उष्णता, अगर शैत्य अत्यंत वृद्धिंगत होऊन योग्यास विघ्न उत्पन्न होत असतें व ईश्वरकृपेनें तें निवारणही होतें, असा प्रकार वेदान्तशास्त्रांत सांगितला आहे. त्याप्रमाणें योगाभ्यासाच्या योगानें शरीरांत अत्यंत उष्मा उत्पन्न होऊन अतिसाराचा उद्भव झाला असें समजण्याचें आहे. अशा समयास त्या योग्याचे आप्त अगर इष्टमित्र जे कोणी सन्निध असतात ते सर्वच एकदम त्या योग्यास दूषण देतात कीं, तूं चांगलें खात नाहींस, विषयोपभोग भोगीत नाहींस, ह्मणजे त्वां कुमतीचा ( कदंबा देवीचा ) परित्याग केला आहेस यामुळें हे कष्ट तुझ्या शरीरास उत्पन्न झाले आहेत. इत्यादि गोष्टी कल्पनापुरीच्या (विचित्रपुरीच्या)राजास विकल्परूपी प्रधानानें सुचवून कुमतीचें ठाणें पुन्हां घालविलें. त्यावर स्वप्नरूपी अग्निहोत्र्यानें कुमतीचें प्राबल्य वाढवून आत्मघात करण्यास सुचविलें. येथें एखादे वेळेस वाईट स्वप्न पडून आपणास मरण येईल अशी जी भीति उत्पन्न होते ती स्थिति घ्यावयाची. त्या वेळेस धैर्य,

मन, विचार हे बिल्कुल नसतात, ह्मणजे ते देशांतरास गेलेले असता-न. त्या वेळेस कल्पनास्थितीचा जो अज्ञानरूपी तेजस अहंकार ( **चित्रपाल** राजा ) त्यास तें कबूल होऊन तो आत्मघात करण्यास कबूल होतो ह्मणजे कुमतीप्रत आत्मा बळी देण्यास कबूल होतो. हा सर्व प्रकार **पुष्पशीलास** **कदंबादेवीस** बळी देण्याच्या कथानकरूपानें वर्णिला आहे. ही स्थिति, जेव्हां शरीरांत व्याधि प्रबळ होऊन मनुष्य बेशुद्ध होण्याच्या संधींत असतो, व त्याच्या भोंवतीं शेंकडों आप्तवर्ग मिळून दुःखोद्गार टाकितात त्या वेळची आहे. त्या वेळेस शरीरांतील नाड्या तुटून रक्ताचा नाश होत असतो तो प्रसंग कदंबेच्या पूजाविधिरूपानें वर्णिला आहे. अशा अगदीं प्राणोत्क्रमणाच्या संधीस उत्तम औषधींची मात्रारूपी देवी प्रकट होऊन मिथ्या अहंकारास ( **चित्रपालास** वगैरे ) लीन करून धैर्यास प्रकट करिते. नंतर आत्मा शुद्धीवर येऊन मन प्रकट होतें आणि नंतर सर्व दुःखाचा निरास होऊन आत्म्यास शांतीची प्राप्ति होते ( **पद्मनयनेची** भेट व तत्संबंधी सुखसोहळा ). याप्रमाणें उत्तम औषधि मिळून आत्म्यास शांतीची प्राप्ति झाली असतां किती आनंद होतो याची कल्पना करून मग कथाभागाचा विचार करावा. यामध्यें प्रत्येक गोष्टीचें फक्त दिग्दर्शन केलें आहे. परंतु याचा विचार सुज्ञ वाचकांनीं आपल्या ठिकाणीं अनुभव पाहून करावा. कारण, कथाभागापैकीं प्रत्येक बारीकसारीक सर्व गोष्टींचा अनुभव येथें लिहूं लागल्यास **विचित्रपुरी** एवढा दुसरा ग्रंथ होणार आहे. परंतु तसें येथें कर्तव्य नसून एका भागांत सर्व आटोपणें आहे. असो. अशा वेळेस पूर्वींच्या सर्व दुष्ट कल्पना बदलतात आणि वृत्ति भाविक होते, ती स्थिति **चित्रपालादिकांची** दाखविली आहे. शांतीबरोबर सुबुद्धीचीही दुर्दशा झाली असते व तिला सुख होतांबरोबर सुबुद्धि प्रकाशमान होते, ती **सुगुणाबाई** होय. मनाची पूर्वस्त्री कुबुद्धि ही मरण पावली होती सबब तिच्यामध्यें धैर्यानें मध्यस्थी करून त्यांचा प्रीतिविवाह लाविला व त्यांचें ऐक्य करून मन आणि सुबुद्धि यांचा संबंध जोडिला हा कथाभाग **मनोहरपंडिताच्या** प्रीतिविवाहरूपानें वर्णिला आहे. **श्यामसुंदर** ( सदसद्विचार ) हा शांति नष्ट होतांबरोबर देशांतरास गेला होता

( कारण, शरीरांत शांति नसतां विचार सुचत नसतो ) व त्याची पूर्व स्त्री दुष्कीर्ति ती मरण पावली होती. सबब त्यानें देशांतरांत सुकीर्तीची प्राप्ति करून व भोळेपणाचा निरास करून आत्म्याकडे येण्यास आरंभ केला असतां कुजनरूप चोरांनीं त्यास अटकाव करून सुकीर्ति ( **जयंती** ) हरण करण्याचा विचार मांडिला. परंतु सुकीर्तिच ती; कर्णोपकर्णांत शिरून ह्मणजे वळणावळणानें जाऊन आत्मा, मन आणि धैर्य यांच्या समीप प्राप्त होते. नंतर धैर्याच्या योगानें कुजनांचीं तोंडें बंद होऊन सदसद्विचार प्राप्त होतो. शरीरांत या गोष्टी निमित्तमात्रेंकरून होतात; परंतु त्याचा कथाभाग वर्णन करण्यामध्यें एकएक तत्वाची हकीकत क्रमाक्रमानें लिहिण्यानें कालांतर भासतें ही गोष्ट वाचकांनीं ध्यानांत ठेवावी. दुसरें, ग्रंथांत लिहून दाखवितांना एकएक तत्वाचें वर्णन वेगळालें करणें भाग पडतें व शरीरांतील कर्में एककाळीं घडतात. अशा रीतीनें विचाराची प्राप्ति झाल्यावर उद्वेगरूपी एक व्याघ्र उत्पन्न होत असतो, व त्याचा नाश धैर्यप्रभाव व वीरश्री या दोन तत्वांनीं होतो. व्याघ्राचा नाश झाल्यावर वीरश्री लीन होऊन आपलें स्वरूप ( **वीरावती** ) असें धारण करिते. कारण, विचार धैर्याची तारीफ करितो ह्मणजे त्यास यशप्राप्ति (वीरश्री) करून देतो. त्यानंतर सर्व तत्वें एकत्र होऊन कल्पनास्थितीचें अवलंबन करून शांतिसहवर्तमान सर्व देहांत ज्ञानरूपें प्रकाशमान होतात. मग काय तें शरीरास सर्व सुखाचा खरा अनुभव प्राप्त होऊन सर्वेंद्रियांची तृप्ति होते. कल्पनास्थिति व तृष्णीभाव एकत्र होऊन ह्मणजे **विचित्रपुरी** व **चौशहाणपूर** हीं दोन्हीं राज्यें एकत्र होऊन आत्मोत्कर्ष होतो. त्यानंतरचा अनुभव सर्वोत्कृष्ट ज्ञानावस्थेनें पाहावयाचा आहे. **विचित्रपुरीवर मनोहरपंडिताची** योजना ह्मणजे कल्पना उत्पन्न झाल्यास मन धारण करण्याचें; नाहीं तर सर्व आनंदमय! त्याप्रमाणेंच प्रसंगानुसार धैर्य, व सदसद्विचार धारण करून आत्मोन्नतीचें दृढीकरण करण्याचें, एरव्हीं सर्व इंद्रियग्रामास समाधानवृत्तिरूप प्रजेचा निरंतर संतोष राखण्याचें काम आत्म्यानें धैर्यादि त्रिवर्गास सांगून सुरळीत राज्य चालविलें. सुबुद्धीकडून सर्व कल्पनारूप मुलींस ज्ञान मिळून त्या

तन्मय होऊं लागल्या. त्या वेळच्या लघुकल्पना त्या बाला (मुली) मानिल्या आहेत असें समजावें. योगस्थितीचे जे दृढ निश्चय ते कायदे त्याच्या अनुरोधानें सर्व शारीरव्यापार चालून सर्व शरीरांतील वृत्ति समाधानाप्रत पावल्या. शारीरांत कर्तव्य ह्मणून राहिलें नाहीं. सर्व भोग भोगून व सर्व सुखाचा यथेच्छ अनुभव घेऊन सर्वेंद्रियें स्वसंभरांत डोलूं लागलीं. शरीरास सुवर्णाप्रमाणें कांति प्राप्त होऊन आत्मा शांतिसह महानंदांत दंग झाला, तो रंग अहोरात्र अविट चालून सूर्येंदु अस्तोदय केव्हां होतात हें त्यास कळेना. जरा, व्याधि, मरण हे मिथ्या भासून नाहींसे झाले. काळगणना खुंटली. हें शरीर आपोआप आलें किंवा कोणी उत्पन्न केलें याबद्दलचा संशय फिटला. जन्ममरण मिथ्या वाटून पुनर्जन्माचीं कारणें लक्ष्यांत आलीं." सर्गेनोपजायंते प्रलयेन व्यथंतिच " अशी स्थिति जमली. अहाहा! मग त्या आनंदास काय पारावार आहे! ती स्थिति प्राप्त झाल्यास त्रैलोक्याचें राज्य तुच्छ आहे! मग या क्षणभंगुर मृत्युलोकींच्या सुखाची इच्छा कोण करील? अशा प्रकारची स्वानंदमहत्त्व स्थिति प्राप्त होऊन व देहांतील सर्व तत्त्वांची सम एक बनून त्यांचा भिन्नपणा मोडला. मग निरंतर सुखानंद कोंदलेला राहतो व तो चंद्रसूर्यांचा लय आला तरी मोडत नाहीं. याप्रमाणें स्थिति त्या नौशहाणपुराची झाली. विचित्रपुरीच्या या तात्पर्यावरून प्रत्येक देहधारीनें विचार करून या स्वानंद सुखाप्रत प्राप्त व्हावें. हें आत्मसुखाचें सखोल दिग्दर्शन होय. याकरितां ज्यांचीं मनें पक्व झालीं आहेत त्यांनीं त्याचा अनुभव अवश्य पहावा अशी ग्रंथकर्त्याची विनंति आहे.

## पद.

राग गारा झिंजोटी, ताल दादरा.

(मराठी शाकुंतलांतील " सुंदरमुख तंदिल ननु नंदिकेश्वरा " या चालीवर.)

**वंदित पद मंडित गुण श्यामसुंदरा ॥ अगणित गुणयुत माधव विश्वअंदरा ॥ ध्रु० ॥**

**॥ हृत्पदशशि तोषित मति धैर्यसागरा ॥**

**॥ विश्वजनक पुष्पशिल मति मनोहरा ॥**

**॥ पद्मनयन शांतिसदन ज्ञानमंदिरा ॥**

धीरा, वीरा, स्थीरा, सुखसदना, रिपुदमना, भवहरणा,
हे कृपाकरा ॥ वंदितपद० ॥ १ ॥

॥ दुर्मतिहर सन्मतिकर विश्वपालका ॥
॥ दुर्गुणरिपु सद्गुणप्रिय भक्ततारका ॥
॥ निंदक अति नास्तिकजनतुंडभेदका ॥

पुनिता, ताता, त्राता, मजपतिता, तुजपरना, कवण हिता
करि, सुरेश्वरा ॥ वंदितपद० ॥ २ ॥

॥ स्वानंदचि आनंद सौख्यसागरा ॥
॥ वेदांतचि जगदांत पयोधिजावरा ॥
॥ पामरमति थकित मम इंदिरावरा ॥

विमला, मजला, पाला, प्रियकमला तुज सकलाशय क-
थिला हे नरोद्धरा ॥ वंदितपद० ॥ ३ ॥

श्लोक ( पृथ्वीछंद. )

॥ प्रभो प्रभव हा सरो मति सुसंगधारा धरो ॥
॥ कृतांतभय वोसरो कर परोपकारा करो ॥
॥ नबुद्धि विषया वरो भवसमद्र भावें तरो ॥
॥ स्वमोद हृदयीं भरो मनपणा स्वरूपीं मरो ॥

